भारत इतिहास संशोधक मंडळ, पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ५३

आपटे स्मारक मंडळ प्रकाशन, पुस्तक ४ थें

# भाऊसाहेबांची बखर

—व्यक्ति-स्थळ-सूची, शब्दसूची, बखर—प्रसंग काल-पट, भाऊसाहेब मुक्काम यादी, व्याकरण—व इतिहास-विषयक छोटे प्रस्ताव, पानिपत-प्रवास नकाशा यांसह—

आवृत्ति ७ वी

संपादक

**शं. ना. जोशी**

सभासद, भारत इतिहास संशोधक मंडळ.



माघ शक १८८०

साडेसहा रुपये

भारत इ. स. मंडळाचे सभासदास ६ रु.

फेब्रुवारी १९५९

प्रकाशक
**शं. दा. चितळे, एम्.ए., बी.टी.**
**अ. वि. गृह प्रकाशनासाठीं**
१७८६ सदाशिव, पुणे २.



मुद्रक
**दि. दा. गांगल,** एम्.एस्सी.
लोकसंग्रह छापखाना,
१७८६ सदाशिव, पुणे २.

श्रीः

"महाराष्ट्राच्या इतिहासाचा व भाषेचा आस्थापूर्वक
अभ्यास करूं पाहणाऱ्या सज्जनांस हा
ग्रंथ परम प्रीतीनें अर्पण करितों."

**ग्रंथ-संपादक**

# निवेदन

प्रस्तुतची आवृत्ति, नव्या संस्करणाच्या दृष्टीने, मागील आवृत्तीत म. म. प्रा. द. वा. पोतदार ह्यानी म्हटल्याप्रमाणे, २ री आहे आणि क्रमाने पाहता ७ वी आहे. मागील आवृत्तीत हा क्रम दर्शित करावयाचा राहिला तो असा आहे— १८७९–१ ली आवृत्ति; १८८६–२ री, १९००–३ री; १९२२–४ थी; १९३२–५ वी आणि १९५५–६ वी व नवी १ ली आणि प्रस्तुतची १९५९ ची ७ वी व नवी आवृत्ति २ री. सहाव्या आवृत्तीनंतर सातवी आवृत्ति इतक्या सत्वर काढण्याचा योग येत आहे ह्याचे श्रेय मूळ ग्रंथ, जाणीक वाचक आणि शिक्षण संस्था ह्याना आहे. मूळ ग्रंथास ऐतिहासिक पत्रसंदर्भ दर्शित करणारे जोडलेले कालपट, व्यक्तिस्थल–सूचि, भाऊच्या पानपतला जाण्याच्या मार्गाचा नकाशा, त्यास जोडून मार्गातील मुक्कामाचीं ठिकाणे व तारखा, बखरीतील शब्दार्थ–कोश ह्याचीहि जोड सहाव्या आवृत्तीप्रमाणे ह्याहि आवृत्तीस दिलेली असून शिवाय परिच्छेदाना शीर्षके दिली आहेत. व्याकरण व बखर-लेखन ह्यासबंधानेहि काही खुलासा स्वतंत्रपणे प्रारंभी जोडला आहे

मागील आवृत्तीत म्हटले होते की, साने ह्यानी स्वीकारलेलेच धोरण पुढें चालू ठेवले आहे. म्हणजे अमुक एक प्रत न स्वीकारता निरनिराळ्या प्रतीतील पाठ स्वीकृत केले आहेत. असे करीत असता प्रत-लेखकाचा अजाणपणा, लपेटदार मोडी लेखन, मोडीलिपीतील मारखवट-वळणाची अक्षरे इत्यादीमुळे जे पाठभेदसे वाटतात आणि पाठभेद कसे होतात हे दाखविण्याच्या दृष्टीने असले पाठभेद जे गेल्या आवृत्तीत दिले होते; तसेच बखरीतील विधानात कोठे संगति वा विसंगति झाली तें पत्राधारें टीपात दाखविले होते तो बराचसा भाग ह्या आवृत्तीत कमी केला आहे तीत सुचविल्याप्रमाणे असे पाठ बरेच कमी केले आहेत.

कालपटातहि तपासून पाहता काही लेखांक व पृष्ठांक ह्यात आढळलेल्या चुका दुरुस्त केल्या आहेत आणि काही आधार नवीन आढळले तेहि समाविष्ट केले आहेत. ज्या ऐतिहासिक प्रसंगाबद्दल किंवा चरित्राबद्दल पत्रे, शकावली इत्यादि अन्य साधने उपलब्ध व प्रसिद्ध झाली, त्याच प्रसंगाबद्दल बखर इत्यादि छापताना परिच्छेद व त्यातील उल्लेख आणि पत्रातील येणारे स्थल-काल-प्रसंगादि निर्देश, परिच्छेद-क्रमानुसार नक्तारूपाने साधार दाखविले आणि हेच ह्या नवीन आवृत्तीचे वैशिष्ट्य होय (म. म. प्रा. द. वा. पोतदार प्रथमावृत्ति पुरस्कार पृ. २८-२५)

नानासाहेब प्रधान पेशवे आणि समशेरबहादुरहि ज्या 'भाऊ भाऊ' च्या घोषणेत मृत्यु पावले ते सदाशिवराव भाऊ पानिपतच्या रणांगणावर ज्या ठिकाणीं वीरस्वर्ग पावले त्या जागेवरील त्याच्या स्मारकाचे चित्र गेल्या आवृत्तीत दिले होते. प्रस्तुत आवृत्तींत त्या स्मारकावरील इंग्रजी लेख दिला आहे. हें स्मारक शिंदे-सरकारने उभारलें आहे, असे कळतें.

वर बखर-आवृत्तीचा क्रम १८७० पासून सांगितला आणि मागील आवृत्तींत ह्या क्रमाबरोबर बखर-मुद्रणानहि क्रमाक्रमा बदल व वाढ होत आली हे दर्शित केले होते ( प्रास्ताविक विभाग पृ. ३ ). प्रस्तुत आवृत्तीत मागील आवृत्तीतील कालपट, भाऊचा मार्ग-नकाशा, व्यक्ति-स्थल-सूची इ. हे तर दिलेच आहे; पण परिच्छेदासहि शीर्षके दिली असल्यामुळे वाचकास असके प्रकरण, प्रकरणातील असकी उपकथा नेमकी कळण्याची सोय झाली अनुक्रमणिकेत प्रकरणावर ही परिच्छेद-शीर्षके दिली आहेत. पूर्वी कोणत्याहि आवृत्तीत अशी शीर्षके नव्हती.

पाठातील समपृष्ठावर ग्रंथनाम आणि परिच्छेदांक दिले असून विषम पृष्ठावर प्रकरण-क्रमांक, प्रकरण-नाव आणि परिच्छेदांक दर्शित केले आहेत. यामुळे वाचकास अनुक्रमणिका किंवा कालपट पाहणे सोयीचे होईल.

मागील आवृत्तीच्या निवेदनात पत्र-बखर-विवेचन तसेच ह्या बखरीप्रमाणे पानिपत-बखरी, भाऊसाहेब-कैफियत इत्यादि ग्रंथ-विवेचन हा भागहि ह्या ग्रंथास जोडावयास हवा हे दर्शित केले होते. (पृ. ७) व त्याप्रमाणे तीन परिशिष्टे परिच्छेदानुसार स्पष्टीकरण टिप्पणी परिशिष्ट १, विवेचन-परिशिष्ट २ आणि परिचय-परिशिष्ट ३––जोडावयाची म्हणून उद्योगास लागलो व तशी ६।७ प्रकरणे लिहून झालीहि; पण मुद्रणयंत्र सुरू झाल्याबरोबर त्याला काम पुरविणे हे मला तितक्या त्वरेने जमले नाही. म्हणून ती परिशिष्टे थोडीशी मुद्रित झाली तरी ती पुढील आवृत्तीसाठी तशीच बाजूस ठेविली आणि ही आवृत्ति मुद्रणालयातून प्रथमावृत्ती-प्रमाणेच प्रकाशित होत आहे.

ग्रंथाचा **कालपट** हा नव्या आवृत्तीचा जसा विशेष तसा तो ह्यापुढे कोणत्याहि ऐतिहासिक बखर ग्रंथ-प्रकाशनाचा आवश्यक भाग व्हावा ह्या योग्यतेचा आहे. बखर-पत्र-संयोगामुळे ऐतिहासिक ग्रंथ-प्रकाशनात एक नवीन उपयुक्त पायंडा पडला आहे. ह्यापूर्वी असा उपक्रम मुळीच आलेला नाही असे नाही. निराळ्या रूपानें झाला आहे. सप्तप्रकरणात्मक बखरीस कै. साने यांनी टिपणे जोडली किंवा 'होळकर-कैफियती'स श्री. य. न. केळकर ह्यानी पत्रे दाखल केली, हा ह्या संयोगातीलच भाग होय. हा बखरग्रंथ एका दृष्टीने त्यापेक्षा सुरस आणि सरस; व त्याला पत्र-दर्शित कालपटाची जोड दिल्यामुळे बखरीतील इतिहास-रसास अधिकच विश्वसनीयता आली आहे. मात्र त्या दृष्टीच्या भोक्त्याचीच वाण आहे. पण विकासशील महाराष्ट्रात तीहि उणीव भरून निघेल हा भरंवसा बाळगून आहो. 'बोला आदि झोंबिजे प्रमेयासि' ह्या ज्ञानेश्वराच्या उक्तीप्रमाणे हा बखरग्रंथ भाषा व इतिहास या दोन्ही दृष्टीनी आता साक्षेपी वाचकाना अधिक आवडेल. विद्यापीठानी हा ग्रंथ अभ्यासास अवश्य लावावा, आणि भाषा व इतिहास ह्याची चर्चा स्वतंत्र व विस्तृत व्हावी एवढे सांगणे भाग आहे ह्या बखरीप्रमाणे पानिपत-प्रसंगाचे बखरग्रंथ ठिकठिकाणीं आहेत व प्रसिद्धहि होत आहेत. मद्रास मॅन्स्क्रिप्ट लाय०तील अशी एक बखर मद्रास ओरि०

च्या त्रै० तून क्रमशः आली आहे. तसेंच प्रतिष्ठान' मासिकातूनहि वैजापुर येथें सांपडली म्हणून पण पानिपतचीच बखर छापून आली आहे. लंडन व धुळें येथील हस्तलिखितसग्रहांतहि अशा बखरी आहेतच. त्याचाहि अभ्यास अपेक्षित आहे.

मागील आवृत्तींत 'भा. इ. स. म व म. तील अधिकारी ह्यांच्या सहाय्याचा उल्लेख करणे हें दुजेपणाचें ठरेल' (पृ. ८) असे म्हणून त्या सहाय्याचा निर्देश केला होता. अर्थातच शकावलीचे जे काम म०त चालले आहे त्याच्या चिठ्या अध्यक्षांच्या अनुमतीने मला पाहण्यास मिळाल्या ह्याबद्दल (अध्यक्ष म. म. प्रा. द. वा. पोतदार) श्री. ग. ह. खरे आणि शकावलीकडील इतर सर्व सहकारी ह्यांचा फार आभारी आहें. तसेच प्रा. श्रीयुत गोरे याचाहि साभार उल्लेख करणें कर्तव्य आहे.

'कागदाच्या महागतेमुळें किमतीतहि वाढ करणे प्राप्त झाले.'

संपादक व चिटणीस
**द. वि. आपटे स्मारक मंडळ, पुणें.**



# प्रस्तावना

### १. ग्रंथाचें नांव

येथें बखरीच्या नावासबधाने किंचित् स्पष्टता केली पाहिजे. जो ग्रंथ छापावयाचा त्याच्या नावाविषयीच कोणी अभ्यासकानी काही म्हटले असले, तर तशी स्पष्टता इष्ट व आवश्यकच आहे. ग्रंथाचे नामकरण करण्याचा पहिला अधिकार ग्रथलेखकाचा आहे. अशा अधिकारीपणाने आपल्या ग्रंथास त्याने जे नाव दिले असेल तें सर्वस्वी मान्य. असे जर नाव नसलें तर ग्रंथाचे आद्यन्त पाहणे, त्या आद्यन्तानुसार ग्रथातील लेखन ध्यानात घेणे, आद्यन्तच एखाद्या ग्रथाचे दुर्दैवानें हाती न आले तर ग्रथान्तर्गत आदरोद्भूत आणि द्वेषमूलक उद्गार लेखकाने कोणाकोणाविषयी कितीदा काढले हे पाहणे आणि कोणत्या प्रसंगाकडे वाचकास लेखक नेऊन सोडत आहे हे लक्षात घेणे ह्यावरून ग्रथनामाचा लेखकाचा अभिप्रेत असा अदाज करणे भाग पडते. प्रस्तुत बखर-ग्रथाच्या अनेक नकलाप्रती हाती येऊनहि ग्रथाला नाव काय द्यावे, असा प्रश्न पहिल्या आवृत्तीचे वेळीच सपादक कै. साने ह्यानी ध्यानी घेऊन यथार्थपणे आमच्या मते तो तेव्हा सोडविला. ह्या सहाव्या आवृत्तीच्या वेळीहि तोच प्रश्न जरा वेगळ्या प्रकारे पण विचारात घेणे वर म्हटल्यानुसार प्राप्त आहे.

### २. साने ह्यांनीं दिलेलें बखरीचे नांव

पहिल्या आवृत्तीच्या उपोद्घातात (इ. स. १८७९) पाचव्या परिच्छेदात पान ३ वर सपादक साने ह्यानी सागितले की, "शक १६७६–७७ पासून शक १६८३ पर्यंत हिंदुस्थानात मराठ्यानी ज्या स्वाऱ्या केल्या त्या स्वाऱ्याची बखर असे काहीतरी नाव देणे योग्य दिसते. आम्ही तर 'पानिपत बखर' असेच नाव देणार होतो. पण पुणे येथील प्रतीच्या काही बदाच्या डोकीवर 'बखर भाऊसाहेबाची' असे लिहिलेले आहे. सेरीज शेवटील प्रसगाचा अतिनिकट सबध श्री. सदाशिवरावभाऊ याच्या नावाशीच आहे. अशाकरिता 'भाऊसाहेबाची बखर' हेच ह्या ग्रथाचे नाव कायम करून आम्ही तो प्रसिद्ध करितों" म्हणजे एक नव्हे अनेक बदावर हे नाव सपादकाना तेव्हा आढळले व ते त्यानी ग्रथास दिले पुढे दुसऱ्या व तिसऱ्या आवृत्तीच्या वेळी (इ. स. १८८९ व इ. स. १९००) साने ह्यानी हाच नामपरिच्छेद असाच प्रारभी दिला. मात्र ह्या आवृत्तीच्या वेळी त्या कालच्या युक्ततेस अनुसरून मुखपृष्ठावर इग्रजीत 'An account of the Maratha Campaigns from 1753–1761' अशी ओळ छापली व ती पुढीलहि म्हणजे चौथ्या व पाचव्या आवृत्तीतहि ठेवली म्हणजे साने यास जे नाव सुचले व ते पहिल्या आवृत्तीच्या परिच्छेदात त्यानी शकगणनेने सुचविले तें त्यांनी ह्या रूपानें ग्रथावर दर्शित केले. मुख्य गोष्ट की, नामपरिच्छेदाचा भाग पुढल्या म्हणजे चौथ्या व पांचव्या आवृत्तीतहि पृ. ७ वर १० वा परिच्छेद म्हणून दिला व त्यात थोडा पण लक्ष देण्याजोगा बदल केला. बदल हा की, 'कांही बदाच्या डोकीवर' ह्या जागी '१२७ व्या बदाच्या डोकीवर.' ह्या बदलामुळे थोडी

संशयाला जागा झाली म्हणजे एकाधिक बदावर हे ग्रंथनाम नसून नाव तेच पण एका १७०७ व्या बदावर हे नाव आहे. सारांश, पाचहि आवृत्तीत 'भाऊसाहेबाची बखर' हेच ह्या ग्रंथाचे नाव व ते स्वत: बखरग्रंथलेखकाने दिलेले आहे, ह्या समजुतीने प्रकाशकांनी साधार मानून त्या नावाने ग्रंथ प्रसिद्ध केला

३ ग्रंथलेखकास अभिप्रेत नाव कोणतें असावें?

ग्रंथनामासाठी त्याचे आद्यन्त पाहता हेच नाव ग्रंथलेखकास अभिप्रेत असावे असे दिसते. 'भाऊ गर्दी होऊन प्यादेमात कशी झाली' असा प्रश्न प्रारंभी ग्रंथलेखनासाठी ... याने विषयदिग्दर्शनार्थ घेतला (पृ. २). आणि 'भाऊसाहेब गैब झाल्याचे' (पृ. १३५ व १४५) त्याप्रमाणे वर्तन झाले. नजीबखान प्यादा होता तो फर्जी जाहला व त्याने प्यादेमात केली' हे त्या प्रश्नाचे उत्तर देऊन तो विषयलेख पूर्ण केला (पृ. १४६). अर्थात् ग्रंथलेखकास 'भाऊगर्दी' कथन करावयाची होती व ती त्याने लिहून मागितली म्हणजे ग्रंथाच्या प्रारंभी व समाप्तीस ह्या आपल्या ईप्सिताचा स्पष्टपणे निर्देश बखरलेखकाने केला व बखरीचे नावहि लिहून मागितले.

ग्रंथकाराच्या उद्दिष्टाप्रमाणे ग्रंथातील निरनिराळ्या व्यक्तीचे उल्लेख पाहता असे दिसून येईल की, ग्रंथकाराने भाऊसाहेबाविषयी जसे आदराचे उद्गार काढले तसे दुसऱ्या कोणाहि व्यक्तीबद्दल काढलेले नाहीत 'ईश्वरी अंश', अवतारी इत्यादि. (पृ. १५०–१३८). अशा आदराचे धनी असलेल्या भाऊसाहेबावर गर्दी होऊन प्यादेमात कशी झाली, ह्या प्रसंगाकडे लेखक वाचकास नेत आहे हे लक्षात घेतले म्हणजे ग्रंथाला लेखकाने स्वत:च नाव दिलेले असणे, त्या नावाचा ग्रंथाचे आद्यन्ती निर्देश केला असणे, ह्या दोन्ही गोष्टीलाच जुळेल असे ग्रंथान्तरी लेखन येणे आणि नामनिर्दिष्ट जे मुख्य प्रतिपादन तेच आपण क्रमाने पाहात व लक्षात घेत आलों ह्याची वाचताना प्रचीति येणे ह्या सर्व गोष्टींनी 'भाऊसाहेबाची बखर' हेच नांव सर्वतोपरी सुयुक्त आहे असे सहज दिसून येईल

४ ग्रंथनामाविषयींचे आक्षेप व त्यास उत्तर भाग १ व २

असे असता काही विद्वान् अभ्यासक ही शिंदे याची बखर आहे, असा प्रश्न आग्रहपुरस्सर मांडतात ह्या त्यांच्या म्हणण्यास ते, लेखक, ज्या अनेक व्यक्तींचा संबंध ग्रंथात आला आहे त्यापैकी शिंदे–सरदार–मंडळीविषयी अधिक आदराने व आपलेपणाने लिहितो, हा पुरावा देतात आमचें म्हणणे इतकेच की, हा पुरावा, भाऊसाहेब सोडून इतर व्यक्ति व शिंदे–सरदार ह्यांच्या पुरता लक्षात घेता थोडासा खरा आहे मल्हारराव होळकर, राघोबादादा, विश्वासराव, इब्राहिमखान, सुरजमल जाट इत्यादि प्रमुख व्यक्ति आणि शिंदे–सरदार मंडळी, ह्यांच्यामध्ये पाहताना शिंदे याजविषयी लेखकाचा जिव्हाळा अधिक आपुलकीचा आहे हे निश्चित व शिंदे मंडळी तशाच आदराची आहेत हेहि खरे पण एवढ्यावरून ग्रंथच शिंद्यांच्यासाठी व त्यांचेच नाव ग्रंथास पाहिजे, हे म्हणणे वरील आधार लक्षात घेता लेखकाच्याच उद्दिष्टाला सोडून होतें असे वाटते ते चारहि आधार सोडून अभ्यासकाच्या पक्षदृष्टीने पाहता असेहि म्हणता येईल की, ग्रंथास सुरजमल जाटाची

बखर असेहि नाव दिले असता चालेल. कारण, शिंदे-सरदाराप्रमाणे ह्या जाटाबद्दलहि लेखकाने अत्यंत आदराने लिहिलेले आहे. इतकेच नव्हे तर शिंदे यांची चारपाच ठिकाणी तरी जरा लगडी बाजू वाटेल अशा प्रकाराने सांगितली आहे. तितकीहि सुरजमल जाटाविषयी नाही. आणि सुरजमल जाटाचा संबंध शिंदे-सरदार याजप्रमाणे ग्रंथारंभापासून तो ग्रंथान्तापर्यंत आलाहि आहे. किंबहुना अधिकच आला आहे. पानिपत-पळानंतर त्या पळातील मंडळीना जाटाचें उदार मनानें झालेले साहाय्य लेखकानें कौतुकाने व आदर उत्पन्न होईल असेच वर्णिले आहे. असे आहे म्हणून जाटाचे नाव ग्रंथाला हवे हे म्हणणे जसे अयुक्त तसेच, ज्याचा इतकादा व इतकाहि आदर ज्याच्याविषयी नाही त्या शिंद्याची बखर हेहि म्हणणे आवश्यक नाही. हा पक्ष मांडणारांनी, 'भाऊसाहेबाची बखर हे नाव आकर्षक म्हणून साने यानी दिले इतकेच;' असेहि तेथे म्हटले आहे (हा. कै. प्र. ) पण हा मुद्दा तितकाहि सबल नाही. कारण 'शिंदे यांची कैफियत' अथवा बखर' हे नाव 'भाऊसाहेबाची बखर' या नावाइतकेच साधे वा आकर्षक आहे. आणि जर शिंदे याजपेक्षा भाऊसाहेब ह्या व्यक्तीमुळे ह्या नावात आकर्षकता आली असेल तर मग ह्याहि दृष्टीने 'भाऊसाहेबाची बखर' हेच नाव या ग्रंथाला पाहिजे असे ओघानेच येईल.

(२) ह्या ग्रंथाच्या नावाविषयीची चर्चा शिंदेशाहीच्या इतिहासाची साधनें ह्या मालेच्या तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत—भालेराई हें नाव तेथे आहे—पान २ ते ६ अशा ५ पानावर विस्तृतपणे व चटकदार भाषेत संपादकानी केली आहे व तेथे 'शिंद्याची बखर म्हणून कोणी स्वतंत्र ग्रंथ सापडत नाही. तेव्हा वरील (म्हणजे सदर भाऊसाहेबाच्या) बखरीचेंच तर ते नाव नसेल ना, असा स्वाभाविक शोध लावून बोध केला आहे. हीच चर्चा करताना 'भाऊगर्दी' हे नाव ग्रंथकर्त्याने नवीन निर्माण करून भाऊसाहेबाविरुद्ध अथपासून इतिपर्यंत दोषच ह्या बखर-ग्रंथात दाखवून त्याचें सार 'भाऊगर्दी' ह्या नव्या नावाने दिले आहे असेहि तेथे म्हटले आहे. आमचे म्हणणे येथे इतकेच की, पानिपतच्या यशापयशाची चर्चा वेगळी आणि ग्रंथाच्या नावाची चर्चा वेगळी. ग्रंथाच्या नावाच्या चर्चेतील मुद्दे वाटले ते प्रारंभी दिले आहेत. पानिपत युद्धप्रसंगीच्या प्रारंभापासून तो अखेरपर्यंत भाऊसाहेबाच्या चुका झाल्या व शेवटी 'भाऊगर्दी' ह्या साररूपाने त्या फलित झाल्या, हे जरी चर्चेकरिता क्षणभर गृहीत धरले तरी त्यामुळे फार झाले तर 'भाऊगर्दीची बखर' असे नाव योग्य आवश्यक होईल. ग्रंथलेखकाचा सर्वच लेखनभाग आता समूचित ह्या आवृत्तीत आला आहे. वाचकानी ती ती वाक्ये तामसे अवश्य वाचून पाहावी व तेथील प्रसंग-वर्णन ध्यानात आणावें. असा भरवसा वाटतो की, भाऊसाहेबाच्या हातून जो काही केव्हा प्रमाद घडला असे ग्रंथलेखकाने सांगितले आहे तेथे कोठेहि भाऊसाहेबाविषयी दोषयुक्त लेश देऊन उणा शब्द वापरला नाही. उलट असेच आढळेल की, 'भाऊसाहेबांचे नेत्र दत्ताजीचा पराक्रम पाहून सतोषित जाले'; (३६-४३) 'भाऊसाहेब यास तोंड काय दाखवावे' असे दत्ताजी म्हणतात (६४-७३) व हे भाऊसाहेब म्हणजे बखरलेखकाच्या मते कोण तर 'भाऊसाहेब ईश्वरी अंश' (१३८, १५०).

'अंगावर ब्रह्मांड कोसळले तरी हिंमत हरली नाही. भाऊसो याजप्रमाणें पराक्रमी दुसरा होणे असाध्य गोष्ट.' १३४-३५ इ. इ.

बखर-ग्रंथलेखकानें 'रामचंद्रजी वनवासास गेल्यावर मागे दशरथास रघुनाथ वियोगाचें दुःख होऊन 'राम' 'राम' म्हणता शोक करून प्राणत्याग केला त्याप्रमाणें नानासाहेब भाऊसाहेबांच्या शोकें निधन पावले', 'नानसो भाऊसो अवतारी पुरुष,' 'रामभरताची सख्यता', 'मनुष्यलोकी यासारगें कोठेहि जाले नाहीत व पुढेहि होणें कठीण' (पृ. १४५) इत्यादि जेथे लिहिले तेथे त्या ग्रंथलेखकास भाऊसाहेब हेंच नाव अभिप्रेत नसावे असे मानणे कठीण आहे. (शि. इ. सा. भा. ३ प्र. पृ २) असो.

### ५. गर्दी शब्द व प्रयोग नवा नाहीं.

आमच्या मते 'गर्दी' ह्या शब्दाची जोड देऊन भाऊच्या दोषाचे सार सागण्याकरता 'भाऊगर्दी' असा शब्दप्रयोग बखरलेखकाने 'नवीन निर्माण' केला असेंहि मानण्याचें कारण नाही. एकाद्यास त्याच्या मृत्यूसाठी धुळीस किंवा भुईस मिळविणे व त्याकरता गर्दी करून जाणे ह्या अर्थी 'गर्दी' हा शब्द बखरवाङ्मयात व पत्रातूनहि आलेला आहे. 'गाव लुटून गर्दी करावी' म्हणजे गावची लूट करून त्याच्या पुढची पायरी, गावातील माणसे मारावी ह्या अर्थी तो प्रयोग खं. १ ले. २८६ मध्ये आला आहे दमाजी गायकवाड यानी राघोबादादाना लिहिलेल्या पत्रातहि ह्या अर्थानें हा शब्द आला आहे. बडोदा वेचे १ ले. ८०. ही दोनहि पत्रे भाऊगर्दीच्या वर्षातीलच आहेत. ह्यावरून गर्दी शब्दाने धूळदाण सागणे हे नाव नवीन नाही असे दिसून येईल. इतकेच नव्हे शिवकालापासून असा प्रयोग आढळतो. सभासद बखर पृ. ८, ११, ६४, ७०, ७४ पहा (इ १९९७).

मल्हारराव होळकर २ रे (इ. स. १७९७ सप्टे. १४ गुरुवार) हे दौलतराव शिंदे यांजकडून मारले गेले. त्यास 'मल्हारगर्दी' असे म्हटलें आहे. 'पातशाही गर्दी' असेंहि नाव आले आहे. साराश, श्रीशिवाजी महाराजांपासून तो महाराष्ट्र साम्राज्याच्या अन्तापर्यंत 'गर्दी' शब्द योजून मृत्यु सागणे हे सारखे घडत आलेले आहे. आणि येथेंच तेवढे 'भाऊ गर्दी' हे नाव मात्र भाऊसाचे दोष सागण्याकरता बखरकाराने 'नवीन' योजिले असे म्हणावयाचे हे सयुक्तिक ठरणारे नाही.

### ६. घराण्याच्या बखरी आणि शिंदे यांची बखर

घराण्याच्या बखर–किंवा कैफियत–लेखनासंबधी नियम म्हणून मानिता येईल असे एक वाक्य एका बखरीच्या प्रारंभी आले आहे. 'वंशाचा व कीर्तीचा विस्तार लिहितों' (हरिवं. ब. पृ. १) ह्या वाक्यात घराण्याची बखर लिहिण्यास लेखक का प्रवृत्त होतो, हें मोठे चागलें म्हणजे थोडक्यात व सपूर्ण सागितले आहे. वंशाला, एका व्यक्तीला नव्हे, पिढ्यानुपिढ्या कीर्तीचे साहचर्य पाहिजे, तर तें घराणे, तें 'वंशानुचरित' मी लिहीन, असे लेखक सागतो. (पुराणाच्या लक्षणात 'वंशानुचरितं' हें गणलक्षण आले आहे. पुराणांतील वंशावळीतून कीर्तिहीन व्यक्ति वगळल्या

आहेत). ज्या घराण्याने कीर्तिमान् माणसे समाजाला व देशाला, परंपरेने पुरविलीं आहेत म्हणजे जो समाज अशा घराण्यांनी किंवा व्यक्तींनी संपन्न व युक्त राहण्याची काळजी वाहतो तो समाज व देश सुस्थित होय. अस्तु तर होळकर घराण्याच्या कैफियतीप्रमाणे भाऊसाहेबाची बखर ही शिंद्याची कैफियत किंवा बखर म्हणतां येणार नाही. श्री. फाळके अपेक्षितात तशी शिंद्यांची बखर असावयास पाहिजे, तसे ते घराणे आहेहि. पण ह्या 'घराण्याची बखर' ही नाही. कारण कीर्तिमान् असून ना पूर्वज ना वंशज तसेच, भाऊसाहेब, रघुनाथराव, नानासाहेब, विश्वासराव ह्यांच्या कामगिरीचाहि निर्देश प्रस्तुत बखरीत आला असला तरी ही पेशव्याचीहि बखर नाही. ही 'भाऊगर्दीची' अथवा ह्यापेक्षा बरे नाव द्यावयाचें तर 'भाऊसाहेबांची बखर' हे आहे. पानिपतचीहि ही बखर नव्हे. का, तर लेखक सांगतो नजीबखानासारखा अगदी साधा प्यादा, वजीर असलेल्या भाऊवर फर्जी होऊन गर्दीचा मात करतो, हा काय प्रसंग! तर ती 'मात' मला सांगावयाची आहे. ही मात पानिपत ह्या पट-घरात झाली, म्हणून कथनीयतेचे गुण 'भाऊगर्दी' ह्या शब्दयुगुलात जसे आहेत तसे पानिपत ह्या अभिधेत नाहीत. एवंच ह्या बखरीचे नाव 'भाऊसाहेबाची बखर' हेंच सुयुक्त वाटतें.

**७. बखरलेखक व नकलाकार कोण ?**

ग्रंथाच्या नावाबद्दल ही स्पष्टता झाल्यानंतर ह्या **बखरीच्या लेखकासंबंधानें** थोडेसे लिहिणे आवश्यक आहे. प्रस्तुत आवृत्तीच्या प्रारंभीच ह्या बखरलेखकाबद्दल टीपेंत सांगितलेंच आहे कीं, ह्या गोष्टीचा अद्याप निर्णय लागलेला नाही. वर बखरीच्या नावाबद्दल लिहिले, त्यात एके ठिकाणी लिहिल्यावरून हे आपल्या ध्यानी येईल की, लेखक शिंदे घराण्याविषयी अधिक आत्मीयता असलेला असा आहे. बखरीच्या एका प्रतीत 'चिंतामण गोविंद' हे लेखक म्हणून नाव आलेले आहे. शिंद्यांच्या पदरी 'चिंतो कृष्ण' हा फडणीस म्हणून होता व त्याची पत्रेहि ह्या पानपतप्रसंगावधीतील छापली आहेत. तेव्हा तोच हा चिंतो असावा असा पक्ष शि. शा. ड ची साधनें भा. ३ च्या प्रस्तावनेत संपादक श्री. आनंदराव भाऊसा॰ फाळके ह्यांनी मांडला आहे. चिंतामणचे चिंतो होऊ शकतें; पण कृष्णाचे गोविंद कसे व्हावयाचे ? बरें, दुसऱ्या एका प्रतीत ह्या बखरीचा लेखक 'कृष्णाजी शामराव' हा आलेला आहे. एकाच बखरीच्या नकला असलेल्या ह्या दोन्ही लेखकाच्या व त्याबरोबर ज्याच्यासाठी ही बखर लिहिली त्याच्या नावात बदल होण्याचे कारण काय, ही पहिलीच मोठी अडचण वाटते. एखाद्या ऐतिहासिक मूळ पत्राची वा लेखाची नक्कलप्रत करताना अक्षर लागलें नाही म्हणून मुळाशी जवळ असलेले अक्षरवळण ध्यानी आणून कल्पनेने दुसराच शब्द लिहिणे हे घडू शकतें, पण 'व्यंकप्पा नाईक दिडोरे' या जागी 'गणेशपंत' आणि 'कृष्णाजी शामराव' ह्या जागी 'चिंतामण गोविंद' इतका बदल नकलकार कसा करू शकेल ? नकल करताना हवी असलेली भर घातलेली उदाहरणेहि आहेत. आणि अक्षरे न लागल्या

मुळे अगदीं वेगळें लिहिणें झालेलें अशीहि उदाहरणे आहेत. पण वरील फरक हा नकल करण्यांतला म्हणून अंतर्भूत होऊं शकणार नाही." फरक तर आहे. ह्या विरोधाचा परिहार श्री. फाळके ह्यांनी लेखकापुरता वेगळा दर्शित केला आहे. त्याचें म्हणणें कृष्णाजी शामराव हे चितो कृष्णाचें टोपण नाव मानावे आणि स्वत: चितो कृष्णाचें चितो गोविंद. हे कसें ? तर गोविंद व कृष्ण ही एकाच श्रीकृष्णाचीं नांवे आहेत असें गृहीत धरावे. बरें, हा फेर बराच असला तरी तो क्षणभर मानला; पण व्यंकापा दिडोरे या जागी नुसते गणेशपंत हें कसें उलगडावयाचे ? ह्या नांवाबद्दल त्यांनीं काही कल्पना चालविलेली दिसत नाहीं. आमच्या मतें ह्या असल्या विवेचनापेक्षा हा प्रश्न वादग्रस्त मानून अधिक संशोधन करावयास पाहिजे; असें म्हणणें हें अधिक प्रशस्त. ह्याबाबत चौकशी करता पूर्वीं वेळापूर (पंढरपूर-जवळ) येथे दिडोरे घराणे होतें एवढे कळतें. (दिंड–चें दिंडोरे वा दिंडोरी–चे दिडोरे होईल.) पंढरपूर येथील दिडोरे हे सावकारी व कापडाचा व्यापार करणारे घराणें आज असून त्यांच्या वंशावळीत व्यकटेश हें नांव आणि ते पानपतप्रसंगकालात येणारें असे आढळतें. ह्या नावाची त्या वंशावळीत एकदा आवृत्तीहि दिसून येते.

ह्या घराण्यांत पूर्वीपासून कापडाचाच व्यापार चालत आला असून आजहि तो व्यवहार हें घराणें करीत आहे. सावकारी करणाऱ्या ब्राह्मण घराण्याला 'नाईक' ही पदवी इतिहासकाली लाविली जात असे, हें सर्वश्रुत आहे. तसेच सावकारी, हुंड्याची देवघेव करणारे, कापडाची दिंडें घेऊन खरेदी-विक्री करीत हिंडत हेंहि सांगणें नको. ह्या घराण्याचा वेळापूर गांवाशी संबंध कसा हे त्याजकडून कळले नाही. तसेंच ह्या दिडोऱ्याची दिल्लीत एखादी पेढी असून तीवर कृष्णाजी शामराव असा कोणी गुमास्ता होता की काय, ह्याचा तपास घेतला पाहिजे. असा जरी नाममात्र सुगावा व्यंकापा नाइकाचा आज लागला तरी प्रत्यक्ष आधार म्हणून वहीतील उतारे वगैरे हाती आले नाहीत. तसेच एका प्रतींतील लेखकवाचकाची ही जोडी किंचिन्मात्र दर्शित झाली असें कल्पिलें तरी दुसऱ्या प्रतींतील गणेशपंत व चितामण गोविंद ह्या जोडीविषयी काय म्हणावयाचे ? पहिला प्रश्न हा की आधीचें नांव व्यंकपा नाईक किंवा गणेशपंत ह्यांच्या जोडीपैकी कोणाचेंहि असो; एकाच्या जागी दुसरें, एकाच

**दिडोरवंश**

**भवानीपंत**
|
**व्यंकटेश**
|
**लक्ष्मण** | **मनोहर** | **विठल**

(मनोहर यांचे पुत्र:)
**व्यंकटेश व** | **त्रिंबक**

(व्यंकटेश यांचे पुत्र:)
**श्रीधर**
|
**रामकृष्ण व नारायण केशव**
|
**विष्णु**
|
**रामकृष्ण**

ग्रंथाच्या नकलेंत कसे यावे ? अशा फरकाला नकल म्हणण्यापेक्षा नवीन रचना म्हणणें हे अधिक सयुक्तिक. एकदरींत ह्या बखरग्रंथाच्या लेखकवाचकाची बाब ही अनिर्णित व संशोध्य आहे, इतकेच म्हणून शोध करण्याम लागणे. एवढेच मुख्यत: सार म्हणून येथें सागणे आवश्यक वाटतें

ऐतिहासिक पत्रादिकाचा लेखक कोण हे, तसेच ती कोणच्या मायन्यात कोणाला लिहिलीं, हे कळणे अति आवश्यक असतें. तसेच ह्या बखरग्रथाच्या बाबतीत आहे; पण तितकें नाहीं. प्रत्यक्ष ग्रथात काय व कशा भाषेत सागितले, हाच ह्या ग्रथाकडे पाहण्यातला मुख्य भाग आहे. ह्या दृष्टीने प्रस्तुत ग्रथाच्या भाषेबद्दल पण आधीं ह्यांत आलेल्या इतिहासवृत्ताबद्दल थोडक्यात लिहू

## ८. बखरग्रंथ आणि पत्रें ह्यांचा जोड अभ्यास पाहिजे

प्रस्तुत हें एक मागणे येथे अवश्य वाटतें की, हा ग्रथ 'बखर' ह्या नावाने प्रसिद्ध होत आहे व परिचितहि आहे, ही एका अर्थी उत्तम गोष्ट आहे. म्हणजे असे की, 'बखर', 'कैफियत' असे काही म्हटले की, नाक मुरडून बाजूस टाकण्याची ही वस्तु, असा जो समज काही बखरींच्या योगाने झाला त्या समजाला उत्तर देणारे जे काही बखरग्रथ आहेत त्यातील सर्वश्रेष्ठ असा हा बखरग्रंथ आहे बखरीसंबंधानें असा जो ममज झाला म्हणजे करून दिला तो वास्तव इतिहासाच्या आस्थेमुळेच होय. इतिहामाचार्य राजवाडे ह्यांच्या इतिहासविषयक लेखानीं विशेषत: बखरीस अनुसरून जे त्यानी लिहिले त्यामुळे बखर म्हटली की टाकाऊ, बखरीचा अभ्यास म्हणजे वृथा श्रम, असा सर्वसामान्य वाचकाचाहि ग्रह होऊन बसला व तो सर्वस्वी चूक असेहि नाही. कारण काही बखरी तशा आहेतहि किंवा कोणचीहि बखर ह्या ममजाचे काही कमीअधिक अंशाने कारण असेलहि पण काही बखरग्रंथ असेहि आहेत की, त्याच राजवाडे याना अशा बखरीविषयी सतोषोद्गार काढावे लागले. राजवाडे यानी बखरीतील पत्र विपर्यास—काल-स्थल-व्यक्ति, प्रसग व कारण–विपर्यास—साधार आणि ओजस्वी भाषेत स्पष्टपणे दाखवून दिल्यामुळें, चिपळणकरांच्या निबंधमालेप्रमाणें महाराष्ट्र वाचकाची वृत्तीच बदलून म्हणजे बखरीवरील उठून अस्सल ऐतिहासिक पत्रावर खिळून गेली. ऐतिहासिक घटनांचे अधिकृत असे पहिले अभ्यसनीय लेख म्हणजे [1]पत्रे; व ती जमविणे, तीं अभ्यासणें, ती छापणें, त्या आधारे आत्मवृत्त ध्यानी आणणें, हे निदान जाणत्या जननेनें करावें, हा राजवाड्याचा आग्रह. इतिहास-वाङमयाच्या बाबतीत श्रद्धा व अभ्यासाचे स्थानच त्याना ह्याप्रमाणे महाराष्ट्रवाचकाचे बदलावयाचे असल्यामुळें तेव्हा म्हणजे पन्नास वर्षांपूर्वी तसा हल्ला [1]बखरग्रथावर केला व वरील ममज त्याअनुसार झाला. दुसरें

---

१ काव्येतिहासग्रथ-मासिकाच्या प्रसिद्धिपत्रकात मासिकाचा उद्देश सागतांना इतिहास म्हणजे बखरी छापणे (मोडक व साने इ. १८७८) एवढाच उल्लेख दोनदां पृ. १ व ३ वर दिला आहे. बखरग्रंथाना तेथें इतिहाससाधन म्हणून सांगून 'पत्रें' इत्यादि लेखाना 'किरकोळ' म्हटलें आहे.

हेहि येथे लक्षांत घ्यावे की, ज्या राजवाड्यांनी बखरीविषयी असा समज करून दिला व पत्रें अभ्यासात घ्या असे म्हटले त्याच राजवाड्यानी आपल्या इतिहाससाधनांतून बखरीहि छापल्याच; म्हणजे पत्राच्या सापेक्षतेनें बखरग्रंथ हे दुय्यमतिय्यम इतकेंच. पत्रे व बखरी ह्याची स्थानें ओळखून तो अभ्यास व्हावा एवढेच त्याचें म्हणणे.

### ९. प्रस्तुत आवृत्तिविशेष

पण आता राजवाडे याच्या अपेक्षेप्रमाणे ती कामगिरी सफल होत चालली आहे. ऐ०–पत्रांचे शेंकडो ग्रथ प्रसिद्ध झाले आहेत, निरनिराळ्या प्रकारे अभ्यासिले जात आहेत, त्या आधारें मोठमोठे प्रबंध-लेखन होऊं लागले आहे आणि खरेशास्त्री यानी सागितल्याप्रमाणे ज्यानी प्रत्यक्ष इतिहास घडविला व आपल्या लेखरूपाने तो लिहून सागून टाकला अशीं त्याची ती मूळ पत्रेंच आतां इतिहासाभ्यासाचा प्रमुख भाग म्हणून मानली जात आहेत. आतां ह्या मूलगामी इतिहासाभ्यासामुळें अशी वेळ आली आहे की, पत्रें जरी झाली तरी इतिहास-घटना मर्यादितच कथन करणार आणि विश्वसनीय आणि मान्य बखरग्रंथ हेहि मर्यादितच माहिती देणार. म्हणून दोहोंचाहि अभ्यास परस्परपूरक या नात्यानें व्हावयास हवा. शिवभारतात दादाजी कोंडदेवाचा आणि सभासदी बखरीत कान्होजी जेध्यांचा निर्देशहि नाहीं आणि पत्राधारें दोघाचा उल्लेखच काय पण कामगिरीहि विस्तृतपणे सागतां येते. साराश, पत्रांतील तपशील—व वर्णन—पूर्ततेसाठी बखरग्रंथ आणि बखरग्रंथांतील उल्लेखाना पत्राचे आधार व अशा परस्परपूरक सहयोगानें दोघांचेहि अभ्यसन व प्रकाशन व्हावयास पाहिजे. प्रस्तुत बखरग्रंथ अशा दृष्टीनेंच वाचकांपुढें सादर करण्याचा यत्न केला आहे. इत्यर्थ की, बखरग्रथाविषयीचा नुमता समज बदलविणारी ही बखर प्रकाशित होत नसून पत्राधारे ती कोठे व किती सार्थ आहे अथवा कितपत सुसगत वा विसगत आहे आणि पत्रे कोठे कोणची अधिक माहिती देतात हें लक्षांत आणून देण्याच्या नात्यानें हे बखर-प्रकाशन होत आहे.

### १०. ह्या बखरीचें भाषावैभव

ह्या 'भाऊसाहेबाची बखर' ग्रंथाचे हे सातवें प्रकाशन आहे बखरीच्या नांवाची चर्चा प्रारभी केली त्यात १८७९ ते १९३२ पर्यंत ५ आवृत्त्या ह्या बखरग्रंथाच्या निघाल्या हे आले आहे. म्हणजे पिढयानुपिढ्या ह्या ग्रथाच्या आवृत्त्या निघत आहेत, हेच एक ह्या बखरग्रंथाच्या श्रेष्ठतेचे गमक आहे. हें महत्त्व ग्रथास जें लाभलें तें त्यातील भाषा व रचना ह्यामुळे होय बखरीची भाषा तेजस्वी, सरस, बहुविध दाखले–दृष्टान्तादिकानी विविध माहिती देणारी आणि साहित्यगुणपूर्ण आहे. ही बखर लिहिणारा माहितीगुणाचा सराफ आहेच; पण वाङ्मयमूल्याचाहि तो सावकार आहे. अनेक संस्कृत, हिंदी सुभाषितें दोहरे त्याने वापरले आहेत आणि वाक्प्रचार व म्हणी ह्यांचाहि उपयोग तो सहज करतो. ह्यामुळे तो तो रस परिपुष्ट झाला आहे. वाक्य-रचनेचेहि कौशल्य त्याचें लक्षांत घेण्याजोगें आहे आणि शब्दभरणा तर अमूप आहे. म्हणून तेंच तेंच वर्णन पण नवीन वठले आहे.

युद्धवर्णनें तर ह्या ग्रथांत मुख्य व पुष्कळ. पण हा प्रत्येक सग्रामरस वेगवेगळ्या शब्दभाजनातून आणि त्या त्या युद्धस्थानाशी निगडित राहून देत राहिल्यामुळे भोक्त्या वाचकास समाधानप्राप्तीची ढेंकर आपोआप येते व पुन्हा ग्रथवाचनास तो लोभावतो.

**११. वाक्यविचार**

ह्या ग्रंथात जी वाक्यरचना आली आहे तींत तृतीयान्त कर्ता आणि कर्तरि-प्रमाणें क्रियापद अशीं वाक्ये पुष्कळ म्हणजे कर्मणि प्रयोगाने वाक्याला आरभ पण कर्तरि प्रयोगानुसार वाक्याचा शेवट; अशी वाक्ये हा, अधिकारी साने ह्यांनी एके ठिकाणी, भाषा-दोष म्हणून सागितला आहे. (सप्त प्र. प्रस्ताव पृ. ८). पण केवळ असे नाहीं. ह्या बखरीत अशी वाक्ये जेवढी म्हणून आली आहेत ती बारकाईनें लक्षात घेतलीं असतां अशा वाक्यातील कर्तरि तृतीया सकर्मक ऊन-प्रत्ययान्त धातुसाधित शब्द पुढें असलेली अशी असल्यामुळे म्हणजे—तृतीयेचा चरितार्थ किंवा तृतीयेचें सार्थक ह्या धातुसाधिताने होत असल्याकारणानें आणि त्याच तृतीयेचे प्रथमान्तरूपी पद पुढे अध्याहृत कर्तृपद म्हणून घेतल्यानें सर्व वाक्य बरोबर लागते. उदा० 'भाऊसाहेब याणी मुकाम करून [ ते ] तेथें राहिलें. (प १११ ); त्याने हिमत धरून [ तो ] सोबतीस होता ( १३६ ) तिने हत्ती बसवून पायउतारा होऊन बुणग्याचे सुमारे पलो लागली ( १३६ ); तें दादासाहेब याणी न ऐकतां कूच करून कुंभेरीचे रोखें चालिले (परि. २); सर्वत्रांनी विवेक करून [ते सर्व] जनकोजी सिंदे याजवर नजर देऊन राहिले (१७–२३), ' याप्रमाणें वकिलाने खचित करून [वकील] माघारे आले (२४–२७); येसाजी भोईटे याणी जागा सोडून पळो लागले ( ११३ ); सिंदे याणी ती जागा फते करून [शिंदे] शाहादाने वाजवीत खेतीवर उभे राहिले ( ११–१३ ) इ. ह्या सर्व वाक्यातून तृतीयाविभक्तिक कर्तृनाम त्यापुढील धातुसाधिताने सार्थकी लागले आहे व वर सागितल्याप्रमाणें त्याच तृतीयान्त नामाचें प्रथमान्त रूप हें त्यापुढें आलेल्या कर्तरी वाक्यासाठी अध्याहृत समजले म्हणजे सर्व योग्य होईल. ऊन–प्रत्ययी धातुसाधित पद पुढे नसतें आणि क्रियापद मात्र कर्तरी, तर तो दोष मानणें सयुक्तिक होते. अशी वाक्यें परि १३२, २६, २८, १३, २५, ७५, १४१ इ. ह्या ठिकाणी आढळतील एके ठिकाणी ता प्रत्ययान्त धातुसाधित येऊनहि तृतीयेचे सार्थक साधले आहे, 'साबाजी शिंदे यानीं.........तोंड न देताच निघोन आले' (५८).

परि. १२४ वरील ' खंडेराव नाईक निबाळकर याणी केवळ सती पडते तसे जाले आणि त्या मुड्यावर पडला.' ह्या वाक्याची रचना मात्र वेगळी झाली आहे. येथे 'यांणी' व 'पडला हे शब्द कायम ठेवून मधील संबंधित मजकूर जर जुळना करून घ्यावयाचा तर 'यांणी'च्या पुढें 'त्याम' केवळ सती पडते तसे होऊन [तो] त्या मुड्यावर पडला असे समजावयास पाहिजे म्हणजे 'त्याम' हा शब्द अध्याहृत घेऊन आणि–जाले–च्या जागी 'होऊन' शब्द घालून व जाले–पुढील 'आणि' शब्द गाळणे पण इतकें करण्यापेक्षा 'याणी' हा एकच शब्द अभावात काढला व कर्ता व क्रियापद अनेकवचनी केले म्हणजे वाक्य व्याकरणशुद्धहि होते व अर्थहि लागतो. त्याहिपेक्षा ह्या वाक्यावरील टीपेंतील पाठ घेणें हें सर्वात उत्तम कारण त्यामुळे, मेहेंदळे ह्यांच्या

मुड्यावर पडोन मुडदा सोडविला; ह्यापेक्षा, मेहेदळयाचें शिर कापावयास आलेल्या शत्रूवर पडोन मुडदा शिरविहीन करू न देता तो सोडविला, हा अर्थ सागणारा पाठ उत्तम व स्वीकार्य होय असो. प्रस्तुत इत्यर्थ की, कर्मणि प्रयोगानें प्रारंभ केलेल्या वाक्याचें ऊन–प्रत्ययान्त धातुसाधितानें सार्थक साधून कर्तरि प्रयोगात शेवट होतो व अशा प्रकारे बखरीत आलेली असली वाक्ये व्याकरण-दुष्ट ठरत नाहीत.

पेशवे-कालीन लेखनाचा ही वरील वाक्ये हा विशेष आहे. 'त्याणी यास घेऊन साताऱ्यास गेले.' (ह. ब. पृ ६) 'याणी निराळे एक्या पालात जाऊन निजले' (हरि. व. ब. पृ १२). अशीच वाक्यें सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रातहि आली आहेत. म्हणजे ह्या सर्व वाक्यातून गौण व मुख्य अशी दोन वाक्ये मानून ऊन–प्रत्ययान्ताशी तृतीयेचा संबंध असलेले गौण किंवा उपवाक्य आणि पुढील कर्तरि हें मुख्य वाक्य समजावयाचे.

तृतीया विभक्तिक कर्तृपदाबद्दल विवेचन चालू आहे म्हणून येथेच लिहितों, प्रथमार्थी तृतीया 'याणी (दादासा) तो आपले भरावर गेले' असा एक पाठ पृ. ३ परिच्छेद ४ वर आला आला आहे. येथे कर्तरि प्रयोग स्पष्ट असून ऊन–प्रत्ययान्त धातुसाधित म्हणजे उपवाक्य वगैरे काही नसून तृतीया विभक्तिक कर्तृपद आहे. 'ज्या गोष्टीचा तो आर्ज आम्ही साहेबास करावा ते समयी आपण अव्हेर करावा' (पृ. १०५ परि. १०५) ह्या वाक्यात जसे एकदम जर–तर ह्यापैकी तर हेच एक अव्यय घालतात व मागे योग्य त्या जागी जर–ची सूचना अपेक्षितात म्हणजे तें आहे असे समजले जातें' त्याप्रमाणें येथील वाक्यात प्रथमच 'तो' घातला आहे आणि क्रियापदाची रूपें विध्यर्थी पण अर्थतः प्रयोग स्वार्थी आहे. येथे असेहि म्हणतां येईल की, 'तो'चा संबंध अर्जाकडे न घेता तें कालबोधक अव्यय मानावयाचें (जेव्हां केव्हां) ज्या गोष्टीसाठी (जो आवश्यक) तो अर्ज० 'करतो' आपण० 'करता'. म्हणजे रूप विध्यर्थी आणि रीतिदर्शक प्रयोग स्वार्थी अशी ही वाक्यें मानावीं.

स्वार्थी प्रत्ययाचा संकेतार्थी प्रयोग :—'आसें करिता कोणी कुमक न करीत तरी तुम्ही मोगलाई मसलत करून यश संपादावें (पृ. १२ परि. १५). ह्या ठिकाणी 'करीत' हा स्वार्थी प्रयोग 'केली' ह्या अर्थी आहे. 'केली हा संकेत भूत होय. ह्या वाक्यांत 'करिता' हे ता–प्रत्ययान्त वर्तमान–कृदन्त अव्यय 'करून' ह्या ऊन–प्रत्ययान्त धातुसाधिताच्या अर्थी आलें आहे. अशाच ता–प्रत्ययान्ताचा भाववाचक नामाप्रमाणेंहि उपयोग केला आहे. 'परतु जाबसाल 'करता उत्तम आहे' (परि. ९ पृ ६) म्हणजे जाबसाल 'करणे' हे उत्तम आहे

१२. प्रयोग व क्रियापदाविषयी थोडासा विचार केल्यानंतर आतां इतर नाम, अव्यय इत्यादि विषयी पाहू. 'त्यात वांचले ते दाहानी पांचानी आगरियास पोचले' (पृ ९१ परि. ९०) ह्यातील 'दाहानी पाचानी' ही प्रथमार्थी तृतीया आहे. म्हणजे 'जे वांचले ते दहा-दहा, पांच-पाच याप्रमाणे आगऱ्यास आले. अगदीं ह्याचप्रमाणें संस्कृतात असे प्रयोग आले आहेत. 'प्रायेण याज्ञिकः।' 'गोत्रेण

गार्ग्यः ।' किंवा 'शतेन शतेन वत्सान्पाययति पयः ।' गुराखी शभर शभर वासरे नेऊन याना पाणी पाजतो. 'अलं श्रमेण' इत्यादि. तृतीया विभक्ति ज्या सात-आठ प्रसंगी आवश्यक म्हणून मागितली आहे, त्यात 'हेत्वर्थे तृतीया स्यात् ।' ह्या नियमाच्या पोटांत हे वरील वाक्य यथार्थपणे बसतें 'ऐशा संकटांतून फौज भागीरथीस पार गेली' (६४–६०) येथील 'भागीरथीस ही षष्ठ्यर्थी चतुर्थी आहे. 'शहरात दाहा हजार गिलच्यानी मारिले' (२७–३०). 'एवढें असाध्य दुर्ग निर्माण केलें होतें. (३०–३३) ह्या दोन्ही ठिकाणी क्रियापद नपुंसकलिंगी आहे. पण त्याची कारणे वेगवेगळी आहेत. पहिल्या वाक्यात 'मनुष्य' हा शब्द अध्याहृत घेऊन तो नपुंसकलिंगी मानावयाचा आहे आणि दुसऱ्या वाक्यात दुर्ग शब्द प्रत्यक्ष असून तो संस्कृतप्रमाणेच नपुंसकलिंगी लेखकानें योजिला आहे पहिल्या वाक्यात 'मनुष्य' हा शब्द अध्याहृत मानला तर मारिले ह्या क्रियापदावर अनुस्वार नको आणि जर अनुस्वार मानला तर, 'जातौ' 'एकवचन' व 'सामान्ये नपुंसक' ह्या न्यायाने मनुष्य शब्द इष्ट मानावा लागेल. दुसऱ्या वाक्यात 'दुर्ग' शब्द संस्कृत न मानता मराठी मानिला तर तो पुल्लिंगी समजला पाहिजे आणि मग 'केले होते' ह्यातील दोन्ही अनुस्वार काढावे लागतील. परंतु 'आग्रा' ह्या एकाच किल्ल्याबद्दल लेखकास सांगावयाचें असल्यामुळे दुर्ग शब्द एकवचनी आहे व मग तो संस्कृताप्रमाणे नपुंसकलिंगी एकवचनी धरला तर 'केले होते' हे दोन्ही अनुस्वार मराठीच्या नियमाप्रमाणें सार्थ होतात.

गळन शब्द असलेली म्हणजे अध्याहृत शब्द घ्यावे लागतात, अशी कांहीं वाक्यरचना आहे व ह्या अध्याहृतात सविभक्तिक नामाप्रमाणे (रघुनाथराव दादासाहेब परम विषाद येऊन [त्यानी] कुंभेरीस मोर्चे लाविले (परि. ४) संयुक्त क्रियापदातीलहि एकादे पद अध्याहृत घ्यावें लागते. 'परंतु, किल्ला कोणास आला नाही' (पृ. ३० परि. ३३). ह्या वाक्यात 'घेता' हा शब्द अध्याहृत घ्यावा लागतो व तो घेतल्याने संयुक्त क्रियापद सकर्मक होते. नुसते 'आला नाही' हे अकर्मक आहे; पण 'घेता' हा ता-प्रत्ययान्त 'घे' धातूचा कृदन्त समाविष्ट केल्यानें हा प्रयोग सकर्मक होतो.

'पूर्ववत्प्रमाणे' १४–१९, २६–२९ असे एका अर्थी दोन प्रत्यय लागलेलेहि शब्द आढळतात. फारसी-संस्कृत संयुक्त रचनाहि आढळते. 'मी......अटके आलिकडील मुलूख देखील दक्षिण देशास समुद्रवलयाकित पृथ्वीचें स्वामित्व केलें (पृ. १९–२५). 'देखील दक्षिण' व दक्षिण 'देशास (ह)' असे दोन्ही भाषेतील एका अर्थी प्रयोगरचना आली आहे. आणि ह्यातहि देशासह–ह्यातील 'देशास' हा शब्द लक्षांत घेण्याजोगा आहे. 'सैन्येनसह' ह्याचे जसें 'सैन्यानिशी' झाले त्याच प्रकारें 'देशासह' चें 'देशास' एवढेच रूप झाले आहे. फारसी शब्दाला संस्कृत प्रत्यय 'निखालस-ता' देखिली (प.१२६). ह्याच शब्द 'निखालसपणे' ह्या अर्थीहि म्हणजे तृतीया विभक्तिकहि आला आहे (प. १२६).

ह्या ग्रंथामधील 'तों' ह्या अव्ययाचे अर्थ पुष्कळच दिसून येतात. 'तो' गिलच्या पलीकडे यमुनेचे तीरी नदीपार कोळजळेश्वराजवळ मुकाम होता' (१०२-१०३) येथें 'करून' हे गळंत आहे. अथवा 'गिलच्या-चा' असें मानावयास पाहिजे. व 'तों' समानकालिक क्रियाबोधक किंवा एकसमयावच्छिन्नक्रियाबोधक अव्यय आहे. 'तों दिलीचे किल्यात रोहिले व गारदी नजीबखान याजकडील चार हजार लोक किल्यात होते.' (परि.-१०४) येथें 'किल्यात' शब्द वाक्याच्या आद्यन्तीं आला आणि 'तों' हे अव्यय एककालिकस्थलदर्शक आले आहे. 'तों इकडे दत्ताजी शिंदे घायाळ खाली उतरले' (परि.-७८). ह्या वाक्यातील 'तों' हें वाक्यारंभक आहे.

'म्हणोन' ह्या क्रियार्थक ऊनप्रत्ययाचा 'असा, असे' ह्या सामान्य नामासारखा उपयोग केला आहे. 'मग भाऊसाहेब यांणी विचार केला कीं, अंतर्वेद प्रांती फौज पाठवावी. भागीरथीचे पुलावरून दुराणी रसद आणील ती मना करावी म्हणोन मनसुबा करून हातरोखा पाठविला' (प.११६); 'मल्हारराव यांणी उत्तर केलें की, हा विचार बलवंतराव यास विचारावा; आमची साठी बुद्धि नाठी जाली, म्हणोन बोलून कानावर हात ठेविले' (प.११२) 'की व म्हणोन' ह्याचा कारणबोधक उभयान्वयी अव्ययाप्रमाणें उपयोग केलेला अशीहि वाक्ये ह्या ग्रंथात आहेत व अन्यत्रहि आढळतात पण तेथे पहिले वाक्यच पुनः उद्धृत केलेले असते. 'आपला भाऊ सुलतानखान यास खंदारास पाठविलें—कीं, दिलीचे पातशहास तुमचे हस्तगत करून चंदाजमानी तुझ्या मुलास देऊन पातशाहीहि देईन म्हणोन भावास—खंदाहारास पाठविलें' (२५-२७.) 'भाऊसाहेब याणीं इमान दिले की, तुम्ही जेथें उडी टाकोन राहाल तेथें आम्ही कतल होऊन म्हणोन इमान प्रमाण दिल्हे' (परि १२६). ह्याप्रमाणेंच १२५ पानावर वाक्य आले आहे

'तर, तरी' हें अव्यय विरोधार्थक व संकेतार्थक ह्या दोन्ही प्रकारें वापरले आहे व त्याच्या लेखनाविषयीं साने यानी लेखन-भेदहि दर्शित केला आहे पण 'इदूदन्ते दीर्घ.' ह्या त्यांच्याच नियमाप्रमाणें विरोध येतो म्हणून तो नियम येथें पाळला नाहीं असे दिसतें. पण अपवाद म्हणून व इतर असे लेखनिक संकेत इष्ट आहेत.

'जनकोजी शिंदे जखमी बायकामुलें लुटल्या' व 'मुलें बायका आली आहेत' अशीं दोन वाक्यें एकाच पानावर (पृ. ८२) आलीं आहेत. 'अंग रोमांच जालें' (परि.११०) 'त्यांचीं मुलें व माणसें द्रव्याचे आशेने बोटास पलिते लाविले की (प.१११), युद्धाचे धुंदीत घाबरी होऊन अवघें लक्ष पुढेच होतें' (१३१-१३१), 'ती पळोन लष्करात दाखल जाले' (१३१) असे व्याकरणविषयक कितीतरी भिन्न भिन्न प्रयोग ह्या बखर ग्रंथांत आले आहेत. त्या सर्वांचा विचार करणे येथे आता शक्य नाही.

१३. व्याकरण-विचारापेक्षां ह्या ग्रंथांत आलेले वाक्प्रचार व म्हणी आणि विशिष्ट, शब्दयोजना फारच फार उद्बोधक आहेत. त्यांचा तत्कालीन व्यवसाय, सामा-

जिक नीतिनियम, राजकारण वृत्ति, धार्मिक दृष्टि इ. समजून येण्यास फार उपयोग आहे. लेखकाने मुसलमान लोकांच्या तोंडी जी भाषा घातली आहे ती लक्षात घेतली पाहिजे. फारसी व उर्दू इ. मुसलमानी भाषा न घालता संस्कृतमिश्र हिंदी किंवा मराठी हिंदी भाषा वापरली आहे. हीहि गोष्ट विचारात घेण्यासारखी आहे.

ह्या ग्रंथात 'विषाद' शब्द जितक्या ठिकाणी आला बहुतेक तितक्या सर्व ठिकाणी त्याचा अर्थ 'क्रोध' असा आहे. मूळचा अर्थ 'खेद, दुःख' हा आहे. भाऊसाहेबास दत्ताजीचा वध करणाऱ्या कुतुबशहास पाहून 'विषादाग्नि' शमेनासा झाला होता (११०–११०); 'पुत्रशोकाचा विषाद मल्हारराव यास येऊन प्रतिज्ञा करिता झाला की, सुरजमल जाट याचा सिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेत टाकीन तरीच जन्मास आल्याचें सार्थक. इ (४–५); तेव्हा किलीजखान यास (आपणास दक्षणी बंदर–वानर म्हटल्याचा) विषाद आला. तळव्याची आग मस्तकास जाऊन बोलिला की, आजपासून सहा महिन्यात पातशहा आदिकरून कुल दिलीस कर दिखलाऊं' इ. (२२–२६); इ. इ. दत्ताजी शिंद्यास अबदालीने ठार केल्याचे ऐकताच भाऊसाहेबानी म्हटले 'ज्याचा सेवक गांजिला त्याचा जालेपणाची निर्फलता' ९३–९१) त्या वेळचा स्वामी-सेवक-संबंध असा होता म्हणून "अमृत स्वामिगौरवम्" असे त्या काळचे अभिलषित होतें. तात्पर्य, पदरच्या एकनिष्ठ सरदारमित्राचा मृत्यु वा पुत्रशोक वा अपमान ह्यामुळे नुसतें वाईट वाटणे हेच वाईट होय. ते वाईट करणाऱ्याविषयी संताप उत्पन्न होणें व प्रतिकाराला लागणे येथेंच त्या वाईट वाटण्याचें पर्यवसान आहे. विदुलेनें पुत्रास त्याचा बाप व राज्य गेल्याचा नसता शोक काय करीत बसलास असे जे म्हटले किंवा चुलता धोंडोपंत मेल्याची उत्तरक्रिया धोंड्या वाघाला मारल्याशिवाय करण्याची अनुज्ञाच बापू गोखल्याच्या चुलतीने दिली नाही, ह्या गोष्टी येथे लक्षात येतात. सारांश, विषाद म्हणजे दुःख देणाऱ्या अपराध्यास शिक्षा करण्यास लावणारा संताप, हाच अर्थ बखरलेखकाने सांगितला. तोच त्या त्या प्रसंगास उचित आहे. एऱ्हवी लेखकाने जेथें अन्य शोकप्रसंग वर्णिले तेथे विलाप रडणे असलेच शब्द दिले आहेत. तेथे विषाद शब्द क्वचितच घातला किंवा पति–मत्यूमुळे पत्नी सती निघाली तेथेहि हा शब्द त्यास सुचला नाही. मराठीतील हा विषाद शब्दार्थ जर संस्कृतमध्ये असता तर, युद्धास प्रवृत्त करणाऱ्या गीतेंत भगवतानी त्या 'विषादी'स–तामस गुणाचा असे म्हटले नसते. 'वानरी तेल' हा एक असाच संकेत पृ. २–२ वर आला आहे. ह्याचा नेमका व पुरता उलगडा होत नाही. कोशगत अर्थ येथे सर्वस्वी जुळत नाहीत—'सर्वनाश' हा अर्थ पंचतंत्रकथेनुसार तेथें दिला आहे. पण त्या कथेनुसार घडलेले नाहीं (कपीना मेदमा०) दर्शित आहेत. (ह्याविषयी पुढे पहा.) मुगीस पंख फुटणे (४–५). हा दृष्टान्त ठीक आहे. उत्तरेतील राजकीय परिस्थिति सांवरण्याऐवजी घसरत व चिघळतच चालली, हे ह्या 'वानरी तेल' प्रकाराने लेखकास सुचवावयाचे आहे असे दिसते. वानराला झालेल्या जखमेत ती बरी होण्यासाठी तेल घालताना ती जखम दुसरा वानर अधिक फाडतो

तसा प्रकार होणें म्हणजे वानरी तेल प्रकार हा अर्थ कोषात दिला आहे व तो सामान्यतः जुळतो.[1]

'गाळवाचे पिकाप्रमाणें शिरे कापली', 'इक्षुदंडातून शर्करा निघावी त्याप्रमाणें ऊधमातूनच नवनीत मिळावें' (ऊधम् = कांस. ऊधम् ह्याचेंच चुकीचें वाचन तुदगीच तुपगीच हें झालेले दिसतें) ७२–७७, भाणवमात ससा सांपडावा' ४४–५२; 'राडेनें सावले हुसकले' ७५–७९ टीप पहा. 'टाक्यांनी दगड फोडावा तसा तटस्थ' (टांकीने घाव घातला तरच एखादी कपरी निघावयाची, नाहीतर नाही असा धोंडयासारखा तटस्थ) ९२–९१. इत्यादि इत्यादि किती तरी विविध चटकदार दृष्टान्त ह्या बखरीत आले आहेत. ह्यातील काहीं शब्द कोशात म्हणजे शब्दसूचीत समाविष्ट केले आहेत ते पाहावे.

बखरींतील ऐतिहासिक वृत्तान्ताविषयीं लिहिणें अवश्य; एका अर्थी नकोहि. कारण प्रकरणवार कालपट दिलेच आहेत.

बखरीच्या लेखकासंबंधानें किंवा कथक-पृच्छक जोडीसंबंधानें पृ. १३–१४ वर लिहिले. त्याच बाबतीत हें एक सांगावेसें वाटतें की, ग्रंथ एकच पण पृच्छक व कथक ह्यांची नावें वेगवेगळी येतात ह्याचे कारण, इतिहासकालीं ग्रंथादिकांच्या नकला लिहून देणें हा स्वतंत्र व प्रतिष्ठित व्यवसाय होता. अशी एखादी नक्कलप्रत ज्यानें करण्यास सांगितली व म्हणून ज्यानें प्रत लिहून काढली त्या दोघांची नावें प्रतीत प्रारंभी दाखल केली व ह्यामुळे एकाच ग्रंथाचे भिन्न पृच्छक व कथक येणें संभवनीय आहे.

**बखरलेखन :**—बखर म्हटली की ते [1]लेखन गद्य-गद्यप्रधान असावयाचें; [2]मुख्यतः विषय व्यावहारिक असावयाचा—धार्मिक, पारमार्थिक, भक्तिपर नसावयाचा—[3]लिपी, विषय व्यावहारिक व लेखन गद्य असल्यामुळे मुख्यतः मोडी असावयाची; [4]भाषा मराठी व [5]काल यादवोत्तर. विषय व्यावहारिक म्हणजे राजकीय सत्ताप्रधान अथवा जीवनविषयक वृत्तान्त देणारा असा. अशा वाङ्मय-प्रकारचें मूळ पाहताना ज्यानी सत्ता संपादण्याचा व ती नांदविण्याचा यशस्वी उद्योग केला त्या समाजाचें वाङ्मय पाहणे आवश्यक व उपयुक्त. ह्या सत्तेसाठी चाललेल्या व सत्तेने चाललेल्या

---

१ म. सा प. वर्ष १६ इ. स. १९४३ जानेवारी १८६४ पौष अ. १ पृ ३०–३१ वर प्रा. पोतदार म्हणतात—वानराप्रमाणें मराठ्यांचा पातपतवार नाश झाला, एवढा मोघम अर्थ बरोबर; पण तेवढ्यासाठी वानरी तेलापर्यंत दृष्टि पोंचविण्याची काहीच आवश्यकता नव्हती. बखरकारास नाशाची कारणेंहि सुचवावयाची होतीं. त्यातील एक 'गृहकलह'.

हालचालीचें वृत्त म्हणजे इतिहासवृत्त. असें वृत्त लिहून ठेवण्यामारखीं कृत्यें ज्यानीं केली त्यांत राजस्तानातील रजपुतांप्रमाणे महाराष्ट्रीयाचा समावेश, अलीकडल्या कालाला अनुलक्षून बोलावयाचें तर ते अग्र आसनाचे अधिकारी म्हणून, करावा लागेल. इतर प्रातीयाना असे राजकीय जीवन निश्चितच आहे. पण अखिल भारताच्या राजकारणाला हात त्यानीं घातला हे दिसून येत नाही. आतां 'याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।' ह्या न्यायानें महाराष्ट्रीयांना ते किती प्रमाणांत पेलतां आलें आणि पानिपतावर जी आपटी बसली त्यावरून काय बोध घ्याव-याचा तो घेतलाच पाहिजे. प्रस्तुत इत्यर्थ की, वर सागितलेल्या बखरवाङ्मयाची रचना महाराष्ट्रातल्याप्रमाणे मराठीत व राजपुतान्यात हिंदीत झालेली असणार; इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रातल्या अशा हालचालीपूर्वी राजस्थानात वगैरे हालचाली झाल्या असल्यामुळें ह्या वाङ्मयाचा प्रारंभ महाराष्ट्रात होण्यापूर्वी तो उत्तरेकडे राजस्तानात झाला असावा, असेहि साहजिक वाटतें. पण राजकीय सत्ताधारित्व एवढें एकच सामान्य लक्षण रजपूत व मराठे ह्यात आढळलें तरी तिकडील असे लिहून ठेवलेले जे 'रासो'--ग्रथ आहेत ते व मराठी बखर एक होत किंवा इकडील बखरीचें पूर्वरूप तिकडे असेल, असें म्हणणें कठिण आहे. बरें, ह्या विचाराचे वेळी घराण्याचें सुविस्तृत वृत्तान्त देणाऱ्या रासो ग्रंथांचा विसर करून कसे चालेल. पण रासो ग्रथ पद्यात्मक आहेत व ऐतिहासिक तथ्यापेक्षां कल्पनाविस्तारच त्यात अधिक आहे आणि ह्याचे लेखक भाट चारण आदि असत. 'ख्यात' हाहि बखरसमान वाङ्मयप्रकार हिंदीत आहे, हेहि म्हणणे तसेच कठिण आहे. कारण अशा नावाचा वाङ्मयप्रकार बखर-तुल्य म्हणून तिकडे मुळातच नाही. मुख्य ग्रथ जे 'पृथ्वीराज रासो', खुमाण रासो, विलसदेव रासो, हमीर रासो,' हे सर्व ग्रथ पद्यमय आहेत; गद्य नाहींत ही पहिली गोष्ट. 'वार्ता' ह्या नावाचें वाङ्मय हिंदीत आहे पण तें धार्मिक आहे हिंदीत 'लावणी' ह्या नावाचा वाङ्मयप्रकार अर्थात् पद्यरूप आहे. पण त्यात नावाला व दुरूनहि शृंगार नाही, केवळ ईशभक्तिपर तें वाङ्मय आहे; पोवाड्याचें मूळ हिंदीत, हेहि विधान टिकणारे नव्हे. मुख्य गोष्ट की, हिंदीत गद्याला प्रारंभच मळी फार अलीकडे म्हणजे इतिहासकाल संपल्यावर झाला. शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग २ मध्ये 'खाडेराय रासो' हा छोटा ग्रंथ आला आहे; पण तोहि पद्य आहे. ह्या 'रासो' ग्रंथांचा राजवाडे यानी उल्लेख ऐतिहासिक प्रस्तावना ह्या ग्रंथात केल्याचें आढळतें पण तो त्या ग्रंथातील राजावलीला उद्देशून आहे साराश, की, बखरीचें मूळ मुसलमानी वाङ्मयाहन्यांत आहे, हिंदीत नाहीं.

बखर काय किंवा कैफियत काय, मूळ लेखकाची प्रत हाती आलेली नाहीं सांपडल्या त्या सर्व नकलाच आहेत आणि 'उत्तम अक्षर आणि वितान्न ब्राह्मणांचे हातें प्रती करून घ्या' (खं. १ ले. २८) अशी 'जी दक्षता व काळजी संस्कृत (वा मराठी पद्य) ग्रथ नकल करताना घेतलेली दिसते तशी ह्या नकलांच्या बाबतीत घेतल्याचे दिसत नाहीं.

उत्तम व महत्त्वाचीं पत्रे आणि सनदा, तसेच बखर ग्रंथ ह्याच्या नकला संग्रह-बुद्धीनें केलेल्या आढळतात. त्यात दोन्ही साधण्याकडे कल. अक्षर घटवणे व ग्रथा-दिकांचा संग्रह.

हे **बखर-लेखन** ओळीपुढे ओळ काढून एकसारखें अतूटपणें सलग केलेले असतें. त्यात शब्द-तोड नाही, विरामचिन्हे नाहीत, परिच्छेद नाहीत, प्रकरणाचीहि वेगळीक दाखविलेली नाही आणि असे हे मोडीतील बखर-लेखन दोन-दोनशे पानें केलेले आहे. सामान्यतः ही पाने एकापुढे एक चिकटविलेली असली तर कागदाच्या मागील बाजसहि लेखन केलेले असतें. तसेंच लेखनातहि मोडी लिपीच्या स्वभावाप्रमाणे इकार दीर्घ व उकार ऱ्हस्व असतो. बाळबोधीप्रमाणे जोडाक्षरे फारकरून नाहीतच. कारण मोडीत अर्धाक्षराला वाव कमी.

मोडी लिपीतील असे हे बखर-लेखन असलें तरी बखरकार जेथे शेकडो पानें एखादे मोठे वृत्त व कथाभाग लिहितो, तेथे, अमक्या ठिकाणी अमुक मुद्दा सपला, येथून नवा विचार सांगावयाचा आहे, ही एक उपकथा झाली. इत्यादि प्रकारें आपल्या लेखनातील वेगळेपण, तसेच एकाद्या प्रसंगांत मागील अनुसधान सागणे हे त्याच्या पद्धतीप्रमाणें पण सागितलेलें असते आणि असणार हे अगदी अवश्य व उघड आहे. त्याची ती पद्धत मात्र लक्षात घेतली म्हणजे आताच्या लेखनपद्धतीनुसार परिच्छेद, विरामचिन्हे, अवतरणे, सदर्भवाक्य दर्शविणें इत्यादि सस्कार करतां येतील. उदाहरणार्थ, प्रस्तुतच्या ह्या भाऊसाहेबाच्या बखरीचेंच लेखन पहा--सध्या जे १८ प्रकरणांत १५२ परिच्छेद करून ही बखर प्रकाशित होत आहे ह्यातील बखरकाराची परिच्छेद-दर्शनरीति अशी आहे 'अस्तु, असो' असे जेथे आले आहे तेथें समजावें की, आता यापुढे लेखकास नवा विचार सागावयाचा आहे. 'तों इकडे फिनुराची पत्रें चौकसीत सापडली' किंवा 'तों हिदुस्थानांत असे वर्तमान जालें की,' असें जेथे लेखन झाले आहे तेथेहि लेखक आतां निराळी माहिती सागत आहे हे समजावें. त्याचप्रमाणें 'यानंतर इकडे पार्वतीबाई', 'उपरातिक चार घटकापर्यत', 'नंतर त्याचे दिवसाचे कचेरीस', 'या प्रकारे क्षेत्राची चिधीचोळा करून (अबदली) गौघाट इ इ.' जेथे लिहिले तेथे तो कथा भाग वेगळा आला हे समजावे. अशा रीतीनें बखरकारानें आपल्या लेखनातील विविक्तता व अधिकरणे वेगवेगळी कोठे कोठे केली तें दर्शित केले आहे. अशा रीति सामान्यत: अकरा मला आढळल्या. 'अस्तु' व 'याप्रमाणें' ८,८; 'नतर' १०, 'तों' २८ 'इकडे' ३७ व स्वतत्र ३९, 'एक दिवशी', 'हें ऐकून', 'त्या समई' ३ 'मग ४, 'हे वर्तमान' ११. ह्या रीतीत 'स्वतंत्र' म्हणून जो परिच्छेद-रीति-विभाग आहे त्याविषयी स्वतंत्रच सागितले पाहिजे. कारण ह्या परिच्छेदाना 'तो, मग, नतर' असले काही प्रारंभदर्शक अव्यय आलेले नाही व अशाची संख्याहि अधिक आहे. ह्या विभागाची ओळख करून घेताना, पहिले बोलणें संपविलें कसें व दुसरे बोलणें सुरू केलें कसें, ह्या दोन्ही गोष्टी पाहिल्या पाहिजेत.

एरवी नुसता नवा परिच्छेदारभ पाहून ओळखीचे काम भागणार नाहीं. जुन्या परिच्छेदाचा शेवटहि ध्यानी घेणे प्राप्त. आणि ही शेवट आणि प्रारभ पाहण्याची गोष्ट इतरहि सर्व परिच्छेदाच्या वेळीं उपयोगी पडण्याजोगी व आवश्यक आहे. 'यासि तों मोहग इरेस पडला तसेच हेहि इरेस पडले' असे सागून 'नागुरात बिजेसिग यांणीं विचार केला की, 'हा नवा विचार सागण्यास प्रारंभ केला. (परिच्छेद १५). 'असें बोलून गंगाधरपत यास वाटेस लाविले' अशी पहिल्या बोलण्याची समाप्ति केली व नतर, 'मल्हारराव यानी वर्तमान ऐकोन' ह्या वाक्याने दुसऱ्या बोलण्यास सुरुवात केली (परि. ४८); 'आपले जागा स्वस्थ राहिले' असा जुना मुद्दा सागून पूर्ण केला व नंतर 'नजीबखान याणें कूच करून शुक्रतालास गेला' ह्या नव्या मुदद्यास प्रारभ केला; (परि. ५५). 'तसेच जखमी बहुत जाहाले. याप्रमाणें यश पावले' येथे एक हालचाल झाली व नंतर, 'जनकोजी शाहादानें वाजवीत गोटास चालिले भाऊसा आडवे आले' ही दुसरी हालचाल लेखक सागू लागला. ह्याप्रमाणे जुन्या व एकसारखे धावतें लेखन असलेल्या बखरग्रथांत परिच्छेद, प्रकरण, कोठे आहे, जाड ठसा कोठें वापरावा, संदर्भदर्शक डॅश टाकून ती दाखविण्याजोगी वाक्ये कोणची, हे कळण्याची सोय आहे. आता हे खरे आहे की, निरनिराळे कंस, नक्षत्रचिन्हें, टीपा देणे इत्यादि प्रकारे लेखनांत व छपाईत सुधारणा व वाढ पुष्कळच झाली आहे व ज्ञानाची ही प्रगति संतोषजनक आहे. पण ही ज्ञानाची वाढ आहे. ( अज्ञानातून ज्ञानात आलों असे नाही ) जुन्या वाङमयलेखनात ही जी ज्ञानाची ईयत्ता होती तीन परिच्छेदादिकाची व्यवस्था अशी होती. येथे आणखी एकदोन गोष्टी उल्लेखनीय आहेत. परिच्छेद ५५ मध्ये दत्ताजी शिदे ह्यांनी गडमुक्तेश्वरी जाऊन स्नानादि तीर्थयात्रा केली व हे सागतांना बखरकाराने 'जलकी शोभा' इ० दोहरा दिला. ह्यापुढे 'तों नजीबखानाकडील पत्राची मार्गप्रतीक्षा करीत होते ती पत्रें आलीं' हा जो मजकूर आहे तो नवा परिच्छेद होण्याजोगा आहे. त्याचा संबंध परिच्छेद ५४ शी येतो, ५५ शी नाही. तसेच परिच्छेद एक मध्यें 'ऐशियास महाराज यानी' असे आले आहे ते हि एक परिच्छेदस्थल होण्याजोगें आहे; कारण तेथून विषय वेगळा लागला असो दुसरी गोष्ट सांगावयाची की, इतर मजकुरात किती तरी ठिकाणी कथनानुरोधाने तो, मग, इकडे, नतर ही अव्यये आलेली आहेत. त्या प्रत्येक ठिकाणी परिच्छेदाची मुळीच आवश्यकता नाही तो एक अनवस्थाप्रसग होईल आणि म्हणून कोणच्या 'तो' इत्यादि अव्ययाना प्रारभक अव्यय मानावयाचें हे नेमके कळून येण्यासाठी पूर्वपरिच्छेदाची समाप्ति पाहण्याची सर्वसामान्य आवश्यकता आहे, हे जे वर लिहिले ते याचसाठी होय

हा बखर-ग्रथ इतिहासकालीन गद्य सारस्वताचा प्रातिनिधिक ग्रंथ समजून त्या आधारे तत्कालीन मराठी गद्यभाषेचे व्याकरण-नियम आखण्याचा सामूहिक यत्न झाला पाहिजे. मराठी भाषा ही वाहती असून प्रगत व समृद्ध होत्साती प्रवास

करीत आहे. प्रवासांत झालें तरी मुक्काम होतच असतात इतिहासकालीन व मध्य महाराष्ट्राच्या मुक्कामांतील तिचें रूपगुण ह्याच बखर-ग्रथाच्या द्वारां आपणास समजून घ्यावयाचे आहेत, तशा बखर-ग्रंथातील ह्या सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. तो झाला ह्या प्रकारें साजरा करून वाचकाच्या हातीं देत आहे.

शं. ना. जोशी



# पुरस्कार

भारत इतिहास संशोधक मंडळाने बखरीचें चिकित्सक संपादन करून नवीन बखरमाला प्रकाशित करावी, अशी कल्पना अनेक वर्षे डोळयासमोर होती आणि तिचा उच्चारहि पुष्कळ वेळा केला. तथापि तो योग अल्पाशाने का होईना, सिद्धीस जात असल्याचे पाहून वाटणारे समाधान येथे प्रकट करणें उचित होईल.

मनुष्य कथाप्रिय आहे अनेक प्रसंगी त्याला स्वत:संबंधीं आणि लोकासंबधी मागील आठवणी आठवतात, त्या तो लोकांस आवडीनें सांगतो. आणि ज्याचें सागणें चटकदार असेल त्याच्या भोवती लहानमोठे श्रोते नेहमीच गराडा घालून कौतुकानें ऐकत बसलेले आढळणारच. अशा श्रोत्यापैकी कोणी एखादा होशी गृहस्थ अथवा स्वत: कथाकथकच ह्या हकीकती लिहून ठेवतो. त्यावेळी अशो लिखितें नकलून नेऊन दूरदेशो असलेले जिज्ञासूहि आपली तृप्ति करून घेतात. 'भाऊसाहेबांची बखर म्हणून जी नाणावलेली व लोकप्रिय बखर आहे ती अशा प्रकारेच लिपिबद्ध झालेली असली पाहिजे. आज उपलब्ध झालेल्या सर्व मराठी बखरीत 'भाऊसाहेबाची बखर' ही सर्वाढ्य म्हणून पहिल्या क्रमाकाला लागलेली आहे. या महत्त्वाला ती पावण्याने कारण तिचा विषय पानिपतचा वीरकरुणमिश्रित प्रसंग असे घटकाभर वाटले तरी वास्तविकपणे या बखरीच्या कर्त्याचे कथनकौशल्य हेंच या घटनेचें खरें कारण आहे. बखर लिहिणाऱ्याला फार चटकदार, रसानुकूल आणि परिणामकारक शैली साधली आहे. असल्या गुणानी भरलेली दुसरी बखर हिच्या जोडीला बसणारी सापडणार नाही. साप्रत या बखरीची योजना विद्यापीठीय अभ्यासक्रमातहि वारंवार होत असते, हें लक्षात घेऊन या बखरीचे संस्कारयुक्त प्रकाशन प्रथम हाती घेतले; आणि संपादकीय बोजा आमचे सुहृद्वर श्री. वि. सी. चितळे याजवर सोंपविला. श्री. चितळे मोठ्या हुरूपाने कामाला लागले. विविध टीपा-टिपणे त्यानी तयार केली होती. परतु मुंबईस गेले असता एकाएकी हा लोक सोडून गेले. या बखरीत दु:खार्णवाचे प्रसंग बहुत आहेत तसलाच प्रसंग बखर-प्रकाशनमंडळावर आला! पुढे श्री. शंकरराव जोशी याजकडे संपादनाचा भार दिला तो त्यांनी आपल्या अनुभविक अभ्यासी संस्कारानी सिद्धीस नेला.

या बखरीला पहिला मुद्रणसंस्कार झाल्याला सुमारें पाऊणशें वर्षे झाली. तेव्हा १८७९ चा डिसेंबर होता आणि आजचे प्रकाशन नोव्हेंबर १९५५ त होत आहे. इतक्या दीर्घ काल या बखरीची लोकप्रियता सतत वर्धमान आहे. चालकांनाहि भरंवसा वाटतो की, या बखरीला यथार्थपणे लाभलेली ही लोकप्रियता अधिकाधिक

वाढन जाईल आणि सर्वधित आणि संस्कारित अशा तिच्या अनेक वरचढ आवृत्त्या प्रकाशित करून वाचक-अभ्यासक यांची सेवा त्याना बजावतां येईल.

मूळ क्रमाने सहाव्या परंतु आमच्या क्रमाने पहिल्याच अशा या आवृत्तीचे विशेष श्री. जोशी यानी विस्ताराने पुढे माडलेच आहेत. श्री. जोशी यानी नामचर्चा[१], लेखकशोध[२], बखरीतील भाषेचा[३] रसास्वाद, भाषेच्या व्याकरणाची[४] चिकित्सा, बखरीतील[५] ऐतिह्याचे तुलनात्मक परीक्षण आणि व्यक्ति[६]-काल[७]-स्थल[८] सूचि याची जोड देऊन आपले कष्टदायक आणि आनंददायक उभय परिणामकारक कार्य प्रशसनीय रीत्या शेवटास नेले आहे.

असे थोडेच आहे कीं संपादकांचे म्हणणे आपण नेहमी ग्राह्यच केले पाहिजे? मग चिकित्सा कसली आणि चर्चेला तरी वाव कोठला? सत्याचा शोध जसा नाजुक तसाच कठोरहि असतो. सपादकानी अवश्य ते कष्ट आणि काळजी दाखविली आहे किंवा नाहीं हाच, काय तो खरा प्रश्न.

यथार्थपणें तयार केलेली चिकित्सक व शास्त्रीय नांवाला पात्र असलेली बखरीची मुद्रित प्रत म्हटली की, तिच्या प्रारंभी ठळकपणें पुढील सूत्रे जाड ठशात छापलेली असावी. नव्या पिढीतल्या अभ्यासकांस तर हे मार्गदर्शन फारच आवश्यक असतें. आणि अनेक पढिक पडितानाहि भ्रमात पाडण्याचें कार्य मोहवश होऊन कित्येक सपादकांनी केलेलें आहे आणि अद्यापहि दुसरे कित्येक तसे करीत असतात. सूत्रें येणेप्रमाणें :—

(१) मूळ बखर मोडी लिपीत लिहिलेली आहे.

(२) या मोडी प्रतीत विरामचिन्हे नसतात (ती आमच्याकडे इंग्रजी राज्यांत आलीं).

(३) शब्द, वाक्यें, वगैरे तोडलेली नसतात. सर्व मजकूर एक सरळ सलग रेघ ओढून लिहिलेला असतो.

(४) मोडीत ( सामान्यत. इकार ) सारें दीर्घच लिहावे लागतें. तसेंच अनुस्वार देतां येतात; पण पुष्कळ वेळा देत नाहीत किंवा नको तेथेहि आढळतो. मात्राबद्दलहि शैथिल्य आढळतें. ल—ळ, अ—आ, ब—बा, क—ला, म—द—प, व—वा, ज—न, या—का, ह—ध ह्यांच्या सारखवटपणामुळे घोटाळयाला जागा होते.

(५) प्रकरणें आणि परिच्छेद सपादकानी पाडलेले आहेत.

म्हणून वाचकानीं वरील सूत्रे ध्यानात वागवावीं आणि संपादकीय संस्कारांना मूळ कल्पून चालू नये.

आपण बखर-शब्द आणि बखर हा प्रकारच घेऊं. बखर-खबर किंवा भाष्-व्रक्-बकणें असे अनेक प्रकार सुचवून बखर शब्दाची व्युत्पत्ति साधण्याचे प्रयत्न झालेले आहेत. बखेर-बखैर अशीहि या शब्दाची रूपे लिहिलेली आढळतात. ते कसेहि असो, एक अनुमान बळकटपणें करावेंसें वाटते आणि ते हे की, बखरीचा प्रकार आणि उत्तरेकडे राजस्थानांत आढळणारा 'ख्यात' हा प्रकार, या दोहोंत पुष्कळ साम्य व संबंध आहे. किंबहुना लावणी, पोवाडे, बखरी या सर्व प्रकाराचें मूळ राजस्थानांत शोधणें उचित ठरेल असें सुचवावेसें वाटते. कही, वातवातॉळ वचनिका, इत्यादि जे अनेक प्रकार डॉ. टेसिटोरीनें नमूद केले आहेत त्याच्या सूक्ष्म अभ्यासाने या कल्पनेवर चांगला प्रकाश पडेल.*

तसेच पूर्वी अलीकडे देतात अशी मोठी विचारपूर्वक नांवें लिहिलेल्या बखरीना कितपत देत असतील याची शंकाच वाटते. 'भाऊसाहेबाची बखर' या नावाचे मूळ सुचविताना सुप्रसिद्ध संपादक कै. रावबहादुर काशीनाथपंत साने यांनी १९२२ च्या भा. ब. च्या प्रस्तावनेंत पुणें प्रतीच्या डोकीवर नाव असल्याचें दिले आहे तें नांव वास्तविक भा. ब. असे नसून 'बखर भाऊसाहेबाची' असे उलटें लिहिले आहे. आणि ते जुन्या प्रणालीस अधिक जुळून दिसते.

त्याप्रमाणेच अर्थाच्या टीपांत 'वानरी तेलाचा प्रकार' याचा उलगडा पूर्वी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत प्रसिद्ध झाला होता. अशा शब्दचर्चा वगैरे या बखरीच्या निमित्तानें प्रसिद्ध झालेल्या टिपणाचेंहि संदर्भ एका परिशिष्टाच्या रूपानें द्यावयास पाहिजे व त्या टिपणांवरहि नवीन चिकित्सा सादर केली पाहिजे.

श्री. शंकरराव जोशी यांनी भा. ब. तील कथनाचें प्रामाण्य तोलून पहातां यावें म्हणून मूळ पत्रातून ज्या घटनाचे उल्लेख आढळतात त्याचा व भा. ब. तील विधानाचा पडताळा पाहता यावा म्हणून प्रकरणवार अठरा कालपटाचीं योजना केली आहे. हे काम बरेच कष्टाचें होतें. पण आता हे कालपट हातीं घेऊन बखरीचा ऐतिहासिक घटनाप्रामाण्याच्या दृष्टीनें चिकित्सक अभ्यास करण्यास मोठें साहाय्य होईल.

---

*Prose chronicles या नावानें काही ख्यातांची सूचि Bibliotheca Indica मालेत Bardic and Historical manuscripts section 1 Prose chronicles या वर्णनाची १९१८ त प्रसिद्ध झालेली आहे. १९१७ मधीलहि एक भाग या मालेत प्रसिद्ध झाला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत पुढील विधान आढळतें :— Khyāt, vātā, vigata, vamsāvalis, pidhis and similar ones all of which partake more or less of an historical character !

ऐतिहासिक मराठी साहित्यांत भाऊसाहेब, गोविंदपंत बुंदेले, नानासाहेब प्रभृतींचीं स्वदस्तुरचीं अनेक पत्रें आपणांस सुदैवानें उपलब्ध झालीं आहेत. तशीं अबदाली, जाट प्रभृतींची झालीं पाहिजेत. वाढत्या संशोधनाचें वाढतें फळ पदरीं पडेल तसें चिकित्सेचें क्षेत्रहि वाढेल आणि आमची बखर आवृत्तिहि अधिक संपन्न करतां येईल. चित्रें, नकाशे वगैरेची जोड खर्चाचें भय कमी होईल तशी देतां देईल. आज केलें आहे तेंच आपण सर्व वाचक, चिकित्सक, अभ्यासक यांनीं गोड करून घ्यावें एवढी विनंति आहे.

आश्विन शु. १२, १८७७ **दत्तो वामन पोतदार**



# अनुक्रमणिका

॥ श्रीगजानन ॥

# भाऊसाहेबांची बखर

## प्रकरण पहिलें

## कुंभेरीचा वेढा

### १. नजीबखान प्याद्यानें भाऊसाहेब यांजवर प्यादेमात--भाऊगर्दी--कशी केली ?

लेखन-प्रारंभ

राजश्रिया[1] विराजित राजमान्य राजश्री गणेशपंत[2]

स्वामीचे सेवेशीं

पोष्य चिंतामण गोविंद[3] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल तागाईत पौष वद्य १२ मुकाम दिल्ली इंद्रप्रहस्त जाणोन यथाथित वर्तमान असे. विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविलें. लिहिला मजकूर विदित जाला. पत्रीं आज्ञा जाली कीं, हिंदुस्थानांतील आदिअंतीं वर्तमान [ प्याद्याचा फर्जी नजीबखान रोहिला, होऊन[4]] दक्षिण देशी हिंदुपद [श्री राजा[5]] शाहू छत्रपती यांचा प्रधान मुख्य आदिकरून

---

१. 'भाऊसाहेबांच्या बखरी'चें मूळ हस्तलिखित, आजपावेतों उपलब्ध झालेलें नाही; सांपडल्या त्या सर्व नकलाच आहेत. त्या सर्वांत शक १७१२ च्या सुमारास (सवाई माधवरावाच्या वेळीं) नकललेली प्रत, सर्वांत जुनी प्रत, म्हणजे तुगार प्रत होय. मूळ बखरीनंतर लौकरच तिची नकल झालेली असावी. या एका कारणास्तव तिचा आद्यंत येथें स्वीकारलेला आहे.

२. गणेशपंत हे कोण ? त्याऐवजी व्यंकपा नाईक दिडोरे, दिलनूरकर ('दिडनूरकर' औंध प्रत) असा सान्यांच्या कांही प्रतीत पाठ आहे. ते पंढरपूरचे वजनदार सावकार. सगजो मध्यें व सा. १९२२ व १९३२ प्रतींत 'दिलनूरकर' हा शब्द गाळला आहे. तसेंच 'दिंडोरे' या उपनांवापुढें स. १८७९ प्रतींत 'वालापूर' व पुढें 'कसबा वेळापूर' असा पाठ आहे. सगजो तो पाठ देत नाहीं. गणेशपंत अगर व्यंकपा नाईक हा नकलकाराचा यजमान असावा. मूळ बखरीत हें नाव भिन्न असावें असा तर्क आहे.

३. 'कृष्णाजी शामराज' असा पाठ सा. औंध, सगजो वगैरे प्रतीत आहे. मूळ बखरीत भिन्न नांव असावें. चिंतामण गोविंद अगर कृष्णाजी शामराज हा नकलकार असावा.

४. हे कंसांतील शब्द बहुधा सर्व प्रतीत आहेत. प्याद्याचा फर्जी झाला तो हाच नजीबखान रोहिला. प्यादें, फर्जी, प्यादेमात, इरेस पडणें, नरद ठार, जूग विस्कटणें वगैरे बुद्धिबळाच्या व सोंगट्याच्या खेळांत येणारे शब्द बखरकार मार्मिकपणें वापरतो.

५. हा पाठ साने प्रतींत व औंध प्रतींत आहे; सगजो मध्यें तो नाहीं.

सवालक्ष फौजेनिशींहि भाऊगर्दी होऊन प्यादेमात कैशी जाली हें सविस्तर वर्तमान लिहावयास आज्ञा केली. ऐशियास, महाराज [यानी] राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांचे मस्तकीं हात ठेविला की, "तुम्हीं माझे पश्चात् स्वधर्मन्यायें समुद्रवलयांकित पृथ्वी आक्रमून प्रतापें राज्य चालवावें."[६] म्हणोन शिक्केकटार दिली.[७]

**२. ते ७. (गृहकलह = होळकर-शिंदे-वितुष्ट) रघुनाथरावांची सुरजमल जाटाच्या कुंभेरीवर स्वारी**

सत्पुरुषाचे[८] आशीर्वादेंकरून दिनसेदिवस बिजेच्या चद्राप्रमाणे चढते[९] कळे राज्य करीत असता, पुढे विनाशकाले[१०] येणार भवितव्य[११] आलें. तेव्हा वानरो[१२] तेलाचा जैसा प्रकार तैसा प्रकार घडला. **गृहकलह लागण्यास कारण** जाहाले की, राजश्री रघुनाथराव दादासाहेब प्रथम स्वारी, हिंदुस्थानचे मोहिमेस पाठविले, त्यासमागमें राजश्री मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे व विठ्ठल शिवदेव व अंताजी माणकेश्वर[१३] व गोविदपंत बुंदेले व यशवंतराव पवार वगैरे मोठमोठे उमराव, लहानथोर सरदार, पाऊण लक्ष फौजेनिशी हिंदुस्थानात रवाना केले. ते मजल दरमजल निघोन नर्मदापार जाहाले आणि मालवे व सोंदेवाडा व खेचीवाडा व बुदीकोट व राजगड व पाटण व उदेपूर व जैनगर व नरवर व ग्वालेरी व झाँशी व कालपी अशा खंडण्या घेत ढवळपूरचे घाटे[१४] चमेलीपार जाहाले. तो पुढें सुरजमल जाटाचा मुलूख लागला. ते समई सुरजमल जाट याजकडील वकील रूपराम कटारी[१५] येऊन राजश्री रघुनाथराव दादासाहेब यासी भेटले आणि खंडणीचा मजकूर बोलू लागले. तों दादासाहेब याची दृष्ट थोर जाहाली. जिवामाफक[१६] खंडणी घेईनात. क्रोड रुपये एक खंडणी मागों लागले. वकील याचें बोलणें निदान चाळीस लक्ष रुपयेपर्यंत जाहालें. तें दादासाहेब यांणी न ऐकतां कूच करून कुंभेरीचे रोखें चालिले.*

---

६. इं. सं. ऐ. स्फु. ले. ४.५ याच्याशी हा मजकूर जमतो.

७. यापुढें 'असें सांगितलें' असें शेंबवणे प्रतींत आहे.

८. हा शब्द सा. १८७९ व १८८६ व शेंबवणे प्रतीत नाहीं.

९ 'चढते कळें' शेंबवणे प्रतींत नाहीं, पण पाहिजे; [शुक्लपक्षीच्या] 'बिजेच्या चंद्राप्रमाणें' लिहिणें सार्थ होण्यासाठीं.

१०. 'येणार...... प्रकार घडला' शेंबवणे प्रतींत नाही.

११. 'भविष्य' १८७९ व १८८६ मधील साने प्रतींतील पाठ.

१२. 'वानरी....प्रकार घडला. गृह' १८७९ प्रतीत नाहीं.

१३. 'अताजी माणकेश्वर.....यशवंतराव पवार वगैरे' हे शब्द शेंबवणे प्रतीत नाहीत; आणि तेंच बरोबर दिसतें. कारण ते तिघेहि सरदार त्यावेळीं उत्तरेंतच होते.

१४. 'माथा' साने प्रत.

१५. 'चौधरी' असा कांही प्रतींत पाठ आहे

१६. 'जीवनमाफक' भाइसं प्रत.

*दादांची ही स्वारी, पैसेहि तितके न मिळाले, कलहहि न मिटविले, यामुळें, अयशस्वीच झाली.

### ३. जाटाचें दादांना उत्तर : पांच गोळ्या व दारू

मग रूपराम कटारी याणें सुरजमल जाट यास वर्तमान येऊन सांगितलें कीं, "पेशवे ऐकत नाहींत; एक क्रोड रुपये खंडणी मागतात." तेव्हां सुरजमल जाट तोही द्रव्यबळे, फौजबळें, चांगला सामर्थ्यवान होता. किल्ले भरतपूर व डीग[१७] व रामदुर्ग व वरकड दुर्ग केवळ[१८] असाध्य, यांचा बंदोबस्त करून आपण खासा कुंभेरीत[१९] बळ बांधोन राहिला. आणि राजश्री दादासाहेब यास उत्तर पाठविले की, "चाळीस लक्ष रुपये देतों ते घ्यावे, नाही तरि युद्धास उभे राहावें." म्हणोन पांच गोल्या व दारू पाठविली.

### ४. कुंभेरी किल्ल्यास मोर्चेबंदी, वेढा व लढाई

त्या समई रघुनाथराव दादासाहेब यास विषाद येऊन कुंभेरीस मोर्चे लाविले[२०]. तमाम जिकडे[२१] तिकडे मोर्चेबंदी वाटून दिली. मोर्चे काईम जाहाले. परस्परें तोफा व हस्तनाला व सुतरनाला व जेजाला व बंदुकी व बाणाचे मार होऊं लागले. असें[२२] करिता पंध्ररा दिवस जाहले. दादासाहेब[२३] आपले भरावर गेले. तों दुर्ग असाध्य, सलाबत. मोर्चे चालवून सुरुंग लावावे तरी रान रेतीचें. सुरुंगास यत्न नाही. तोफा नीच धरल्या तरि गोळा रेतीत जातो, चढत्या धरल्या तरि गोळा कुंभेरीपार[२४] होऊन याजकडीलच दुसरे मोर्च्यातील मनुष्यें जाया होत. आसें संकट प्राप्त जाहाले मोहोरा इरेस पडला. आतून कोणी सल्ल्यास येईनात. असा समग्र दीड महिना जाहाला.

### ५. खंडेराव–मल्हारराव होळकर पुत्र–मृत्यु व मल्हाररावाची प्रतिज्ञा

[तों] येक दिवशी राजश्री मल्हारराव होलकर याचा पुत्र खंडेराव होलकर, केवळ बेहोप होता, त्याची आयुष्यमर्यादा सरली म्हणोन[२५]** जैसे मुंगीस पक्ष फुटतात, तैसा प्रकार जाहला;** भोजन करून मोर्चियांत निशाणापासीं आला. तों एकाएकींच किल्ल्यातून जेजालीची गोली, प्रलयी वीज पडती तसी येऊन खंडेराव यास अकस्मात् लागोन [तो] मोर्च्यात

१७ 'डिग' भाइस प्रत. 'भरथपूर' भाइसं प्रत.

१८. 'केवलदुर्ग' भाइस प्रत. १८७९ च्या साने प्रतीत 'कळवण'.

१९. 'कुंभारीत' असाहि पाठ काहीं प्रतींत आहे.

२०. ता. २० जाने. १७५४ ला कुंभेरीस मोर्चे लागले.

२१. 'जिकडे तिकडे' साने प्रत.

२२ 'आसी लढाई' साने प्रत.

२३. 'त्यांनीं' साने प्रत. 'दादासाहेब' असा १८७९ व १८८६ च्या साने प्रतींत पाठ आहे.

२४. कुंभेरी भरतपूरच्या वायव्येस चार कोसांवर आहे.

२५. हे शब्द भाइसं प्रतींतील.

ठार जाहला. शुभ्रवर्ण चक्षु होऊन गतप्राण जाहाला. हें वर्तमान मल्हारराव यास कलतांच घाबरा जाहला. त्यास पुत्र तेवढाच. केवळ पढियंता होता. त्याची गती असी जाहाली. [हें] जाणोन, मल्हारराव यास असें जाहालें कीं आपले आंगावर वीज पडली किंव्हा परवत मस्तकीं पडला आसें होऊन, प्राण व्याकुळ होऊन देहभान विसरला. तेव्हां राजश्री दादासाहेब व आणखी थोर थोर सरदार येऊन ब्रह्मज्ञान व कांहीं हिमतीच्या गोष्टी सांगोन, क्षणभर शांत करून, मोर्च्यांतून प्रेत आणोन त्याचें यथाविधि दहन-सार्थक केलें. तेरा दिवस उत्तरकार्य होऊन दानधर्मही चागला जाहला. पुत्रशोकाचा विषाद मल्हारराव यास येऊन प्रतिज्ञा[२६] करिता जाहला कीं, "सुरजमल जाट याचा सिरछेद करीन व कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन तरीच जन्मास आल्याचें सार्थक. नाहीं तर प्राणत्याग करीन; म्हणोन दांतानें वोठ चाऊन दुराग्रहास प्रवर्तला.

**६. जाटावरील संकट व उपायचिंतन : जयापा शिंदे यांशीं स्नेह.**

हें वर्तमान वकील याणें सुरजमल जाट यास श्रुत केलें कीं, मल्हारराव याचा येकुलता येक पुत्र होता तो मृत्यु पावला. त्या विषादें शफतपूर्वक प्रतिज्ञा केली कीं, "जाट याचा वंश निर्मूल करीन, कुंभारी खणून यमुनेंत टाकीन तरीच बापाचे पोटीं जन्म घेतला." असें वकिलाचे मुखें वर्तमान ऐकतांच त्यासहि मल्हारराव याची मर्जी ठावकीच होती. कीं, मल्हारराव जें बोलेल तें करील, त्यास संदेह नाहीं. तीन महिने जाहाले. लढाई होतच आहे. आतां आम्हांस हिंदुस्थानांत आश्रय कोणाचा नाही. आणि आम्ही कोणाचे बळावर हिंमत बांधावी ? आतां गलीम मागेल तितके रुपये द्यावे किंवा बायकामुलांचा त्याग[२७] करून चालून घ्यावें आणि मरावें. याचा विचार काय करावा ? गांवांतील सरंजाम[२८] दाणा व तूप व मीठ व तंबाकू व दारूगोळी सरली; यास यत्न काय करावा ? [म्हणोन] तमाम लहान थोर सरदार व रूपराम कटारी व बाहेरील राणीवासांतील आनुसया[२९] म्हणोन त्याची जेष्ठ स्त्री परम चतुर व सुसील होती [यांस बोलाविलें.] रूपराम व ती स्त्री येकत्र होऊन मनसोबा केला कीं, "गोष्ट तो साधेना, मसलत सुचेना, प्राणान्त समय गुजरला." आसें म्हणतांच आनुसयेनें जाबसाल केला कीं, "यास यत्न येक आहे. यासिवाय दुसरा यत्न नाहीं.[३०] राजश्री जयाजी सिंदे यांचा आणि तुमचा स्नेह आहे. आणि तेहि क्रियावान येकवचनी आहेत.

---

२६. ही प्रतिज्ञा व तिचें पालन याला अजून ऐतिहासिक आधार मिळत नाहीं.

२७. 'शाका करून' साने प्रत.

२८. 'सामान' भाइसं प्रत.

२९. 'हणसआ' साने प्रत.

३०. दुसरी यत्नास दृष्ट पोचत नाहीं' साने प्रत.

त्यांस साध्य केलियास तुमचा तरणोपाय आहे. नाहीं तरी दुसरा उपाय" मनसोब्यांत येत नाहीं."

### ७. सुरजमल व जयापा पगडीभाई-पण (पहिलें). हेंच 'गृहकलहास कारण'

हें ऐकून मसलत सर्वांचे ध्यानांत आली. हाच निश्चय करून रूपराम कटारी याचा पुत्र तेजीराम याजसमागमें पत्र व सुरजमल याची सीरची पगडी असें रात्रौ [रवाना केलें. तो] राजश्री जयाजी सिंदे यांचे डेरियास येऊन केवळ अजीज[३२] होऊन बोलला कीं, "आजचे समई तुम्ही वडील बंधु आणि मी धाकटा बंधु आहें. कलेल त्या रीतीनें माझा बच्चाव करावा." म्हणोन वकिलानें विनंति करून समागमें जाटाची सीरची पगडी [आणिली होती] ती सिंद्यांचे डोईस घातली आणि त्यांची पगडी आपणापासीं घेतली आणि उत्तर केलें की, " बहादरकी शरम पार[३३] पाडावे." असें ऐकोन जयाजी सिंदे यांसी निर्वाणसमय भासला आणि चित्तांत विचार केला की, "याचा पक्ष धरावा तरी स्वामिद्रोह पदरीं पडतो आणि [न धरावा तर] हिदुस्थानांतील धर्म[३४] कीं, पगडीभाई जाहल्यावर पोटचें द्यावें पण पाठीचें देऊं नये; त्यांस रक्षावें. इकडून असा प्रकार. आणि हा पक्ष धरावा तरि सेवाचोर[३५] [होतो]. दोन्ही संकटें. यांतून सबळ—निर्बळ पक्ष कोणता ?" म्हणोन चौघे मातबर जिव्हाळियाचे मुछदी होते त्यास विचारणा केली. चौघांनीं सबळ–निर्बळ पक्ष जाणोन, "शरण आलियाचा आंगिकार करावा, शरण येईल त्यास मरण चिंतूं[३६] नये, आसें धर्मशास्त्री वाक्य प्रमाण.[३७] सबळ पक्षीं होतच आहे." हें ऐकोन पुढील **होणार भवितव्य गृहकलह**–मधाचें बोट[३८]–लागावयास **कारण हेंच जाहालें**. (परि. २ पहा.)

जयाजी सिंदे केवळ साभिमानी, हा आंगिकार करून आपली पगडी व बेलभंडार व अभयपत्र आंत[३९] पाठविलें. सुरजमल जाट याणें याप्रमाणें पगडी पोचतांच व वर्तमान ऐकोन [त्यांस] पुनर्जन्मसा भासला. दुपट हिंमत चढली.

---

३१. 'विचार' साने प्रत.

३२. 'अजीत' भाइसं प्रत.

३३. शूर वीराची लाज राखावी. 'बाहादरीकी' असा पाठ भाइसं प्रतीचा आहे. 'आम्हांस जीवदान दिलें पाहिजे' सांगली प्रत.

३४. 'स्वधर्म' साने प्रत.

३५. 'सेवाचार बुडतो' असा पाठ १८७९ व १८८६ प्रतींत आहे.

३६. 'देऊं' मंडळ प्रत.

३७. 'वाक्य प्रमाण' ऐवजीं 'प्रमाण' हा पाठ भाइसं प्रतींत.

३८. हे शब्द 'सगजो'त नाहींत.

३९. 'अंतस्थ' सगजो व साने प्रत. 'आंत' असा पाठ १८७९, १८८६ प्रतींत, भाइसं, शेंबवणे, मंडळ या प्रतींत. 'जाटास सांगली प्रत.

**८. मल्हारराव म्हणतात, 'अस्तनींतच अग्न'. पण शिंदे अनहित करणार नाहींत; त्यांजकरवीं तह**

हें वर्तमान करणोपकरणी मल्हारराव यांणी ऐकून, परम विषाद येऊन रघुनाथरावदादा यांसी येकांतीं सुचविलें की "आमचे अस्तनींतच[४०] आग्न आहे आणि जाट हस्तगत कसा होतो ?" म्हणोन चिढावून सागोन आपले डेरियास गेले. रघुनाथराव दादासाहेब[४१] यांणीं सखाराम बापू यास सांगितले[४१] की "सिंदे केवल एकनिष्ठ भीम—[४२] —आर्जुन, नानासाहेबी आसें ध्यानात आणले. [ऐसें] असता त्याजकडून हा प्रसंग घडला. यास उपाय काय करावा ? यास मसलत कोणती ?" असें म्हणतांच सखारामबापू केवळ निधडा मनसबेबाज. याणें उत्तर केले कीं, "सिदे याजकडून आसी गोष्ट घडावयाची[४३] नाही आणि कदाचित् घडली आसलियास साहेबाचें अनहित करणार नाहीत. ही खातरजमा आसो द्यावी. मल्हारराव याणीं पुत्राचे कटाक्षे[४४] हे आदावत घेतली. परंतु शरिराचें[४५] दोन्ही हात आहेत, यातील कोणता तोडावा ? आतां उभयतांचें एकीकडे ठेवून सिंदे याचे हाताने कलेल तैसा सल्ला करून घ्यावा. यासिवाय दुसरा अर्थ नाही." म्हणोन तोच मनसोबा निश्चयात आणिला.

**९. जयापा व दादा आणि मल्हारराव संवाद**

तों सुरजमल जाट यास दम पुरेनासा जाहाला, आणि जयाजी सिंदे यांसी सांगोन पाठविलें कीं, "आजून निर्वाण कोठवर पाहाल ? सला करणें अथवा हल्ला करून मारून टाकणें." आसें उत्तर येताच जयाजी सिंदे याणी आपले आपले कारभारी बोलावून मनसोबा केला की, "जाट तों जेरीस आला. आतां या निमित्यें खावदाचे गैरमर्जी[४६] जाहाली तरी पुरवली; परंतु जाबसाल करितां उत्तम आहे" म्हणोन सिध होऊन कचेरीस गेले आणि राजश्री दादासाहेब यासी जाबसाल केला कीं, "दादासाहेब, आम्ही धनियांचे बारगीर; निमकहराम नाही. आसें आसता आम्ही जो मनसोबा सागतों तो खावंदाचे मर्जीस आल्यास[४७] ऐकावा. आजिचे समई जाटापासून खंडणी घेऊन, पुढें मसलत[४८] फते करावी. येक जागा राहिल्यास पदरीं फौज भारी, निभावणी होणें कठीण." आसें बोललियावर[४९] दादासाहेब यासी परम संकट

४०. 'खिशातच' सांगली प्रत.

४१. 'उभयतांनी मसलत केली कीं' भाइसं प्रत. 'रघुनाथराव आणि सखाराम बापू यांणीं मसलत केली'. साने.

४२. या विशेषणांस कागदपत्रीं आधार मिळतो. (फा. ३।५८). द

४३. 'घडणार' साने प्रत.

४४. 'लोभें' भाइसं व मंडळ प्रत.

४५ 'होळकर व शिंदे हे शरिराचे' सांगली प्रत. शिंदे डावा हात व होळकर उजवा हात; किंवा, डावा नेत्र म्हणजे शिंदे व उजवा नेत्र होळकर, अगर उजवी बाजू होळकर व डावी बाजू शिंदे असा त्यावेळीं संकेत होतासें वाटतें.

४६. 'बेमर्जी' साने प्रत.

४७. 'मर्जीस येत नाहीं' साने प्रत.

४८. 'पुढें मसलत' = पुढील कार्य, —योजना.

४९. 'बोलतांच' भाइसं मंडळ प्रत.

प्राप्त जाहालें. सला करावी तरी मल्हारराव हातचा जातो, सला न करावा तरी[५०] मसलतीस धका बसतो. यासी यत्न काय करावा ? आसें मनांत आणून जयाजी सिंदे यांस उत्तर केलें कीं, "प्रस्तुत तुम्हीं डेरियास जावें. याचा निश्चय करून तुम्हांस काय तो मनसोबा सागून पाठवितों." आसें म्हणतांच सिंदे डेरियास आले.[५१] [दादा-साहेब] मोठे संकटांत पडले. मोर्चियांतून दाणा-दारूगोळी[५२] आंत प्रविष्ट होऊं लागली. असे थोडे दिवस गुदरले.

**१०. जयाप्पाचें रामसिंगाशीं पगडी भाई-पण (दुसरें).**

तों मारवाड प्रांती आबेसिंग व ढोकलसिंग दोघे भाऊ होते. वडील भाऊ आबेसिंग याचा पुत्र रामसिग; व ढोकलसिग याचा पुत्र बिजेसिग, आसे दोघे. त्यांत वडील रामसिग केवल अमली,[५३] बेहोष, जाणोन बिजेसिंग याणें राज्यलोभें त्यास धुडावून आगदी संस्थाने नागपूर व भिकानेर व मेडतें व झालूर अशीं भारी संस्थानें होती ती हस्तगत केली. रामसिंग यास यक अजमेर मात्र राहावयास स्थल होतें. त्यासहि नित्य[५४] उपद्रव. असे जाणून *त्याजकडील चेतराम वकील होता त्यास बोलावून विचार केला की, आता याणी[५५] राज्यलोभास गुतोन आम्हांस निर्माल्यवत ठेविलें. असे राहून जीव जगवावा[५६] याहून प्राणत्याग अथवा देशत्याग करावा, हें उत्तम. दोहींतून एक आर्थ करावा." तेव्हां चेतराम यानें उत्तर केलें की, "महारा[जां]ची[५७] हांडी उतरावी आणि आपली हांडी चढवावी. प्राणत्याग स्त्रीजातीनें करावा आणि देशत्याग ब्राह्मण संन्यासी यांनी करावा. तुम्ही संस्थानी, राजपुत्र, त्यांत जातीचे हटले[५८] हाडे रजपूत. 'हिंमत मर्दा मदत खुदा,' मार्ता मार्ता मरावें. परंतु केवळ अजिज[५९] होऊं नये. तुम्हांस मसलत करणें तरी मसलत येक मात्र आहे. दक्षण देशांतील गनिमांची प्रबलता जाहाली आहे. त्यास निमें राज्य द्यावें आणि आपलें (कार्य) साध्य करून घ्यावें. त्यास प्रस्तुत गनिमाची फौज कुंभेरीस लागली आहे. होळकराचे हातून कार्य करून घ्यावें तरी ते बिजेसिंगाचे स्नेही होत; आती[६०] लोभांत आहेत. आतां नेकजात येक जयाजी सिदे मात्र आहेत. त्यास पगडीभाई करून त्याचे हातोन कार्य करोन घ्यावें." म्हणोन मनसोबा खचित करून इमानप्रमाण, बेलभंडार व शीरची पगडी चेतराम याजसमागमें जयाजी सिंदे यांजकडे पाठविली. तो कुंभेरीस येऊन, सिंदे यास भेटून येथील कचा-पका वृतांत सर्व निवेदन केला.

---

५०. हा मजकूर १८७९ च्या सान्यांच्या प्रतींत नाहीं.

५१. 'लावून दिले' साने प्रत.

५२. दारूगोळी शब्दापुढें 'सरंजाम लागेल तो' असा भाइसं व मंडळ प्रतींत पाठ आहे.

५३. 'अवलिया' भाइसं प्रत.

५४. ['कोणत्या तरी] निमित्तें' साने प्रत.

५५. 'वैरियानें अगदीं राज्यमदें लोभास गुंतोन' साने प्रत. *त्याचा.

५६. 'असें जगावें' साने प्रत.

५७. 'महाराची' भाइसं, शेंबवणे, सगजो प्रतीचा पाठ. राखं ४ पृ. ३ म्ह० ऐ. प्र. पृ. २१३

५८. 'हाडाचे रजपूत' शेंबवणे प्रत.

५९. 'अजीत' शेंबवणे प्रत.

६०. हें वाक्य साने व सगजो प्रतींत नाहीं.

आणि राजियाचे शीरची पगडी आणली[६१] होती ती जयाजी सिंदे यांचे डोईस घातली आणि त्याची पगडी आपलेपासी घेतली. कुर्निस करून जाबसाल केला कीं, "आम्ही रोड,[६२] दुर्बळ म्हणोन तुम्हांस शरण आलों. आतां मान-अवमान याचे धनी तुम्ही आहां." म्हणोन उत्तर केलें.

**११. जयाप्पा, मल्हारराव व राघोबादादा बोलणीं : जाटाशीं स्नेह**

तों जयाजी सिंदे यांणीं आधींच असाध्य[६३] अंगिकार केला (होता). त्यांत हें बोलणें दुसरें आलें. 'फार उत्तम आहे' म्हणून तेच समईं राजश्री रघुनाथराव दादा यांचे कचेरीस जाऊन उत्तर केलें कीं, "तुम्ही थोर खावंद आहां. आपण या स्थळीं राहून जाटाचें पारिपत्य करावें, आम्हांस आज्ञा द्यावी, आम्ही मारवाड प्रांतीं जाऊन मसलत फते करितों. सर्वांनीं येक जागा राहून मसलत बुडवावी आणि पदरीं फौज भारी यांस काय द्यावें? धणियांनीं खुदरजावंदीनें[६४] निरोप दिल्हा तरि उत्तम आहे; नाहींतरी आपणास साफ राहातां पुरवत नाहीं." म्हणोन माघारें आपले डेरियास येऊन फतेनगारचीस आज्ञा केली कीं, "कुचाची नौबत सुरू करणें." म्हणतांच नगारचीनें नौबत सुरू केली. तमाम मोर्चे उठवून गोटांत आणिले. हें वर्तमान ऐकोन राजश्री रघुनाथराव दादा यांणीं राजश्री मल्हारराव यांस बोलाऊन सांगितलें कीं, "सिंदे तो कूच करून चालिले. तुम्ही वडील आहां. आम्हांस मनसोबा कोणता देतां?" हें ऐकतांच मल्हारराव याचे तलव्याची आग मस्तकास जाऊन क्षणभर दंग जाहाले आणि चित्तांत पुर्ता विचार केला कीं, "केवळ आपणच दुराग्रह करावा, तरी अवघी नामोस्की[६५] आपणाकडे येईल. तत्रापि ऐकतो[६६] तरी 'इदं च नास्ति परं च न लभ्यते' दोहींसही नाडावें यांत रीत राहात नाहीं. अस्तु, जाट कोठें जात नाहीं. आजिचे समई कालहरण करितां उत्तम आहे." म्हणोन मनसोबा योजून दादासाहेब यांस उतर केलें कीं, "तुम्ही खावंद आहां. ज्यास धन्याची मर्जी राजी त्यांस आम्ही राजी." आसें म्हणतांच 'पडल्या फळाची आज्ञा' घेऊन[६७] [दादा] जयाजी सिंदे यांचे डेरियास आले. त्यांचें समाधान करून, त्यांस राहाऊन घेऊन, त्याचे हातोन जाटाचा सला करून, साठ लक्ष रुपये खंडणी घेऊन राजश्री रघुनाथराव देशास आले. मल्हारराव मालवे प्रांतीं इंदुरास येऊन छावणीस राहिले. सिंदे यांणी कूच करून मजल दर मजल मारवाड प्रांतीं चाल केली.

---

६१ 'आणली होती ती' हे शब्द साने प्रतींत नाहींत. इतर प्रतीत आढळतात.

६२. 'राजे' १८८६ साने प्रत. 'रोड' असा पाठ सगजो प्रतीत आहे. 'राज' असा पाठ मंडळ व भाइसं प्रतींत आहे.

६३. 'आधिकच साधन' भाइसं प्रत. 'शिंदे यांस आधींच असाह्य होतें' तुंगार प्रत. शिंदे यांस आधीच असाध्य अंगिकार केला आणि' पुणें प्रत.

६४. 'खुषीनें रजावतीनें' भाइसं व मंडळ प्रत. 'खुषीरजावंदीनें' साने प्रत.

६५. 'नामोहरमी' साने प्रत.

६६. 'ऐकावें' साने प्रत; 'ऐकत' मंडळ प्रत 'ऐकतां' शेंबवणे प्रत.

६७. 'होऊन' १८८६ साने प्रत; मंडळ व भाइसं प्रत.

प्रकरण दुसरें

# शिंद्यांची मारवाड-जोधपूरची स्वारी

## १२. जयापास दत्ताजीचें धीराचें बोलणें : 'यशआपेश शूराचा वांटा.'

[जयाप्पा आपल्यावर चालून येणार] हें वर्तमान बिजसिंग यानें ऐकोन, आपली फौज जमा करून नागूर सोडून चार सा कोसांवर येऊन राहिला. समागमें पंधरा हजार फौज व दहा हजार पायदल व पन्नास तोफा व पंचवीस गंजिफियाच्या गाड्या व शंभर उंट बाणांच्या कैंच्या, पांच सातशें उंटावरील सुतरनाले व जेजाला बरकंदाज [घेऊन] युद्धास सिद्ध जाहाले. ते राठोड रजपूत, हाडे, परम हाटेले, त्यांचे ध्यानांत गनिमाची फौज नाहीं. हें वर्तमान जयाजी सिंदे यांणीं ऐकोन तमाम उमराव यांस बोलाऊन विचार केला कीं, "मारवाडी हाटेले रजपूत, महापराक्रमी, सिरछेद जाहाला तरी कबंध नाचतें. त्यांचे मर्दुमकीची शर्थ तों या प्रकारची. **त्यांणीं आपले हिमतीनें खंदारचा[1] पातशाहा दुरानी गिलज्या, याची पगडी व घोड्याची दुमची सोडविली, ते मर्यादा आद्यापि चालती. गिलज्यास पगडी नाहीं आणि घोड्यास दुमची नाही.** आणि त्यांजपाशीं आगहि भारी. आम्हाकडील आधींच गनीम यांचें कचें दिल, गोड हत्यारी, निसवले[2] तरी, झाडास बांधले असतां झाड घेऊन जातील. आम्ही तों प्रतिज्ञापूर्वक राजश्री रघुनाथराव दादासाहेब यांजपासून निघालों. आणि जन्मादारभ्य मल्हारराव याचे जुगांतून[3] निघालों. येक जागां होतों तेव्हां येश न आलें तरी त्याचा खेद नवता. आतां आपेश आलें तरी पुन्हां त्यांस तोंड तरी कसें दाखवावें? प्राण द्यावा किंवा देशत्याग करावा. दोंही आर्थीतून येकाचा आंगिकार करावा. त्याजवरून दत्ताजी सिंदे भीमबहादर[4] व आणखी लहान थोर सरदार यांणीं मसलत[5] दिली कीं, "पुण्यप्रताप श्रीमंत नानासाहेब यांचा पदरीं आहे आणि तुम्हीं येकनिष्ठ शेवक[6] आहां. ईश्वर तुम्हास यश देईल, आम्ही येथून रामसिंग याचा आंगिकार करून आलों आणि बिजेसिग युद्धास आला म्हणोन नामोहरम व्हावें, तरि जालेपणाचें सार्थक काय? नामर्दीची[7] जघन्यता होईल. युद्ध करावें. यांत 'यश आपेश शूराचा वांटा.' याची क्षिति काय?" युद्ध करावें असा निश्चय ठरला.

## १३. जयापानें मिळविलेलें अपूर्व यश : बिजेसिगाचा पराभव

[त्या वेळी] त्यास व यास दाहा कोशांची तफावत[8] होती. त्यांणीं स्नानें करून तमाम ऐकमेकांस निर्वानिरव करून तमाम आंगांत चिलखतें व बक्तरें घालून,

---

१. खंदारचा=कंदाहाराचा.

२. 'निवटलें' १८८६ साने प्रत. पुढें

३. 'जुरतीने' धोपेश्वर, भाइसं, मंडळ प्रत. 'जुगतीने' पुणें प्रत.

४. हें पेशव्यानें शिंद्यांचें केलेलें कौतुक योग्य होतें.

५ 'हिंमत' साने, भाइसं व मंडळ प्रत.

६. 'सेवा करीत आहां' साने व भाइसं प्रत.

७. 'नामंदमीची' साने प्रत.

८. 'कोशांचा छाटा होता' सांगली प्रत.

जिरेटोप, पेटया बांधोन, दारूगोळी लोकांस[९] वांटून तंगबार करून, मुहूर्तें सिध्घ होऊन चालिले. मार्गीं शकूनहि चांगले जाहले[१०]. तीस हजार फौज होती. त्यांची निवड करून दोन भाग केले. येकीकडे दत्ताजी सिंदे जाहले आणि येकीकडे जयाजी सिंदे जाहले. दोन्ही शैन्यांच्या गांठी पडल्या. बिजेसिंग याणें तमाम आपले फौजेस ताकीद करून सामानसुध्धा[११] सिध जाहला. भोंवता[१२] जेजाला व तोफा वगैरे तयार होऊं लागले. जोंपर्यंत आंगाशी अंग लागलें नवतें तोंवर तोफांचा मार व हस्तनाले व सुतरनाले व जेजाला व रेखले व गंजिफियाच्या गाड्या व बरकंदाज आसी येकदांच सरबती जाहली व बाणांचा वर्षाव मेघमालाप्रमाणें जाहाला. मोठा कडाखा जाहाला. झुजात धुराची व धुळीची येकदांच गर्दी धुदी जाहाली. कोणाचे तोंड कोणाचे द्रष्टीस पडेनासें जाहलें. यंत्रांच्या धडाकियाखाली घोडी मनुष्ये[१३] बधीर जाहालीं. क्षणभर आसी गर्दी होऊन दोनीकडून घोडियांची तोडे आंत शिरकली ते समईचें लाघव तेथील आनभविले आसेल त्यास ठाऊक आसेल. ऐसो आग जाहाली. नंतर आगीचा मार राहून तरवारीची खणाखणी[१४] जाहाली. त्यात ते आधीच रजपूत, त्यात मारवाडी[१५] हाडे, त्यांची मरदुमी[१६] नवल नाही. परंतु मराठियांनी फारच शर्त केली. एकच गर्दी जाहाली[१७]. आसें युद्ध, गलिमांत कोणी केलें नाही. मल्हारराव याचे इरेनें जिवापरती अधिक केली. मोठमोठे खेतास येऊन मोठा प्रलय जाहाला. तो 'न भूतो न भविष्यति.' पांचसातशें गलीम चांगले ठार जाहाले.[१८] तसेंच जखमी घायाळ दोन अडीचशे[१९] मनुष्ये जाली. पाचसातशे घोडीहि पडलीं. मारवाडियाकडील दोन हजार मनुष्यें ठार जाहालीं. तोफा व रेखले[२०] कांहीं पाडाव केले. आसा प्रलय जाहाला. परंतु धन्य ? रजपुताची माय रजपुतास व्याली ! आसें गलिमास होतें तरी धुरोळा[२१] द्रिष्टीस पडों न देते. गलीम याची उत्कृष्ट चलती जाली. मारवाडियांत तंवी पोहोचवावी असें नव्हतें. त्यांतहि हाटेले रजपूत;

---

९. 'करोलांस' भाइसं प्रत.

१०. याच्यापुढें 'तेव्हां अधिकच हिंमत येऊं लागली' असें वाक्य साने प्रतीत अधिक आहे.

११. 'बमय सामान' साने प्रत; 'सरंजाम सुद्धां' क. प्रत.

१२. 'भोंवताले भाले व तोफा' मंडळ प्रत. 'भोंवता रिसाले' साने प्रत.

१३. 'घोडी मनुष्यें बाहेर गेलीं' भाइसं प्रत.

१४. या वाक्याबद्दल साने प्रतींत कल्याण प्रतीचा पाठ दिला आहे तो असा. 'अग्नीचा वर्षाव जाहल्यानंतर उल्हाटयंत्रें बंद होऊन तरवारेची हातघाई चालली.'

१५. 'हाटेले' १८७९ साने व सगजो प्रत.

१६. 'त्यांचें मर्दुमीचें नवल नाही' साने प्रत.

१७. हें वाक्य साने प्रतीत नाहीं; शेंबवणे प्रतीत आहे.

१८. साने पाठ 'पांच-सातशे भले, चांगले लोक गलिमाकडील ठार जाले.

१९. 'दोन अडीच हजार' १८७९ साने प्रत, भाइसं प्रत.

२०. 'रिसाला' साने प्रत.

२१. 'धूर' भाइसं प्रत. 'धुरोळा' सगजो प्रत.

जैसा मोटेंचा बैल सरतो तैसे मार खातच खेती सोडून, आपले मुरदे सांभाळोन, दोन कोश माघारे निघोन[२२] गेले. [सिंदे] यांणी ती जागा फत्ते करून शाहादानें वाजवीत खेतीवर उभे राहिले आणि आपले [लोकांचे] मुरदे जमा करून [त्यांस] आग्नप्रसाद दिल्हा. घायाळांच्या जखमा बांधोन परम खुशाली केली. तो आनंद पत्रीं लेहून कलवावा तो काय ? तेथें असतील ते आनभव जाणतील. सिंदे यांसी आसें जालें कीं, मल्हारराव यांजपासून निघालियास ईश्वरें आबरू राखिली. जलमाचें सार्थक जालें. म्हणोन रात्रौ तेथें मुकाम केला. रात्रौ छबिन्यास राऊत उभे केले. मारवाडियांस बेढा द्यावयास आवसान राहिलें नाहीं. त्यांची फौज सिकस्त जाहाली. हिदुस्थानांतील स्वधर्म कीं, फौज मोडली तरी दोन च्यार गांवें पळावें लागत नाहीं. खेती म्हणजे रण सोडून गेलियास याचे नामोहरकी जाली.[२३] मारवाडी यांनीं अपजय जाणून रात्रौ नागुरांत पोचले. [ज्या] मारवाडियांस समोरच जखमा होत्या त्यांच्या स्त्रियांनी काया कुरवंडी करून जयजयकार केला. ज्यांस पाठीवर जखमा होत्या त्यांच्या स्त्रियांनीं पतीचे त्याग केले. मारवाड प्रांतीं दस्तुर हाच कीं 'सनमुख घाव घेतला तरी उतम; नाहीं तरि पुरुषांचें स्त्रियांनीं मुखावलोकन करूं नये.' स्त्रियांची हिमत या रीतीची, तेथें पुरुषांची सिपारस कोठवर ल्याहावी ? अस्तु. राजा शाहूच्या पुण्यप्रतापाचा फलादेश.

## १४. नागोरशहराभोवतीं जयापाचें चिकाटीचें युद्ध

[मेडत्याच्या विजयानंतर] एक दोन रोज दम खाऊन, हुषार होऊन, [लष्करासह जयापा शिंदे] नागुराभोंवताले उतरले. शहर थोर. तीस हजार गलीम, आणखी त्या प्रांतांतील रामसिंग वगैरे राजे-रजवाडे दाहा हजार होते. परंतु शहरास वेढा पडेना.[२४] लस्कर येक बाजूस राहिलें. सबब जागोजाग मोर्चे दिले.[२५] तमाम मोर्चे कायम जाहाले. परंतु रान केवल रेतीचें. सुरंगाचा यत्न नाहीं. आसें पाहून युक्तीनें[२६] मोर्चेबंदी केली. परस्परें तोफांचा वगरे रेखलियाचा[२७] भडिमार होऊं लागला. आसे सात आठ रोज[२८] जाहाले. यावर जयाजी सिंदे यांणीं मनसोबा केला कीं, "दुर्ग तों आसाध्य आणि येक जागा आवघी फौज राहिली[२९] असतां, पृथवी-दिगविजय होणार नाहीं." म्हणोन रामसिंग व आपला पुत्र जनकोजी सिंदे यांज समागमें दाहा

२२. 'माघारे निघाले' साने प्रत.

२३. साने प्रतीत पुढील पाठ आहे 'रग सोडून गोळीची खस्त निघाले तरी नामोहरम जाले.'

२४. हें वाक्य १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं. नव्या, उपलब्ध प्रतींतहि नाहीं.

२५. हें वाक्य १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं.

२६. 'कळाशीनें' हा शब्द 'युक्तीनें' या शब्दापुढें साने प्रतींत आहे. 'असो. कळाशी करून' सातारा प्रत.

२७. 'रिसालियाचा' साने प्रत.

२८. 'सात आठ महिने ह्यापेक्षां वरील पाठ अधिक प्रशस्त भाइसं व मंडळ प्रत. हा पाठ जास्त बरा असे वाटतें

२९. 'राहालियास' साने प्रत

हजार फौज देऊन मेडतियासी[३०] रवाना केले. मेडतियासी मोर्चे लाऊन राहिले. आसे बारा महिने पूर्ण जाले. मारवाडी दमास येईनात. यांसि तो मोहरा इरेस पडला तसेच हेहि इरेस पडले.[३१]

### १५. मल्हारराव होळकरांची बिजेसिंगास मसलत

[इकडे] नागुरांत बिजेसिंग यांणीं विचार केला कीं, "मल्हारराव याच्या इभ्रतीवर आम्ही हा[३२] आंगिकार केला. परंतु कागदी—पत्रीं मात्र समाधान करितात. आम्हीं दम कोठवर धरावा ? येक वर्ष समग्र जाहालें. पांच मनुष्यांची कुमक नाहीं." तेव्हां आपले वकिलासमागमें पत्र मल्हारराव यांस देऊन पाठविलें कीं, "पादशाही उमराव आथवा भुमे राजवाडे यांच्या भरंवशावर आम्हीं ही मसलत[३३] केली नाहीं; तुम्हीं भरंवसा दिल्हा म्हणोन आम्हीं या गोष्टीचा आंगीकार केला. आतां आमची गति काय ?" म्हणोन मल्हारराव यांसी वर्तमान सांगतांच मल्हारराव[३४] यांणीं उत्तर केलें कीं, "शिंदे[३५] व आम्ही येका खावंदाचे चाकर. यास्तव उघड तुमची कुमक करितां येत नाहीं. परस्परें या रानांतील उमराव व रजवाडे यांसी पत्रें देऊन तुमची कुमक करवितों." म्हणोन तमाम[३४] पत्रें माधोसिंग जयनगरकर व सिवसिंग राणे उदेपूरकर व उमेदसिंग बुंदीकर व मारवाडी भीमसिंग आणखी बहुत छोटे-मोठे सरदार यासी साहित्यपत्रें दिलीं आणि वकिलास हिंमत देऊन सांगितलें कीं, "तुम्हीं ठांसून राहावें म्हणजे त्यांच्यानें रोमांच वांकडें होणार नाहीं. आसें करितां कोणीं कुमक[३६] न करीत तरि तुम्ही मोगलाई मसलत[३४] करून यश संपादावें." आसें सांगोन बिजेसिंगाकडे वकिलास रवाना केलें. भुमे राजवाडे यांसी पत्रें प्रविष्ट केलीं. मारवाडी यांचें पारपत्य जाहालें. येणेंकरून सर्वत्रांची छाती फुटोन गेली. कोणी कुमक करीनात.

### १६. जयापाचे लष्करांत महागाई नाहीं

आसे चवदा महिने जाहाले. लस्करांत धारण इस्तकबीलपासून सात शेर आठ शेर व वैरण चोविस पंचवीस पुलें[३७] आसी माहागाई. परंतु सरदार केवळ कुबेर. रोजमुरे व आजबाब ज्याजती पाहून केला. लोक आराम राखिले. धारण महाग आहे, असें कोणास सुचों दिलें नाहीं. फौजेंत येक मनुष्य बेदिल[३८] नाहीं. आसे तमाम लोक येकदिल. आव्वधियांची होड[३९] कीं बिजेसिंगाचें पारपत्य करावें; या प्रकारें गलिमाचें मानस.

---

३०. बखरकाराची ही चूक दिसते. मेडतें आधींच घेतलें असल्यानें जनकोजीस रून-नगर अगर अन्य ठाणें घेण्यास पाठविलें असावें.

३१. हें वाक्यार्थ साने प्रतींत नाहीं.

३२. 'हा जागा' भाइसं प्रत.

३३. 'हिंमत' साने प्रत.

३४. बखरकाराच्या या लिहिण्यास अजून कागदोपत्रीं कोठच आधार मिळत नाहीं. त्याचा 'मोंगलाई मसलतीचा' सल्लाहि असाच असत्य भासतो. निर-निराळ्या राजपूत राजांस त्यानें पत्रें दिल्याचें वृतहि असंभवनीय वाटतें.

३५. 'ते' भाइसं प्रत.

३६. 'हिंमत' सगजो प्रत.

३७. 'पेंढ्या' शेंबवणे व सगजो प्रत.

३८. 'दिलगीर' मंडळ प्रत.

३९. 'वोढ' साने प्रत, भाइसं प्रत.

## १७. बिजेसिंग जयापावर मारेकरी पाठवितो

तिकडे नागुरांत बिजेसिंग याणें आपले उमराव बोलाऊन मसलत केली कीं, "आतां आमची कोणी कुमक करीत नाही. मल्हारराव याणें इरेस घातलें[४०], परंतु त्यांच्यानें उघड साहित्य होत नाहीं. समग्र सवा वर्ष जाहालें. आम्ही आतां कोंडून कोठवर राहावें? महागाई बहुत आणि गलीमहि शह सोडून जात नाहीं हा पूण भरंवसा कळोन आला. आतां 'मोंगलाई मसलतीनें' होईल तें करावें." म्हणोन तिघे मारेकरी[४१] सिध केले. धन्य ते रजपूत![४२] सतीचें वाण घ्यावें[४३] तसे तयार जाहाले. त्यांणीं आपला जीव मुठींत धरिला. मग त्याणें त्यांस कांहीं देऊं केलें असेल तें न कले.[४४] अस्तु. मारेकरी च्यार घटका रात्रीस बाहेर लाऊन[४५] दिल्हे आणि आंत आपले फौजेंत ताकीद करून सिध्ध होऊन उभे राहिले.

## १८. जयापा शिद्यांचा मारेकऱ्यांकडून वध

तों मारेकरी लस्करांत पोहचले. तों च्यार घटका दिवस आला. पागेचे[४६] डेरियापुढें स्नानास जयाजी सिदे गेले. तों नजीक घोड्याची पागा होती. मारेकरी केवल कंगाल, भिकारियाचा वेष घेऊन, आंगावर जीर्ण वस्त्रें व गुप्त सुऱ्या, आसे घोडियापुढें दाणे वेंचीत होते. तों जयाजी सिदे यांणीं स्नान करून चौरंगावर उभे राहिले. खिसमतगार हांडाबासन[४७] घेऊन कोठीकडे ठेवावयास गेला. अबदागिऱ्या मात्र डोईवर छाव धरून उभा होता. जयाजी सिदे यांस संवय[४८] आसी होती कीं स्नानानंतर मुखावर धोतर घेऊन क्षणभर डोळे चोळीत राहावें. तों, जसा राजा नलाचे द्वारीं कली वृषभरूप[४९] धरून तिष्ठत होता, तैसेंच मारेकरी जपून होते. इतक्यांत [ही] संधि सांपडतांच मारेकरी याणीं उठोन येकायेकीच दोन्हीकडून[५०] कुशीस सुऱ्यांचा मार केला. काम कारेगार होतांच जयाजी सिदे चौरंगावरून खाले जमिनीस आले. तेव्हा नजीक आबदागिऱ्या शरिरानें धष्टपुष्ट होता, त्याणें कव घालून एक धरिला. तों डेरियापुढें व पागेंत गलबल जाहाली. जिकडे तिकडे 'मारा! मारा!' आसें होऊन जसी ससे-होलपट होती तसें होऊं लागले. येक[५१] ठार जाहाला. येक

---

४०. या गोष्टीस ऐतिहासिक पुरावा नाहीं.

४१. 'मारवाडी' भाइसं प्रत.

४२. हें वाक्य भाइसं मंडळ प्रतींत नाही.

४३. ४४. "तिघे मारवाडी यांस बक्षिसें वगैरे देऊन, सिद्ध केलें. त्यानीं लोभावर नजर देऊन, जिवाची आशा सोडून, सतीचें वाण घेऊन, सिद्ध होऊन बाहेर पडले." प्रत.

४५. 'काढून' शेंबवणे प्रत.

४६. 'देवाचे' साने प्रत.

४७. 'हाडा बासन घेऊन' हें वाक्य कल्याग प्रतींतील. खिसमतगार घोडा घेऊन कोठीकडे गेला. सागली प्रत. साभाळावयास गुतले. साने प्रत.

४८. 'आदत' भाइस प्रत व १८७९, १८८६ प्रत.

४९. 'तों जसा राज्यानें लाचेर करून बलीचें रूप धरून' मंडळ प्रत, भाइसं प्रत.

५०. 'चोंहोंकडून' भाइसं प्रत.

५१. या वाक्याऐवजी 'एक धरला तो मारला' असा पाठ साने प्रतींत आहे.

आशा आरिष्टांतून प्राण घेऊन नागुरात पोचला. मागें दत्ताजी सिंदे यांणीं वतमान ऐकोन बंधूजवळ धांवत आले. त्यांची आवस्था आशी पाहून त्याणीं केवल धाय मोकलून घायाल उचलून डेरियापुढे आणिले. तों तिकडे मारेकरी गांवांत[५२] पोहोंचतांच बिजेसिग सिधच होता. त्याणें तमाम सरदार यांस बोलाऊन सागितले की, "यार हो ! आतां गलीम आहेत ते काय ? 'मुरगी मारी बचे दानादान[५३] तैशी गत होईल." म्हणोन बहुत संतोष मानून फौजेनिसी[५४] सिध होऊन युधास निघाला. तों आधीच हे गडबडोन तमाम मोर्चे उठऊन गोटात आणिलेच[५५] होते. फौज बाहेर आलियावर लस्करांत आसी गडबड जाहाली की पृथ्वीप्रलय होतो तैसा विच्यार[५६] जाहाला. तों जयाजी सिंदे मोठे हिमतीचे सरदार, डोले उघडोन पाहिलें, तो जवल[५७] बंधू दत्ताजी सिदे[५८] केवल धाय मोकलून शोक करितां देखिला. गडबड ऐकोन हस्तसकेतें भावास [हिमत देऊन] बोलता जाहाला की, "वैरी युध्यास आला आणि तू राडेसारिखा रडतोस ? हे क्षेत्रीय धर्मास उचित की काय ? आता मजला काही होत नाही. तुम्ही शत्रुपराभव करावा."

## १९. दत्ताजीकडून बिजेसिंग पराभूत : जयापाचें उत्तरकार्य

असे ऐकताच दत्ताजी सिदे याणी नगारा करून फौज घेऊन युधास गेले. दोन्ही शैन्याच्या गाठी पडल्या. मोठे तुबल युध पूर्ववतप्रमाणे जाहाले. मागे दत्ताजी सिदे यांणीं सिरजोरा करून मारगाडी मागे मारून गावात घातले. दोन-तीनशे मनुष्ये ठार जाहाली. मोर्च्यापासी येऊन मागती जेथील तेथे मोर्चे कायम करून शाहादानें वाजवीत ढालेपासी आले. तों मागे जयाजी सिदे याचा प्राण गेला. दत्ताजी सिदे याणी हें वर्तमान ऐकोन घोडियावरोन* खाली घालून घेतले. अतिशय शोक करिता जाहाला. "आपासाहेब ! आम्हास आतां कोणाचे हाती निरऊन जाता ? आतां आप्पासाहेबां-सारिखा भाऊ कोठे द्रिष्टीस पडेल ? 'सभाग्य साधून जाय निधी आणि अभाग्य मागें मृत्तिका[५९] शोधी' तैसी आमची गत जाहाली. आमचें छत्र, केवल मायबाप ! असा बहुत प्रकारें शोक केला तो पत्री काय ल्याहावा ? ज्याचें आंतडें त्यास साक्ष देत आसेल. तेव्हा राजश्री रामाजीपंत भाऊ दिवाण व आणखी लाहान-थोर सरदार मिलोन बहुत प्रकारे शांतवन केलें की, "हा मृत्युलोक आहे. आला प्राणी राहात नाहीं.

---

५२. 'धावत' भाइस प्रत.

५३. 'मुरगी मरे बचडे दानादान' सगजो प्रत. 'मुरगी मारे बचे दानादान' शेंबवणे प्रत.

५४. या शब्दापुढें 'सिध होऊन' असा सगजो व मडळ प्रतीचा पाठ आहे, तो साने प्रतींत नाहीं.

५५. 'उधळोन गांवांत आलेच होते' असा सगजो'चा पाठ आहे.

५६. 'प्रकार' शेंबवणे प्रत.

५७. जयाप्पाच्या निधनाच्या वेळीं दत्ताजी त्याच्याजवळ होता कीं नाहीं या-बद्दल शंका आहे. मागाहून लौकरच तो आला असावा.

५८. या शब्दापुढें 'मोठे हिंमतीचे' असा 'मंडळ' प्रतीचा पाठ आहे.

५९. 'अभाग्य मागें भ्रांतिक' असा भाइसं व मंडळ प्रतींचा पाठ आहे.

परंतु इहलोकी कीर्त करून परलोक-साधन करावयाचें हेंच दुरलभ वस्तु. जयाजी बाबा काय घेऊन गेले? दुनिया, दौलत, खजिना, मुलेंबालें, हती, घोडे, पाहिजे तितकी संपदा, ठेऊन गेले. आतां त्याचे पुत्र जनकोजी बाबा आहेत. त्यांस वडीलपणें महत्त्व देऊन आ†ण हें राज्य चालवावें आणि पहिलेपेक्षां आधिकोत्तर करून दाखवावें. आता शोक करणें उचित नाही. शत्रू जवळ. हिंमत सोडली म्हणतील." असें शांतवन करून जयाजी सिदे (यास) चंदनकाष्ट व बेलकाष्ट व तुलसीकाष्ट आणोन[६०] आग्न-प्रसाद दिल्हा. नतर[६१] जनकोजी सिंदे यासी पत्रे पाठविली. त्यांणी तेच दिवसी मेडतें[६२] सर केलें होतें. त्यांस पत्रे पावताच तेही त्वरेनें पोहोचले. उभयता चुलते-पुतणे एकत्र जाहलियावर तो शोक 'न भूतो न भविष्यति' या प्रकारचा जाहला. असो. गत गोष्टीस यत्न नाही. सारासार विचार करून विवेक केला. यथाविधि उत्तरक्रिया तेरा दिवस संपूर्ण जाहाली. आधीच सिदे केवळ रणशूर, दानशूर, [त्यानीं] दान धर्मही बहुत प्रकारे केला.

## २०. पेशव्यांचीं दुखवटा पत्रें

हे वर्तमान तमाम भुमे राजवाडे यास कळले. इंदुरास मल्हारराव यांणीं ऐकोन बाह्यार्थ श्रमी जाहाले की, "आमचें जूग विमकटताच नरद ठार मेली." बाहेर लौकिकी[६३] या प्रकारे बोलून श्रमी जाहाले. आतरयामी ज्याचें तें जाणत असतील.[६३] हे वर्तमान पुण्यास नानासाहेब व भाऊसाहेब यास कळताच बहुत श्रमी जाहाले. "आमचा आर्जुन आज गेला. येक बाजू खचली," म्हणोन बहुत कष्टी जाहाले आसो. "जनकोजी सिदे त्याचे पुत्र आहेत त्यास 'सवाई जयाजी' करून दाखऊं, चिता काय आहे?" म्हणोन समाधानाचीं पत्रे दताजी सिंदे यांस पाठविलीं. मल्हारराव आपल्या वाफगावास[६४] निघोन गेले.

## २१. बिजेसिंग-शिंदे तह

इकडे नागुरावर पूर्ववत् प्रमाणें गोलागोली होतच होती. आसें पूर्ण आठरा[६५] महिने येक जागा मेख गाडली होती. बिजेसिग यांसी पुर्ते समजले की, "जयाजी सिदे गेले, तरी उणे पडले नाही. आणि आमची कोणी कुमक कांहीं करीत नाहीं, सिंदे पुर्ते इरेस पडले. पारपत्य आमचें करतील." आशी खातरजमा राखून वकील सल्याचें

---

६०. या शब्दापुढे 'अष्ट सुगंधे करून देहसार्थक केले' असा सगजो चा पाठ आहे 'देहसार्थक केले असा साने प्रतीचा पाठ आहे.

६१. 'तें वेळेस जनकोजी सिंदे जवळ नव्हते' असे साने प्रतीत या वाक्याबद्दल वाक्य आहे.

६२. मेडतें नव्हे, ते आधींच सर झालें होतें. जनकोजीनें हें कोणतें गांव घेतले तें नीट समजत नाहीं.

६३. 'बाहेरलापिका या प्रकारें बोलून श्रमी जाहाले, अंतरलापिका ज्याची ते जाणत असतील' असा साने प्रतीचा पाठ आहे. सगजो पाठही तसाच आहे.

६४. 'वाणगावास' शेंबवणे प्रत. मल्हार-राव दादाबरोबर दक्षिणेंत आला होता. (फा. ३।३२६.)

६५. मागीलप्रमाणेंच ३०, ५७, ६२ टीप ही कालगणना चूक आहे.

बोलण्यास पाठविले. यांसीहि आसें जाहालें कीं कोणते तरी रीतीनें यश संपादावें आणि निघोन[६६] जावें. बाह्यार्थ कारण मात्र बोलत होते[६७] कीं, "बारा वर्षें लागलीं तरी शह सोडणार नाहीं."[६८] मग उभयपक्षीं सला केला. येक क्रोड रुपये खंडणी घेऊन नागुरापासून अलीकडे मुलूख आजमेर व मेडतें व भिकानेर अैसीं ठाणीं रामसिंग यास देवविलीं. याप्रमाणें खंडणी व मुलूख घेतला. त्यांत अर्ध मुलूख रामसिंग यास दिला, अर्धा मुलूख आपणाकडे करून ठाणेयाची बंदोबस्ती करून, तेथून कूच करून, मजल दर मजल उज्यनीस आले.

## २२. शिंदे बुंदीकोटयाच्या राजास राज्यारूढ करतात

उज्यनीस आलियावर तमाम सिबंदीचा हिसेब केला. तीन क्रोड रुपयांचा मोहिमेचा जमाखर्च जाहाला. झाडून ऐवज मालवे वगैरे प्रांतांतील नेऊन खर्च केला. दाहा पांच लक्ष रुपये कर्जवाम जाहालें. तों कुल खजिन्यांत पैसा राहिला नाहीं; जामदारखान्यांतहि कांहीं शिल्लक नाहीं[६९] आणि सिलेदार लोकांचा हिसेब केला तो तीन सालां हिसेब लोकांस महागाईमुलें झाडून पावला. शेवट कोणाकडे फाजीलहि निघालें. आसें जाहलेयावर सिंदे केवल सालस, मोमदिल, (पदरीं) च्यार मनुष्यें, एक विच्यारें त्यांणीं चितांत विचारणा केली कीं, माहागाईमुळें लोकांनीं झाडून रुपये खर्च[७०] केले, आम्हांकरितां लोक खराब जाहाले. तीन वर्षे राहून रिक्तहस्तें लोक घरास गेलिया त्यांचीं मुलेंमाणसें दुवे देणार नाहींत.[७१] त्यांचे तलतलाट घेऊं नयेत. आतां सरासरी लोकांस झाडून येक सालां रुपये द्यावे." आसें निच्ययांत आणिलें, तों पदरीं पैसा नाहीं.[७२] मनुं तरि या रीतीचा जाहाला. मोठें संकट पडलें. दिवसां आन गोड लागेना, रात्रौ निद्रा येईना. केवळ ईश्वरावरच तवकल करून होते. तों त्यांची क्रिया शाबूत. 'अजगरका दाता राम' भाग्य अभाग्य कालपरत्वें येतें जातें. परंतु निश्चय मात्र चलूं नये[७३]' त्यांत ईश्वर साहृच होतो. जैसी क्रिया धरावी तैसें फल पावावें. प्रत्यक्षास प्रमाण पाहावें न लागे. सिंदे यांणीं शुध वासना धरिली यास्तव ईश्वरें तेथें

---

६६. हें खरें नाहीं. उलट दत्ताजीस जोर चढत चालला होता. कारण पेशव्यांकडील मदत येत होती. (फा० ३।२१६, हिंगणे १।१७२.)

६७. 'बाह्यार्थ मात्र युद्धाची उमेद ठेविली होती' सांगली प्रत.

६८. हें वाक्य साने प्रतींत नाहीं. टीपेंत आहे.

६९. 'जामदारखाना कुल खालीं जाहाला' साने व शेंबवणे प्रत.

७०. 'रुपये खादलें' साने व सगजो प्रत.

७१. 'गेले म्हणजे मुलें माणसें बोल ठेवतील' मंडळ प्रत. 'देणार'बद्दल 'घेणार' असा पाठ.

७२. असें कल्याण प्रतींत वाक्य.

७३. मंडळ प्रत. निश्चयांत मात्र अंतर करूं नये. साने प्रत.

कौतुक केलें कीं, येकाएकीं बुंधीचा[७४] राजा होता तो मृत्यु पावला. तेव्हां त्याचा दायाद चुलत[७५] भावाचा पुत्र होता. तो राज्याभिलाष करावयाचे विच्यारास आला. राज्याचें मूल नेणतें[७४] होतें. तेव्हां राजस्त्रीनें ताबडतोब वकील पाठविले, ते उजनीस सिंदे यांजकडे आले. (ते बोलले) कीं, "तुम्हीं येथें येऊन, मुलास तख्तीं बसऊन टिळा लावावा. म्हणजे तुम्हांस पाऊण क्रोड रुपये देतों." आसें ऐकतांच, हें आधींच आतूर होते. त्यास आसें जाहालें कीं दुकालियास मिष्टान मिळतें तसें जाहालें. यांणीं ऐकतांच तेच क्षणीं नगारा करून कूच केलें. तेथें जाऊन जबरदस्तीनें त्याचा दायाद[७५] होता त्यास कैद करून मुलास तख्तीं बसविला. राजस्त्रीनें बोलिल्याप्रमाणें पाऊण क्रोड रुपये देऊन बहुमान हत्ती, घोडे, अमोल्य रत्नें, सिरपेच, जवाहीर, मोत्याचे तुरे, पदकें व मोत्याच्या माला, कापड, वस्त्रें येणेंप्रमाणें दिल्हें. तें घेऊन उज्जनीस येऊन पोहोचले. तमाम लोकांस हिसेबाशिवाय झाडून येकसालां येवज पदरी घालून निरोप दिल्हा. तमाम लोकहि खुशाल होऊन आसीरवाद देते जाहाले.

२३. **जनकोजीच्या नांवें सुभेदारी व शिक्के**

याप्रमाणें वर्तणूक करून दत्ताजी सिंदे[७६] उज्जनीस व जनकोजी सिंदे चांभारगोंदियास[७७] आले. मुलें-माणसें यांसी भेटते समई पुन्हां नवें दुःख जाहालें. आसो. सर्वत्रांनीं विवेक करून, जनकोजी सिंदे याजवर नजर देऊन राहिले. हें वर्तमान नानासाहेब व भाऊसाहेब यांस पुण्यांत कळतांच सिंदे यांचे समाधानास चांभारगोंदियास आले. भेटून बहुतां प्रकारें पोटसी धरून सर्वत्र लहानथोरांचें समाधान केलें. सुभ्याचे[७८] सिके जनकोजी सिंदे यांचे नांवें करून दिल्हे. समजाविसीस आर्धं मारवाड काबीज केलें होतें तें दरोबस्त त्यांजकडेसच दिल्हें. त्यांत कोणाची वांटणी कर्पादिक नाहीं.

---

७४. 'बुदीचा' ही बखरकाराची चूक असून त्याच्या ऐवजीं 'कोटयाचा' असें पाहिजे. हा कोटयाचा राजा महाराज दुर्जनसाल १७५४ मध्यें मरण पावला. त्याची राणी दुर्गावतजी, उदेपूरची राजकन्या, ती निपुत्रिक वारल्यानें गादीबद्दल तंटे माजले. राणीनें आपल्या चुलत घराण्यातील अजितसिंहास दत्तक घेतलें. त्याबाबत तिनें दत्ताजीची मदत घेऊन त्याला चाळीस लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें. (पेप २।६५,६६; फा० १।१७९, १८०; फा. ३।७४; काव्ये. १४४) बखरकाराचा खंडणीचा आंकडा चूक आहे. 'नेणतें' मूल नव्हतें, दत्तक पुत्र राणीपेक्षां वयानें मोठा होता.

७५. 'दायाद पितृव्य पुत्र' साने व सगजो प्रत.

७६. जनकोजी एकटाच चांभारगोंद्यास गेला होता. दत्ताजी मागाहून आला.

७७. 'उज्जनीस' हा शब्द 'चांभारगोंदियास' या शब्दाच्या आधीं साने देतात. तो सन १८७९, १८८६ प्रतींत व भाइसं प्रतींत नाहीं.

७८. 'प्रांताचे व सरंजामाचे व सुभ्याचे' कल्याण प्रत.

## २४. नानासाहेबांची सावनूरकर पठाणांवरील स्वारी

येणेंप्रमाणें समजाविसी करून श्रीमंत सावनूरचे[७९] मोहिमेस गेले. मुराररराव घोरपडे व मुश्फरजंग मिलोन सावनूरचा पठाण त्यासी तंबी पोहोंचऊन, त्याजपासून खंडणी घेऊन, बंकापूरचा किला आपणाकडे करून घेतला आणि देशास आले. तों सिंदे (चांभारगोंदियास) घरीच[८०] होते. मल्हारराव यांणीं घरास येऊन समाधान करावें अशा रदबदल्या घातल्या. परंतु सिंदे यांणीं मानिलें नाही. "आतां त्यांची भेट स्वर्गीं " म्हणौन निष्टुर जाबसाल सागितला. त्याजवरून मल्हारराव आपले जागा खजिल होऊन राहिले. त्याजवर मागती नानासाहेब याणी रघुनाथराव दादा व मल्हारराव होलकर यांस साठ हजार फौजानिसी हिंदुस्थानचे मोहिमेस रवाना केले.[८१]

---

७९. 'शाहापूरचें' भाइसं प्रत, सावनूरवरील मोहीम सन १७५६ च्या जानेवारीत सुरू झाली. खंड ३।४७६, ४७७, ४८१ (यांत तहाच्या अटी आहेत. त्यावरून बखरकारानें बंकापुरसंबंधी केलेला उल्लेख बरोबर ठरतो. ता. १८ मे १७५६ ला तह होऊन नंतर पेशवा पुण्यास आला.)

८०. या वेळीं जनकोजी एकटाच श्रीगोंद्यास होता. त्यावेळी त्याचे लग्न माघ वा। ८ स व्हावयाचें होते (फा. ३।२२०). तें पुढें सप्तमीस झालें. (ता. ३ फेब्रु. १७५७) स्त्रीचें नांव कासीबाई. दत्ताजी लग्नास हजर नव्हता.

८१. रघुनाथरावाची ही दुसरी स्वारी ता. २९. नोव्हेंबर १७५६ पासून ता. १६ सप्टेंबर १७५८. अगदीं त्याच सुमारास अबदाली पंजाबवर चालून आला. योगायोग असा कीं, दादासाहेब उत्तर-हिंदुस्थानांत पोंचावयाच्या सुमारास अबदाली त्या प्रदेशाचा सर्वनाश करून व अगणित लूट घेऊन स्वदेशीं परत गेला ( ता. २४—३ १७५७).

## प्रकरण तिसरें

# प्याद्यानें बार भरला

### २५ मलकाजमानी व नजीबखान यांचें गुप्त संगनमत

तों हिंदुस्थानांत असे वर्तमान जालें कीं, आलमशा[1] पादशाई करीत आसतां वजिरी धाकटा गाजुदीखान करीत होता. त्याजपासी नजीबखान रोहिला प्यादेपणाची जमादारी करून होता. तो दिवसेंदिवस वजीर याची मर्जी संपादून भर घेऊन घोडे घेऊन सिलेदारी करूं लागला. सिलेदारी करितां दैवयोगें करून हजार पाचसेहें लोक बालगून गाजुदीखान याची कुल येख्त्यारी करू लागला सावकारांतहि पत भारी जाली. त्यायोगें कुरुक्षेत्रापासून अलीकडील परगणा व आनरवेद प्रात आगदीं इजारा करून च्यार पांच हजार फौज बाळगून गाजबरी चागलीच करून होता. तों पुढें होणार भवितव्य [तें झालें] आमदशाहा[2] पातशहाची स्त्री मलका जमानी तिची कन्या चंदा जमानी, ऐसी लालगडी** नजीक यमुनेचे बेटावर सलीमगड म्हणौन आहे, थोर किल्यांतून पाण्यास पूल बांधला आहे, त्या पुलावरून दोंही किल्यास येण्याजाण्यास वाट आहे, त्या किल्यांत पादशाहाज्यादे व त्याच्या स्त्रिया जितक्या तितक्यांनीं तेथे राहावें, आणि आनआछादन देतील तितकें घेऊन बदिवानाप्रमाणें आसावें, त्यांत मलका जमानी** होती. तिच्या पोटापाण्याची बहुत तंगचाई, जाणून आपले जागीं विच्यार करिती जाहली की, "मी अहमदशाहा[3] याची पादशाहाज्यादी; आटके आलिकडील मुलूख देखील दक्षिण देशास समुद्रवलयांकित पृथ्वीचें स्वामित्व केलें; आसें आसतां मी आनछादनास यजित जाले? हें दु:ख कोणापासीं सांगावें? आलमशाहा पादशाई करितो[1]. त्यास सांगावें तरी तो आम्हाहून बंदिवान. गाजुदीखान वजीर यास सांगावें तरी तो दिवाना आणि गलिमाचा पुत्र. वर्कड अष्टाधिकारी केवळ निर्माल्यवत्. आतां येक मात्र विच्यार आहे. एक काबिल मनुष्य नजिबखान रोहिला आहे. तो गाजुदीखान याचा वाढविलेला. परंतु त्यास तरि सांगोन पाहावें." म्हणौन विच्यार करून आधीं खोजे गाजुदीखान याजकडे पाठविले. त्याणीं संपूर्ण तात्पर्य[4] विदित केलें. त्याणें उत्तर केलें कीं, "मजकडे कांहीं गुता नाहीं, गिर्दनबाजी गलिमांकडील अंताजी माणकेश्वर आहे त्यास पुसावें;" म्हणौन टाळा[5] दिल्हा. तेथून अंताजी माणकेश्वर याजकडे गेले. त्यासहि तसेंच निवेदन केलें. त्याणें

---

१. दुसरा आलमगीर (३–६–१७५४ ते २९–११–१७५९).

२.३. 'महंमदशहा' पाहिजे; बखर चूक. मलिका अज्जमानी ऊर्फ बादशहा बेगम, ही फरुखसेयर बादशहाची मुलगी व तिचें लग्न महंमदशहाशीं झालें होतें. तिचा मृत्यु १७८८. [पान २० टीप पहा.]

४. 'तापत्रय' सा. सगजो. प्र.; 'मजकूर' मं. प्र.

५. 'जाब' सा. प्र.

उत्तर केलें कीं, "गाजुदीखान यांजकडे जाऊन सांगावें." तसें खोजे माघारे येऊन (त्यांणीं) मलकाजमानीस (सर्व वृत्त) निवेदन केलें. तिणें आपल्या नेत्रांस पाणी आणून खेद करिती जाहाली. त ोत्तर खोजे गुप्तरूपें नजीबखान रोंहिल्याकडे पाठवून त्यास आपणांकडे बोलाऊन नेला. तो गाजुदीखान याचे जिव्हाळियाचा होता. त्यास किल्यांत जाण्यायेण्यास कांहीं आटक नवती. तो मलकाजमानीकडे जाऊन खुरनिसात करून आदपसीर उभा राहून आधोमुखें उत्तर केलें कीं, "मा साहेब! मे तेरा खानाजाद, गुलामकी क्या तक्षीर? क्या हुकूम?" म्हणौन बोलतांच

---

३. बखरकार बादशहाच्या नांवांचा चुकीचा उल्लेख आपल्या लेखनांत वारंवार करतो. पण कामापुरती खरी वंशावळ अशी आहे.—




‡ पूर्ण नांव 'कुत्बद्दीन, मुजमशाहाआलम बहादूर.'

मलकाजमानी इजला दुःखाचा उमाळा येऊन आति आक्रोशें हाबरडा फोडून[६] रुदन करूं लागली आणि नजीबखान यास सांगितलें की, "कुल पातशाई बुडाली. त्यामुळें पातशाई उमराव जिकडील तिकडे आपले जागा गलिमास मिळोन आपली आबरू रक्षून आहेत. आतां रोहिले याचे वीर्याचा[७] असलास तरी पातशाईस फिरोन आवसान घालसील. केवळ मुसलमानीस तांबेरा आला आणि बामणी पातशाई जाहाली. तूं येक आतां आबरू राखिलीस तरी राखसील, ही खातरजमा राखोन तुला मात्र दुःख सांगितलें. हे पातशाई दुसऱ्यास आपले हातून द्यावो; परंतु आसे निर्माल्यवत् राहाणें हें उचित नव्हे." आसें नजीबखान याणें वर्तमान ऐकोन मागती खुरनिशात[८] करून आर्ज केला की, "तकसीर माफ. मी येक आर्ज करितों. तमाम पातशाई उमराव व राजेरजवाडे आगदीं गलिमाचे आज्ञेंत. बल कोणाचे भिस्तीवर बांधावें? आम्ही ज्याचे पदरीं, तो केवळ गलिमाचा ठेवणाईत. बादशाहा तो दिवाणा[९]. आतां तुम्हीं मजला आज्ञा केली तरी मजला साहेबीं सानकरोटी द्यावी कीं मी जो अर्ज करीन त्याप्रमाणें वर्तावें." तेव्हां तिणें ते समई सानकरोटी दिल्ही, आणि विच्यारती जाहाली कीं, "कामाची सुरत मजला सांगावी."

## २६. नादिरशहा कसा आणविला तें वृत्त नजीबखान सांगतो

[असें] म्हणतांच नजीबखान रोहिला बोलता जाहाला कीं, "पूर्वी महंमदशाहा[१०] पादशाहाचे समई वजिरी सुज्यायतदौला याचा बाप मनसूर[१०] अली याजकडे होती. तो महंमदशाहा हक्क जाहालियावर तुमचा भ्रतार अहमदशाहा[१०] यास पातशाई जाहाली. तो केवल नाकाबिल. त्याणीं दक्षिणचा सुभा मुंढा पातशाहा साडेसाहा सुभे दक्षण खाऊन होता. तो साठ हजार फौजेनिसी दिल्लीस चाकरीस आ[णि]ला होता. आसे आणखी दहा पाच उमराव दोन लक्ष घोडेनिसी दिल्लींत होते. तो पूर्वागार तमाम उमराव याणी जसें खिजमतगार आदपसीर उभे राहातात, तसें त्याणी उभें राहावें त्यांत किलीजखान नबाब निज्यामनमुलुख होता. तों पातशाहा तख्तीं बसोन फळफळावळ हर जिन्नस पुढे असल्यास त्याजकडे पाहावें. ज्यानें घ्यावें त्याजकडे पाहावें. त्याणीं खुरनिशा करीत पुढें येऊन हात पसरावे. त्यास काय जिनस आसेल तो कृपा करून द्यावा. तसेंच किलीजखान याचे तोंडाकडे पाहिलें. तो खुरनिशा करीत पुढें आला. तों पादशाहानीं हात आंखडून विनोद केला कीं, "यार हो! दखणी बंदर नाचता है क्या, देखो." आसें पांच सात वेल केलें. तेव्हां

६. 'उभाडा' सा. प्र., सगजो 'उबळा' भाइसं प्र.

७. 'कुळाचा' सगजो 'तुखमाचा' सा. प्र.

८. 'खुर्निसात' सा. प्र.; 'कुरनिशा'

९. बदिवानाप्रमाणें आहे' सा. प्र.

१०. 'महंमदशाह' हेंच बरोबर. त्याची बायको मलिका जमानी. अहंमदशाहा हा तिचा मुलगा. बाप मेल्यावर ता १५-४-५७ रोजी गादीवर आला. मनसूर अली ऊर्फ सफदरजंग हा सन १७४८ मध्यें वजीर झाला, आधीं नाही. त्याचा चुलता व सासरा सादतअलीखान, महंमदशाहाच्या अयोध्या प्रांताचा सुभेदार.

किलीजखान यास विषाद आला. तलव्याची आग्न मस्तकास जाऊन बोलला कीं, "निशा आकताला हुकमत परवरदिगर! आजपासून सहा महिन्यांत पातशाहा आदि करून कुल दिलीस, बाबका[११] बीजका हो तर, कर दिखलाऊँ, 'बंदरका बिकार दिखलावू' तरीच हुशामरे बेग; नही तो ज्यारोंका[१२] बेटा मुछा उखाडणा" म्हणौन प्रतिज्ञा केली. पातशाहा बेहोष. त्याणें सारासार विच्यार ध्यानात राखावा तें न राखिलें, बेफाम राहिला. किलीजखान याणे रूमचा पातशाहा नादरशाहा याजकडे सूत्र[१३] लाऊन त्याची चढाई[१३] दिलीवर करविली. रूमचे पातशाहीखालीं दिलीची पातशाई; तीन लक्ष फौज दिलीपत पातशाहा व पांच लक्ष फौज रूमचा पातशाहा. याजहून [तो] जबरदस्त पातशाहा. त्याणें दोन लक्ष फौजेनिसो मजल दरमजल आटक उतरून, लाहूरच्या सुभ्यास तंबी पोहोंचऊन सत्रंजी[१४] नदी उतरून आलीकडे आला. हें वर्तमान महंमदशाहास[१५] कलतांच त्याणी तमाम वजीर उमराव यासी ताकीद करून पुढें रवाना केले. दक्षणची फौज भारी म्हणौन किलीजखान यास मात्र जवल ठेऊन घेतलें. पुढें मनसूरआली[१६] व जयसिग राजाचा पुत्र व मारवाडी राठोड व छत्रसाल जाठ[१७] व सुरजमल जाठ याचा बाप[१८], आमेरखान[१९] बलोच व सारखान[२०] व बहादरखान[२०] असे सरदार[२१] बहूत दीड लक्ष फौजेनिसी पुढे सडे रवाना केले. झाडून पातशाही रिसाले च्यारसेहें तोफा व दोनसेहें गंजिफियाच्या गाड्या व हस्तनाले व सुतारनाला व जेजाला व रेखले व बंदुखा व बाणाच्या कच्या आसे कुल दारूखाना किलीजखान याजसमागमें देऊन पाणपत कर्नाळ पावेतों पुढें रवाना केले. पुढील फौजेची [इराणीशी] गाठ पडली. तों नादरशाहा पातशाहा रूमचा याची फौज घेऊन दिलीकडे येते जाहाले.[२२] पुढे किलीजखान यास इशारत केली कीं, "आम्ही नादरशाहास घोळवीत घोळवीत तुम्हावर[२३] घेऊन येतों. तुम्ही रिसाल्यात दारूगोली घालून सिध असावें. तुम्हांवर येतो. [येताच] तुम्ही येकदांच सरबती देऊन

---

११. सा. प्र. सगजो. या एकंदर 'बदर' प्रकरणास अजून ऐतिहासिक आधार मिळत नाही.

१२ 'नफरोका' मं. प्र.

१३. या विधानास ऐतिहासिक आधार अजून मिळत नाही; मात्र शहास त्यानें विरोधिलें नाहा हें सत्य होय.

१४. 'शतद्रू' (सतलज) सा. प्र.

१५. अहमदशहा असा पाठ कांहीं प्रतींत आहे, तो चूक आहे.

१६. मागील टीप १० पहा. येथें सादतअली पाहिजे.

१७. छत्रसाल ता. १४ डिसें. १७३१ त मरण पावला होता. नादिरशहाच्या वेळी तो जिवंत नव्हता.

१८. बदनसिग सुरजमलचा बाप होय.

१९. 'अकबरखान' सा. प्र.

२०. सादलखान व बादलखान सा. प्र.

२१. कमरुद्दिनखान, खानडौरान, सादतखान वगैरे बादशाही सरदार नादिरशहावर चालून गेले होते. अर्थात् बखरकारानें दिलेलो नांवें बरोबर दिसत नाहीत आमेरखान, सारखान, बहादरखान वगैरे नांवें मं. व सगजो. प्र. मध्ये नाहींत.

२२. या लढाईचें वर्णन रा. खं. ६। १३१ मध्यें पहा. पेद ३०।२२५; इ. सं. ऐ. च. (वर्ष १, अंक ९) १–९.

२३. 'तुम्हाकडे' भाइसं प्रत.

मागून हौद्यावर चालून घ्यावें. आम्ही इकडून हौदे चालवितों." असा मनसुबा करून नादिरशास वेढून आणिलें. तों किलीजखानाचें व नादिरशाहा याचें सूत्र एकच होतें. नादिरशाहा बेलाशक फौजेचे पाठीवर आला. तो किलीजखान आधीच जाणून सिधच होता. मनसूरअली[२४] याजपासीं आग भारी म्हणौन भडभुजे[२५] अभिधान होतें. तेहि आग किलीजखान याजपाशी राहिली होती. (तिची) किलीजखान याणें दिलीपद-पातशाहाची फौज तोंडापुढे येतांच येकदांच सरबती केली. त्याजवर जसे भडभुजे लाह्या भाजतात तैशी गत केली. तोफांचा व हस्तनालांचा व जेजालाचा व रेखले व गजिफियाच्या गाडयांचा व बागांचा भडमार येकदाच जाहाला. फौज भाजून काढिली. केवळ धुंदी जाहाली. पांच सात हौदे खालीं जाहाले. आपला रिसाला म्हणौन फौज बेफाम उभी राहिली होती. तों घरकलह होऊन विनाशकालीं विपरीत बुद्धी अनभवास आली. पदरचा तमाशा आनभवास आला. घरकलह लागला म्हणजे विनाशकाल जाणावा. आसी गती होतांच फौज भाजून काढिली. त्याजवर नादरशहा-कडील उमराव व इराणी, दुराणी तांम्रमुखें व सीख आदिकरून याणी हौदे चालविले. दिलीपदपातशाहाची फौज मारून धुमधार केली. कांहीं रणांत मेली. कांही ते रानोरान देशावरास गेले. त्यांणीं फिरोन दिल्ली पाहिली नाही. नादिरशहाची फौज चढे घोडयानिसी पोहचली. तों पुढें फौज गेली म्हणोन शहरची बंदोबस्ती न करितां शहरपन्हा खालीच होता. चढे घोडयानिसीं शहर घेतलें. तों शहरास कधीं उपद्रव ऐसा ठाऊक नवता. केवल द्वारकेप्रमाणें दिल्ली नांदत होती. ऐशा शहरचा चिंधीचोला केला.[२६] इराणी, दुराणी आरबुज जात, कित्येक लोक यांनी जीव दिल्हे व कितेक लोकांच्या स्त्रियांच्या इराणी याणीं आबरू घेतल्या. शहरची गत या रीतीची केली. फौज लालगडीं किल्यास लागली. तों दिल्लीचा किला आपेसी दोहोंचोहों रोजांत किला हस्तगत जाहाला. महंमदशाहा पातशहास धरून कैद केलें.[२७] पादशाही तोशीखाना झाडून लुटला. पातशाहीजादीची देखील आबरू राखिली नाहीं. किल्यातून वस्त्रहरण करून पातशाई तख्त देखील काढिलें. तख्तावरील कच्येरीस रुप्याचें छत होतें, तेव्हढें मात्र मर्यादा राखिली. अवघ्या शहराचा विनाश करून पादशा कैद करून नादरशहा याणें मजमूचे टिळियावर मुकाम करून राहिला. किलीजखान याजकडे रिसाला व तोफा व फौज मागून बाह्यार्थ कृत्रिम सिष्टाई करून नादरशाहास भेटून पातशहास सोडविलें. ऐसी नादिरशाई जाहाल्यावर तो आपल्या रुमाकडे गेला. पादशाई उमराव जिकडील तिकडे आपआपले ठिकाणास गेले. ते फिरोन हा दिवसपर्यंत कोणी आले नाहीत. मनसूर आली गंगापार गेला.[२८] तो अयोधेचा सुभा साभाळून तिकडेच

---

२४. 'मनसूर अली' बद्दल सादतअलीखान पाहिजे.

२५. हें उपनांव कागदोपत्रीं आहे. पेद. ३०, २२३.

२६. रा. खं. ६, १६६ पहा.

२७. यापूर्वीच तो कैद झाला होता.

२८. मनसूर अलीचा हा उल्लेख बरोबर आहे; सादतअली विषप्राशन करून ता. ९–३–१७३९ रोजीं मेला.

राहिला. पुन्हां भागीरथी उतरून अलीकडे आला नाहीं. तेव्हां महंमदशाहा[२९] सहजच निर्माल्यवत् [जाहाला]. येक किलीजखान मात्र जवल भारी ते वेलेस होता. किलीजखान पातशहाप्रति बोलता जाहला कीं, "दखनी बंदर किस तऱ्हेसे नाचता है" हे साहेबाचे खातरेस आलें किंव्हा नाहीं?" म्हणोन बोलतांच बादशाहास परम विषाद आला. 'जोर थोडा, घुसा बडा'. काय करील. किलीजखान याणें आपला पुत्र गाजुदेखान होता, त्यास वजिरी देऊन आपण बंदोबस्त करून किलीजखान दक्षिणेस आला. याप्रमाणें वर्तणूक जाहाली. हें तुम्हांसहि वर्तमान सर्व माहीत आहे." म्हणोन नजीबखान रोहिला सविस्तर बोलतां जाहाला. "आतां त्या तागाईत पातशाई उमराव गलिमास मिळोन आपली आबरू रक्षून आहेत. त्यांत मनसूरआली ज्याचा पुत्र सुजायत–दवला यास मात्र वजिरीचें दुःख आहे. त्याजपासीं पनास-साठ हजार फौज व तीनशें तोफा आहेत. तो मात्र 'लगामीं लागेल.' मारवाड प्रांतांतील बिजेसिंग राठोड तो गलिमासी मिलताव नाही. तोहि प्रयत्न केल्यास हास्तगत होईल माधवसिंग जयनगरकर याचाहि दोहों डगरीवर हात आहे. सुरजमल जाट तो आपला नव्हे. तसेच बुंदीले व आणखी उमराव आपले नव्हेत. परंतु[३०] त्यांस आधीं येक निमित्य घ्यावें लागेल. तें निमित्य जर म्यां घेतलें तर मजला जरा आश्रय पाहिजे. आता उपाय येक आहे. खंदारचा बादशहा आबदुल आली दुराणी येक मातबर आहे. त्याचा पुत्र तमूरशहा[३१] यास तुमची कन्या चंदाजमानी द्यावी. दिल्लीचा बादशा आदमशाहास[३२] मारून पातशाही तैमूरशहासच द्यावी व वजिरी सुजायतदवला यांस द्यावी आणि बक्षीगिरी मजला द्यावी. असा करार होत असल्यास हुकूम जाहालियास प्रयत्न करून पाहीन." म्हणोन बोलोन खुरनिसी केली. हें मलकाजमानीनें ऐकोन मान्य करिती जाहाली. 'स्त्रीबुद्धिः प्रलयं गता!' तिचें यांत काय जातें?

**२७. नजीबखान घरभेद देऊन अहमदशहास दिल्लीवर आणवितो.**

याप्रमाणें तिचा याचा करारमदार होऊन नजीबखान याणें ठिकाणास येऊन वकील याजबरोबर सुज्यात–दवले[३३] याजकडे पत्र पाठविलें. याणें पत्र पाहून, परम खुशाली मानून वकिलापासी इमान सानकरोटी[३४] दिली कीं, "मी सर्वस्वी तुमचा आहें. हिंमत धराल तर, फौज, लागेल तितका पैसा पुरवीन. परंतु वजारत येक वेळ करीन." म्हणोन बोलिले. याप्रमाणें वकिलानें खचित करून माघारें आले. तसेंच जयनगरकर व अमदखान[३५] लंगडा व बिजेसिंग यांजकडीलहि इतला[३६] घेतला. [मग]

---

२९. हा उल्लेख बरोबर. इतर काही प्रतींत अहमदशहा असा चुकीचा पाठ आहे.

३०. 'यास आधी निमित्यास धनी पाहिजे' साने प्रत.

३१. 'तंबूरशाह' असा पु. क. भाइसं. प्रतोचा सर्वत्र पाठ आहे.

३२. 'आलमशाहा' असा चुकीचा पाठ कांहीं प्रतींत आहे.

३३. 'याजबरोबर सुजायत दवले' हे शब्द सा. प्रतीत नाहींत.

३४. 'सानकरोटीची शपत दिली' भाइसं प्रत.

३५. 'हामदखान' साने प्रत.

३६. 'सूत्र ठीक करून' सा. प्र.

आपला भाऊ सुलतानखान[३७] रोहिला यास आबदल आलीकडे खंदारास पाठविलें कीं, "दिलीचा पातशाहास तुमचे हस्तगत करून तुझा पुत्र तैमूरशाहास पादशाई देऊन, मलकाजमानीची कन्या चंदाजमानी तैमूरशाहास देईन. दिलीचा भेद झाडून मजपासी आहे. 'चढया घोडयानिसी' दिलीचा किला हस्तगत क न देईन." म्हणोन भावास खंदारास पाठविला. हें वर्तमान गाजुदीखान यास रतिमात्र ठाऊक नाहीं. इकडे तो नजीबखान रोहिला केवल हितशत्रूप्रमाणें [गाजुदिखान यास] जाबसाल करून, केवल त्याचा उपक्रम राखून[३८], 'तमाम गारुडी रान भारितो' तसा प्रकार [त्यानें] केला. सुलतानखान खंदारास जाऊन पोहोंचला. अबदुल आलीस भेटून येथील[३९] वृत्तांत निवेदन केला. तोहि आधींच इकडे यावयास आतुर[४०] होता. "वजिरी सुज्यातदौला यास द्यावी, मलकाजमानीची कन्या चंदाजमानी तैमूरशाहास देऊन दिलीची पातशाई तैमूशाहास द्यावी, आणि बक्षीगिरी नजीबखान यास द्यावी" या प्रमाणें करार करून ऐशीं हजार फौजेनिसीं दिलीवर चाल केली. लाहूर, मुलतान, पंजाब कुल मुलुख काबीज करून व्यासगंगा व चिनाब व शतद्रु नदी उतरून सरंदेस मुकाम केला.

---

३७. 'तमनखान' भाइसं प्र.
३८. 'करून' साने प्रत.
३९. 'तेथील' भाइसं प्रत.
४०. कारण, यापूर्वीं त्यानें हिंदुस्थानावर एकदोन स्वाऱ्या केल्या असूनहि फारसें साधलें नव्हतें.

प्रकरण चवथें

# प्याद्याचा बार उडाला; पण वायां गेला

## २८. नजीबखानाचा मायावीपणा व गाजुदीखान वजिराची फसगत

(अबदाली सरहिंदेस आल्याची) पकी बातमी दिलीस गाजुदीखान वजीर यास कलली कीं, "दुराणीची दौड निश्चयें करून दिलीवर आली." तेव्हां नजीबखान रोहिला मात्र चार हजार फौजेनिसीं मातबर माणूस वजिराजवल होता. तसेंच गलिमापैकीं आंताजी माणकेश्वर शहरचे गिर्दनबाजीस पांच हजार फौजेनसी होते. ते समई गाजुदीखान याणें पातशाई कारभारी नगरमल व बहादरखान बलोचे व आंताजी माणकेश्वर व नजीबखान रोहिला असे मिलोन परम आजीद होऊन मनसुबा पुसता जाहला कीं, "दुराणीची दौड भारी,[1] दक्षणच्या फौजा गलीम झाडून दक्षणेस गेले, आतां येक नजीबखान रोहिला व आंताजीपंत हे दोघे मातबर आहेत. तेहि झाडून दाहा हजार. यासी उपाय काय करावा?" हे वर्तमान ऐकोन आवघे दंग जाहले. येकमेकांस कोणी कोणास बोलेनात. आसे मुहूर्तमात्र स्तब्ध राहिले. तों नजीबखान रोहिला, केवल मात्रागमनी, याणें उठोन खुरनीस करून आर्ज केला कीं, "मी साहेबांचे पदरी आहें तों वजिरानीं कांहीं फिकीर न करावी. आतां त्याजपासीं युद्ध करावयास सामर्थ्य नाही; तर मजला हुकूम करावा. आडवा जाऊन त्यास भटून कलेल तैसा साम, दाम, दंड, बुद्धिभेद[2] त्यासी करून दिलीस न येतां तेथूनच माघार फिरऊन लावीन." म्हणोन हितशत्रुपणें बोलतांच गाजुदीखान यांस वाटलें की नजीबखान केवल प्राणाचाहि प्राण, प्राणाहून परता, त्याजवर काया कुरवांडी करावी. म्हणोन बहुत प्रकारें (त्याचें) समाधान करून, त्यास हती व घोडा व सिरपेंच व तुरा देऊन त्याची रवानगी केली.

## २९. भेद्या नजीबखान अहमदशहा अबदलीसससैन्य मिळतो

तों आबदुल आली तेथून कूच करून कुरुक्षेत्रावर आला. तेथील तीर्थं विध्वंस करून ब्राह्मणांचीं घरें पाडून आठ मुकाम तेथे केले. त्या मुकामीं नजीबखान रोहिला जाऊन पोहोंचला. ते समई आबदुल आलीकडील वजीर व सैमदखान[3] कतलबाज आडवे येऊन बहूत सन्मानें घेऊन गेले. पातशहाची भेट जाहाली. तेथें सुकाणू सुलतान[4] होता. भेट होतांच दारमदार करून पूर्ववत्प्रमाणें करारमदार करून त्याची सानकरोटी यास आली. याणें आपली सानकरोटी त्यास दिल्ही. ते समईंच तेथून कूच

---

१. 'बदनजर धरून दिल्लीवर चाल करून येत आहे' असें वाक्य 'भारी'पुढें कल्याण प्र. देते.

२. 'भेद' भाइसं प्रत.

३. 'सय्यद अब्दलखान' शें. प्रत.; 'समदखान कत्तलबाज' तु. प्रत.; 'शहामतखान' पाठभेद.

४. 'सुका सुलतान' तुं. प्रत.; 'सूत्रधार' सां. क. प्रती. 'सुभवली' शें. प्र.

करून पाणिपत-कर्नाल येथें आले. ते समई बाहादरखान बलोचे याचा पुत्र, बाहादरगड येथें होता तो, रातोरात दिलीस येऊन पोहोंचला. इकडून नजीबखान याणीं स्वारांसमागमे[५] वरचेवर पत्रें पाठविलीं कीं, "वजिरानीं काही फिकीर न करावी." त्याजवरून हे आपले जागां स्वस्थ होते. बाहादरखान याचा पुत्र येऊन, वजिरास भेटून, तेथील सर्व सविस्तर सांगितलें की, "नजीबखान[६] त्याजकडे मिळाला.[७] येक दोन रोजात येऊन पोहोंचतो.[७] तुम्ही त्या मात्रागमनीवर विश्वासून स्वस्थ कसे राहिला?"

### ३०. अबदली दिल्लीची कत्तल व पादशहास वजिरासह कैद करतो.

हें वर्तमान वजिरानें ऐकोन बहूत घाबरा जाहला. "मात्रागमनीनें निमखहरामी केली. यास यत्न काय करावा?" म्हणोन आंताजी माणकेश्वर यांस बोलावून सांगितले की, "तुम्ही शहरची गिर्दनबाजी करावी, मी किला सांभाळतो." हें आताजीपतानी ऐकोन साफ उत्तर केलें की, "शहरपन्हा थोर फौज थोडी, आम्हास हे हिमत होत नाही." म्हणोन कूच करून बालमगडावरी जाऊन मुक्काम केला, तों दुराणीहि दुसरे दिवशी येऊन पोहोंचला. आधीच शहर खाली आणि नजीबखान तो केवल भेद्या[७]! चढते घोड्यानिसीं शहर घेतलें. तों गिलज्याची ताकीद भारी. शहरात दहा हजार गिलच्यांनीं मारिले.[८] केवल धुंदी जाहाली. शहराचा नाश केला. पूर्वीं नादरशाई जाहली त्याहून भारी प्रलय जाहला. तों आबदुल आली दुराणी जुमा मशिदीस येऊन आपला स्वधर्म उजूतवाजू करीत होता. तों आर्जबेगांनीं आर्ज केला कीं, "शहरांत गर्दी होऊन दुराणीची बहूत कत्तल जाहली." तों नजीबखान रोहिला व सैमदखान कत्तलबाज जवल होता. तो आबदुल आलीनें त्याचे तोंडाकडे पाहून जवल निमच्या होता तो अर्धा ओढून जवल ठेवितांच 'कतल' म्हणोन[९] पुकार जाहाला ते समई, त्याची कतल काय की, पुरुष मारावे आसा नेम[१०] नाही; पुरुष, पोर, स्त्री, कुतरी, घोडी, गाढवें, गुरूं वगैरे हातांखाली जें सापडेल तें मारावें.[११] आसी साडेतीन घटकापर्यंत कतल जाहाली. आबदुल आलीनें निमाज करून करांचली वोढून ठेविली होती, तीस मेण करून ठेविले. मेण करिताच 'द्वाही' म्हणोन पुकार जाहाला. तो गिलच्यांची कैद भारी. ताकीद म्हणतांच मानेवर सुरी ठेविली आसली तरी सोडावे. साडेतीन घटिकांत अठरा हजार मनुष्य कतल झाले[१२]! तो प्रलय[१५] लिहून कळवावा याप्रमाणें नाही! शहरचा चिंधीचोळा करोन, किल्यास

---

५. 'सांडणीस्वारांसमागमें' सा प्र.

६. 'नजीबखान याजकडील वकील येक दोन रोजांत येऊन पोहोंचतात' भाइसं व मं. प्र.

७. 'हकहरामी' सगजो. 'नजीबखान तो हकहरामी बहुत आहे. तेव्हां जे करणें तें सांभाळून करावें. नाहीतर त्याजला धरून आणावें. अशी ताकीद बादशहानें केली.' सां. व तुं., सगजो. प्रती.

८. 'तों शाहरात दहा पांच हजार गिलचे मारले गेले. केवळ धुंदी जाली' असा तुगार प्रतीचा पाठ आहे.

९. कत्तल करण्याचा इषारा देण्याची ही पद्धति त्यावेळीं रूढ असावी.

१०. 'अर्थ' सा. प्र.

११. 'त्याची कतल करावी' सा. प्र.

१२. 'मनुष्याची कत्तल जाहाली' सां. प्र.

येऊन लागलें. दों चहों दिवसांत किलाहि[15] घेतला. पातशहा आलमशहा होता तो कैद केला. गाजुदीखान यासी धरून त्यासीहि कैद केलें. त्याची मावळण[13] व बहीण व त्याच्या कलवातिणी वगैरे नजीबखान मात्रागमनी याणें आपल्या घरांत घातल्या. नजीबखान मात्रागमनी तो या प्रकारचा! मलकाजमानीची कन्या होती ती चंदाजमानी तैमूरशाहास दिल्ही.[14] दोन च्यार रोज तेथें राहून[15] पुढें आगरियाचे रोखें चाल केली· समागमें कैदेत गाजुदीखान ठेविला होता त्यासहि घेतलें; आलमशाहा बादशाहास किल्यांतच कैद करून ठेविलें.

**३१. अंताजी माणकेश्वराचें पलायन : अबदली मथुरा-वृंदावनची धूळदाण व कत्तल करतो.**

तों आंताजी माणकेश्वर (येऊन) पलवलावर राहिले. नजीबखान याणें गाजुदीखान याचा सिरच्छेद करावा म्हणोन बहूत केला; परंतु ते समई आबदुल आलीनें[16] राखिलें. आंताजीपंत यांची बातमी पलाल्याची[17] कलतांच सैमदखान कतलबाज पधरा हजार फौजेनिशी त्याजवर गेला. आंताजी माणकेश्वर यांणी हिंमत धरून येक वेल फौजेचा मोकाबला घेतला.[18] तों यांची जड काया, धाकटे घोडीवर थोर घोडा टाकावा[19] तो धाकटा दबून राहतो, तैसा प्रकार जाहला. दोन घटका मारामारी[20] जाहली. तों आंताजीपंतास साहेनासें जाले. आंताजी माणकेश्वर रेवाडीचे रोखें[21] निघोन गेले. पांच हजार फौजेंतून आडीच हजार फौजेची कत्तल जाहली. जितके निवडक मनुष्य होते तितके ठार जाहाले तों खांसा आबदुल अलीचा मुकाम पलवलावर जाहला. पुढील आघाडीची फौज होडलवरून[22] छयाचे सराईवर जाऊन पोहोंचली. तेथून मथुरा-वृंदावन कचे सोळा कोस राहिले. मथुरेतील ब्राह्मण व बहिरागी यांसी गलिमाची फौज इतबारी म्हणोन आसावध होते. तों येकायेकीं

---

१३. त्याचे मामास धरिला. वजीर याची बाईल व कळवंतीण वगैरे क. प्र. 'त्याचा मावळा' भाइसं प्र.

१४. चंदाजमानी ऊर्फ महंमदी बेगम हिचें लग्न तैमूरशहाशी १७५७ च्या फेब्रुवारीत झालें.

१५. अबदलीने दिल्लीवर केलेला जुलूम. बखरीचें वर्णन अपुरें. पहा, रा. खं. १,६३; पेद. २१, ९८, ९९, १०४, ११८; पेद. २७, १४४, १५२; पेद. २, ७१ इ सं. वर्ष २, अंक ८, ऐ. टि. ३१.

१६. 'कैदेंत आहे म्हणून' असे शब्द 'अलीने' पुढें सा. प्र. मध्ये आहेत.

१७. 'पलवल्याची' सगजो. शें. म. प्र.

१८. 'गांठ पडोन अंताजी माणकेश्वर यांणी हिंमत धरून लढाई देऊन त्यांचा मोहोरा फिरवून देऊन आपण निघोन रेवाडीचे रोखे [निघाले]. दोन घटका मोठी कराचलीची हातघाई जाली. क. प्र अंताजी माणकेश्वराशी झालेला मोकाबला. पेद. २१; ९५, ९६, ९९, १०५; रा ख १, ६३.

१९. 'सोडावा' म. प्र.

२०. 'खणाखणी, हाणाहाणी, सणासणी' तु सा. सगजो.

२१. 'मुकामी' पु. प्र.

२२. 'होडेववरू' शें. प्र.; होडले कडोन छऱ्याचें राईस' जाऊन राहिली.' सां. प्र. 'होडळेवरून छयार्त राइस'; तु. प्र.; 'हाडवावरून छारेसराईस' धो. प्र.; 'होडेवरून छाती सराहीवर' सां. क. प्र.

झाडून दौड येऊन पोहोंचली. वृंदावनांत आठ[२३] हजार बहिरागी होते ते हातयार धरून मेले. गिलच्यानें गोघाटांत दाहा-पांच बहिरागी सत्पुरुष* होते त्यांसहि बसले ठिकाणी जेब केले. दुराणी केवल निर्दय[२४], त्यांस मनुष्याची परवा नाहो. तसेच मथुरेंत हजार दीडहजार ब्राह्मण मारिले. तरुण ब्राह्मणी व आन्यत्र जातीच्या स्त्रिया होत्या, त्यांस बंध धरून नेल्या.[२५] त्यांत कितेक पतिव्रता स्त्रिया होत्या. त्याणीं जिवावर उदार होऊन यमुनेंत जीव द्यावा म्हणोन डोहांत चालिल्या. तों 'संकटी ईश्वर साह्य' तसें जाहालें. प्रत्यक्षास प्रमाण. डोहांत पाणी भालाभर असता बायकास मांडयाइतकें लागोन नदीपार जाहल्या. त्यांच्या मागें गिलचे यांणी घोडी घातलीं तों ते बुडों लागले! ईश्वरानें कौतुक केलें. ही गोष्ट कोणी मिथ्या मानावी आसी नाहीं. बहूत साक्षी आहेत.

**३२. गाजुदीखान वजीर पोहत आग्रा किल्यापर्यंत जातो.**

या प्रकारें या क्षेत्राची चिंधीचोला करून गोकुल पलीकडे गोघाट [आहे]. **पूर्वी देव गाई त्या डोहावर[२६] पाणी पाजावयास आणीत होते म्हणोन 'गोघाट' नांव पडलें.[२७]** तेथून कचे सात कोश आगरियाचा किला होता. तेथून यमुनेचे तीरानें मुकाम दुराणीचा जाहला होता. गाजुदीखान कैदेंत होता. त्याची राऊटी नदीचे कडेस होती. भोंवताले रखवालीचे रोहिले सावधच होते. पाणियाचे रोखे पाणी भारी म्हणोन गैरसावध होते. ते समई गाजुदीखान यास पाणियांत पोवावयाचा सराव चांगळा होता. त्याणें राखणदार याची नदर चुकाऊन रात्रीचे ठायीं डोहांत गेला. पोवत नदीचे तीर सुटून मध्यभागीं कांही पोवत कांही ठाव घेत आसें आगरियास जाऊन पोहोंचला[२८] कडेस पोहोंचले तों रात्र च्यार घटका पाहांटेची राहिली होती. ते समई उघडा-बोडकाच किल्याचे दरवाजियापासीं जाऊन पोहोंचला. तों जवल शाह लस्करचा भारी म्हणोन किलाहि सावधच होता. तेव्हां दरवाजियाचे लोकांस हांक मारून सांगितलें कीं, "मी गाजुदीखान आस्या आरिष्टांतून पार पडोन तुमचे पाठीसी निघावयास[२९] आलों आहे. आजिचे समई मजला किल्यांत घेऊन जीवदान द्यावें, आसें किलेदार यांस सांगावें." हे वर्तमान किलेदारास दरवाजेकरी याणीं सांगतांच किलेदारानें मशाल लाऊन दरवाजियाच्या खिडक्यांतून[३०] बाहेर आला.[३१]

---

२३. 'साठ' भाइसं—पु. सां. प्रती 'सात आठ' शें. क. प्रती.

***अबदालीचा मथुरेवर अनर्थ** : पेद २१ १०७, १०८. २७, १५२. फा. ३. ३४४. रा. खं. १, ६३. बखरीतील मजकूर पत्राशी जुळता आहे.

२४. 'जर्ब' पु. प्र. 'लंबे' सा. १८७९ व १८८६.

२५. 'त्या धरून ठेविल्या.' सा. प्र.; 'बांध धरून नेल्या' तुं. प्र.; 'बंद धरून' सगजो.

२६. 'घाटावर' सा. भाइसं. प्र.

२७. 'पावला' सगजो.

२८. 'निघोन' सा. प्र.

२९. 'रिघावयास' मं. प्र.

३०. 'खिडक्या उघडून' सा. प्र. 'दिंडया उघडून' क. प्र. 'दिंडयातून' प्र.

३१. गाजीउद्दिनाच्या पलायनाची ही हकीगत चित्य वाटते.

### ३३. आग्रा किल्याचें वर्णन

आगरियाचा किल्ला यमुनेच्या तीरी आहे. येकीकडून यमुनेचा खंदक व येकीकडून खाणून दोंहि तोंडी यमुनेस मिळऊन खंदकात पाणी विपुल.[३२] दरवाजियापुढें खंदकावरील फल्यावरून[३३] जावे-यावे. फल्या काढल्यावर यत्न नाही. तो किला केवल आसाध्य. येकात येक पाच परीघ किल्यास दर परिघास दोन सेहें तोफा व सिवाय धाकटी यत्रे. आस्या किल्यावरी बारासे तोफा वगैरे [यंत्रे] दारूगोळी वगैरे सरंजाम पोक्त. केवल दुर्ग आववड. आगरियाप्रमाणे भुईकोट किला, कोठें उपमेस नाहीं. ज्या वेलेस अकबरशाहा पातशाहा याणी किला बाधिला त्या वेलेस किलेदार व आतील सामान यत्रधारी व गोलंदाज ठेविले. ते वंशपरपरे किल्यांत राहात आले. अलीकडे[३४] आवरंगजेब माहाबळी आदिकरून पातशाहा जाहाले आणि गलिमाची प्रबलता जाहाली; पलीकडे आटकेपर्यंत मुलूक गलिमानी काबीज केला; परंतु किला कोणास आला नाही. सुरुजमल जाठ यास सैन्याचा गर्व होता.[३५] त्यास शहराची गिर्दनवाजी दिली होती. परतु त्यासहि किला आला[३६] नाही. त्याचें वतन, ज्याणी आगरियाचे महालाचें स्वामित्व करावे, त्यांणी किल्यांतील पोटापाण्याची बदोबस्ती करावी. तो किला अकबर पातशाहा यांणी कांही पृथिवीदिग्विजय करून द्रव्य मिळऊन बाधला नाहीं. त्यास किमया आवलिया फकिरापासून प्राप्त जाहली होती. त्या किमयाचे द्रव्येंकरून येवढें असाध्य दुर्ग निर्माण[३७] केलें होतें. दारूगोळा, यत्राचें साहित्य याजप्रमाणें कोणत्याहि किल्यावर नाहीं.

### ३४. गाजुदीखानास आग्रा किल्यांत आश्रय

तेथें गाजुदीखान पोहोचतांच किलेदार बाहेर येऊन वोलख घेतली, तों गाजुदीखान प्रमाण. त्यांणी जीवदान मागतांच किलेदार बोलता जाहाला की, "ज्यापासून आम्हांस किल्याची किलेदारी, त्यापासून आतांपर्यंत कधीं परकी मनुष्य कधी आंत येऊं दिल्हा नाही." आसे म्हणतांच गाजुदीखान याणें उत्तर केलें कीं, "तुमचा आश्रय धरून जीव जगवावयास हृदयीं निश्चय करून येथवर आलों. यमुनेनेंहि[३८] तारिलें. आतां आपले हातून मारून टाकणें किंवा किल्यांत घेणें." ऐसें ऐकोन किलेदार याणें चितांत विचार[३९] केला कीं, "येक पुरुष आंत आल्यास काय होतें ? या समई यासी रक्षावें हेंच उचित."[४०] म्हणोन किल्यांत घेतला. वस्त्रें देऊन समाधान केलें. मुदारतीनें ठेविलें.[३८]

---

३२. 'बेमुबलक' सा. प्र.

३३. त्या दादरावरून किल्ल्यास जाण्यायेण्यास मार्ग' क. प्र.

३४ 'वर' मं. प्र.

३५. 'जाठ फौजें करून मोठा बलिष्ठ आणि गर्वहि बहुत होता.' सा. प्र.

३६. 'असाध्य' सा. प्र.

३७. 'एकशेहें आठ दुर्ग बांधले' क. प्र.

३८. हें वाक्य १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं.

३९. 'योजना' सा. प्र.

४०. 'उत्तम' भाइसं. प्र.

### ३५. अबदली व आग्रा किलेदार

तों मागें गाजुदीखान गेला म्हणोन हांक जाहाली. नजीबखान रोहिला याणें चौकीदार यांचा शिरछेद केला. गाजुदीखान याचा शोध[४१] केला. तों वजीर आगरियाचे किल्यास दाखल जाहाला हें ऐकोन नजीबखान मनगटें चावूं लागला. कूच करून, आबदुल आली यमुना पार होऊन आगरियाचे किल्यानजीक मुकाम करून राहिला. पांच गिलचे व पत्रें किलेदारास लिहिलीं कीं, "गाजुदीखान यासी आमच्या हाती देणें आणि किला खालीं करून देणें. नाहींतर, मी खंदारचा पातशाहा आबदुल आली आहे, किला खाणून यमुनेंत टाकीन आणि तुझा शिरछेद करून तुझी बायकांमुलें[४२] ढाणकास[४३] देईन." म्हणोन रवाना केलें. ते किल्यास पोहोंचले. किलेदार याणी पत्रे वाचून पाहिली. चितांत विच्यार केला की, "आबदुल आली पातशाहा शाहाणा म्हणोन ऐकतो;[४४] आसें असता आसा प्रकार लिहिला! त्याचा खावंद नादरशाहा आला होता त्याणें केलें काय ? तें याच्या हातें होणें काय ? तथापि हुशारी केली पाहिजे." म्हणोन किलेदार याणें शहरातील शोध केला.[४५] शहर निखालस उज्याड जाहालें, की वस्ती काय आहे ? तों शहरांतील थोरथोर मनुष्य भारधडी झाडून परागंदा जाहाली होती. गोरगरोबें मात्र राहिलो होतीं.[४६] किलेदार याणी शहाणपण केलें कीं, "गिलज्या आम्हास बुडवितो. त्यास धुडावूं तरी जी गत दिलीची व मथुरेची जाहाली तीच गत आगरियाची होईल." आसें म्हणोन दोघे गिलचे दरवाजियात ठेऊन घेतले, तिघे मात्र उत्तर देऊन माघारे पाठविलें कीं, "पातशाहानी च्यार दिवस कृपा करून सांभाळावें.[४७] चौ दिवसी किला खाली करून देतों आणि गाजुदीखान वजीरहि हावाली[४८] करतो" म्हणोन लिहून पाठविले.[४९] [आणि किल्यात मोठमोठे लोक कबिलेसहित होते व गोरगरीब होते त्यास सांगितलें कीं, तुम्ही च्यार दिवस बाहेर जावें, किल्यात राहण्याचें प्रयोजन नाहीं. अशी ताकीद करून धांडोरा पिटवून काढून दिलें. कारणिक लढाऊ लोक मात्र किल्यांत ठेविले, बाकीचा खेळखाना काढिला.]

### ३६. अबदली आग्र्याचा शह सोडून जातो

हिकडे तमाम शहरांत ताकीद करून शहर चौ रोजांत बेचिराख केलें. आगरियांत कुत्रेहि राहिलें नाही, तेथें मनुष्य कोठून राहील ? आसें जाहलियावर किलेदार

---

४१. 'तपास' सा. प्र., 'तलास' सगजो.

४२. 'रांडापोरें' सा. प्र.

४३. 'ढानकास देईन' सां. प्र.

४४. यापुढें 'या पत्रावरून सुकरच दिसतो. मस्ती फार असे' असा सां. प्र. चा पाठ आहे.

४५. हें वाक्य १८७९ व १८८६ सा. प्रतींत आहे; पण तें पुढील आवृत्तीत पादटीपेंत दाखल आहे.

४६. हे वाक्य भाइसं. व मं. प्र. मध्यें आहे.

४७ 'सांभाळून घ्यावें' शें. प्र.; 'चार दिवस कृपा करावी.' सा. प्र.

४८. 'हजर' सा. व शें. प्र.

४९. चौकटी कंसांतील सर्व मजकूर सान्यांच्या १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं, पुढील प्रतींत आहे. भाइसं व मंडळ प्रतींतहि तो आहे.

यांणीं ज्या रोखें गिलज्याचा मुकाम होता त्या रोखें च्यारशें तोफा दारूगोळा भरून सिध करून आबदुल आलीस येक चिठी लिहिली कीं, "आज आमचा खुशालीचा[५०] दिवस आहे. जलद कूच करणें, नाहीतर तोफांची सिलक[५१] झडल." म्हणोन चिठी लिहिली. येक गिलिज्यास तोफेचे तोंडी देऊन उडविला. येक चिठी देऊन पाठविला. हें वर्तमान आबदुल आलीस व नजीबजखान यास कळून मनगट चाऊन[५२] किल्यावर हल्ला करावा म्हणोन फौज सिध केली. तों किलेदार याणेंच च्यारशें तोफांची येकदांच सरबती केली. [गिलज्याच्या] फौजेंत च्यारशें गोला ऊन पडला, तों मोठा प्रलय जाहाला. जलदीनें लस्कर तयार होऊन पळों लागलें. दोन-तीन कोश जाऊन दम खादला. तेथेहि लांब पल्याच्या तोफांच्या गोल्यापुढें टिकाव होईनासा जाहला. तेव्हां [गिलिज्यानें] पांच कोसांवर मुकाम केला. नजीबखान रोहिला यांसी आबदुल आलीनें मसलत विच्यारिली कीं, "कसें करावें ?" तेव्हां नजीबखान याणें उतर केलें कीं, "आगरियाचा किला भारी. तेथें कोणाचा यत्न चालावयाचा[५३] नाही. तेथें शहास गुंतू नये. देशाहून[५४] गलिमाच्या फौजा रघुनाथराव दादासाहेब व मल्हारराव होळकर नर्मदा आलीकडे आले आहेत. अशी बातमी तहकीक आली आहे. ह्या शहास गुतून उपयोग नाहीं." म्हणोन कूच करून कुंभेरीचे रोखें चाल केली.

### ३७. अबदली व सुरजमल जाट कागदपत्रीं स्नेह

तिकडे गेल्यावर सुरजमल जाट यास चिठी लिहिली की, "क्रोड रुपये खंडणी घेऊन हुजूर भेटीस येणें." त्याजवरून सुरजमल जाट याणें रूपराम कटारी यासी बोलाऊन मनसोबा[५५] विच्यारिला कीं, "आबदुल आली खंदारचा पातशाहा चालून आला, सामान्य नव्हे, यास जाबसाल काय करावा ?" रूपराम कटारी मोठा मनसोबाबाज. याणें उतर केलें कीं, "देशीहून पेशव्या गलिमांच्या फौजा नर्मदा उतरून आल्या. यास शहास गुतावयास[५६] दम निघत नाही. मेजवानी म्हणोन दाहा लक्ष रुपये देतो, घेत आसल्यास उत्तम, नाही तर झुजास उभें राहावें. तोंपावेतों गलिमहि येऊन पोहोचतील." हा मनसोबा सुरजमल जाट याचे ध्यानास आला. आबदुल आलीस पत्राचें उत्तर लिहिलें कीं, "दाहा लक्ष रुपये मेजवानी देतों. हे घेऊन स्नेह राखून जावें, नाहीतर युध्यास उभें राहावें. आम्ही सिध आहों" म्हणोन पत्र येतांच यांणींहि गलिमाच्या धास्तीवर मान्य केलें. दाहा लक्ष रुपये [व] परस्परे कागदोपत्रीं स्नेह संपादून दिलीस पोंचले.

---

५०. 'सणाचा आमंदाचा' सां. प्र.

५१. 'सिलक होईल' सा. शें. प्र. 'शिस्त होईल' सां. प्र.

५२. 'चोळन' क. प्र.

५३. 'यत्न...नाहीं' यापुढें सा. प्र. त पुढील वाक्यें आहेत पण तीं १८७९ व १८८६ प्रतींत नाहींत. "किला मोठा बिकट आहे. फितुरीशिवाय किमपि यावयाचा नाहीं. येथें आम्हांस गुतणें भलें नव्हे."

५४. 'दक्षिणेकडून' सां. प्र. 'देशीहून' सा. प्र.

५५. 'सल' ल।) पाठांतर.

५६. 'पडावयास' शें. सा. प्र.

### ३८. अबदालीहि नजीबखानाचा भरंवसा सोडून खंदारास परत जातो

[त्यावेळीं] सुज्यातदौला यास आणून वजारत द्यावी, तंबूरशाहास तख्तीं बसवावें, हा मजकूर होता तो राहिला. आबदुल आलीनें चितांत विच्यार केला कीं, "हा नजीबखान मात्रागमनी. ज्याचें हातें[५७] वाढला त्याची गत या प्रकारची केली. याचे भरंवशेवर पुत्रास येथें ठेवणें उचित नाहीं." म्हणोन आंतरीं मजकूर आणून नजीबखान यांस समजाविलें कीं, "प्रस्तुत आम्ही खंदारास जातों. पेस्तर साली येऊन आवघा बंदोबस्त करितों, तोंपावेतों तुम्हीं दिलीचा किला राखावा.[५८]" म्हणोन नजीबखान यांस पांच हाजार फौजेनिसीं दिलीस ठेविला. पातशाहा आलमशाहा[५९] यास जिवें मारावें तें न करितां, जीवदान देऊन रक्षून, कूच करून, कुरुक्षेत्राकडून सरंदेत सैमदखान कतलबाज दाहा हजार फौजेनिसीं ठेविला आणि समागमें मलकाजमानी व तिची कन्या चंदाजमानी नेली. तैमूरशाहास वीस हजार फौजेनिसी लाहूरास ठेवून आबदुल आली खंदारास गेला. मागोन तैमूरशाहाहि गलिमाचे धास्तीमुळें निघोन आपले ठिकाणास गेला.[६०]

### ३९. रघुनाथराव बाबा, अंताजी माणकेश्वर व दत्ताजी शिंदे

हें वर्तमान रघुनाथराव दादा व मल्हारजी होळकर यांणीं ऐकोन दबत दबत धीरानें चालिले होते; ते मजल दर मजल चालिले व च्यमेली नदी उतरून आगरियानजीक आले. इकडे आंताजी माणकेश्वर यांणी दताजी सिंदे यास पत्रांवर पत्रें पाठविलीं[६१] की, "हिंदुस्थान हातचें गेलें. जलदीनें फौजबंदी करून येऊन पोहोंचावें." त्यावरून सिंदे यांणी नालबंदीचे दिवस नसतां वैशाखमासी चालीस हजार फौजेस नालबंदी दिल्ही. तयार होऊन जात्रें तों दिल्लीच्या वकिलाची पत्रें आली कीं, "दुराणी आपले फौजेसुद्धां आपले प्रांतांत गेला. राजश्री दादासाहेब यांची फौज च्यमेलीपार जाहली. तुम्ही तूर्त यावयाचें न करावें." म्हणोन पत्र येतांच च्यातुर्मास पर्जन्यकाल दम खाऊन राहिले.

### ४०. मल्हारराव होळकराचा नजीबखान 'धर्मपुत्र' होतो

इकडे दादासाहेब आगऱ्यानजीक येऊन सुरजमल जाट याजपासीं खंडणी घेऊन आगरियांत गाजुदीखान होता त्यास काढून आपणापासीं आणिलें. तेथून मजल दर मजल कूच करून गाजुदीखान यास घेऊन दिलीस पोचले. शहराचा विनाशकाल. ज्याणें यावें त्याणें आधी वस्त्रहरण करून मग पुढें काय करणें[६२] तें करावें. असा शहराचा सत्यानास करून किल्यास मोर्चे लाविल्ये. पंधरा दिवस नजीबखान किल्यां-

५७. 'येथे' सा. प्र.

५८. 'सांभाळावा' मं. प्र.

५९. 'आदमशाहा' असा चुकीचा पाठ कांहीं प्रतींत आहे.

६०. हें वाक्य १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं.

६१. 'पत्रांवर पत्रांचा सूर चेतविला' तुं प्र. (सेतु रचला)

६२. 'तें कर्तृत्व' सा. शें. प्र.

तून लढला; त्यास पुर्तपणें कललें कीं, "आतां गलीम कांहीं मजला सोडीत नाहीं आणि आबदुल आलीचीहि कुमक होत नाहीं. आतां आपला बच्याव करावा." म्हणोन अंतस्थ वकील मल्हारराव यांजकडे पाठविला; आणि जाबसाल केला कीं, "मी तुमचा धर्मपुत्र[63] आहे. माझा बच्याव करावा. शरण आलिया मरण चिंतूं नये. हें समर्थांस उचित होय." असे म्हणतांच मल्हारराव केवळ साभिमानी होता. त्यास ईर[64] पडली कीं, "नजीबखान यानी धर्मपुत्र म्हणविलें तेव्हा याचा बच्याव करावा." म्हणून मल्हारराव होळकर राजश्री दादासाहेब यांजकडे जाऊन बहूत प्रकारें भीड खर्चून, पदर पसरोन, नजीबखान यास बक्षीस मागितले. दादासाहेब याचे चितांत नजीबखान हा केवल मात्रागमनी, यास जिवें सोडूं नये; परंतु मल्हारराव याची भीड भारी, उलगडेनासी जाहली. तेव्हां मान्य करणें प्राप्त जाहाले. मल्हारराव याणीं नजीबखान यास किल्यांतून काढून आपणापासी आणून ठेविला. मागती आलमशाहास नजीबखान व आबदुल आली यांणी कैद करून ठेविला होता. त्यास तख्तीं बैसवून, वजिरी गाजदीखान यांस देऊन, शहराची गिर्दनबाजी अंताजी माणकेश्वर यांस सांगोन, पूर्ववतप्रमाणें बंदोबस्त करून, कुरुक्षेत्रास येऊन पोहोंचले.

**४१. रघुनाथरावदादा मल्हाररावासह अटकेपार जाऊन परत येतात**

तेथे तीर्थविधी यथा पद्धतीनें करून, काही तुळादानें करून, सरदेस जाऊन पोहोंचले. तों श्रीमंतांचा काळ उत्कर्ष. त्यायोगे सैमदखान कतलबाज याणें तोंड न दाखविता पलून[65] लाहूराकडे जात होता, तो [होळकर याजकडील[66]] पेंढारी यांणींच लुटून टाकिला. फौज मजल दर मजल शतद्रू व व्यासगंगा व चिनाब उतरून लाहूरास पावले. तेथील सुभा संदीपबेग होता. तो दुराणीनें मारून त्याची स्त्री व मुलें कैदेत ठेविलीं होती. तैमूरशाहा लाहूर सोडून खंदारास गेला [ होता ]. त्याचीहि फौज थोडी बहूत लुटली. लाहूरचा सुभा, संदीपबेग याचा पुत्र कैदेंत होता त्यास पांच हाजार फौजेनिसी चाकरीस ठेवून त्याचा दिवाण लक्ष्मी-नारायण म्हणोन जातीचा कायस्थ होता, बरा कर्ता मनुष्य होता, त्याचे स्वाधीन करून पंजाब व मुलतान सुधा आटकेपर्यंत मुलूख काबीज करून ढाला माघाऱ्या केल्या. लुटीनें पेंढारी व लष्कर कुबेर जाहालें. रघुनाथराव व मल्हारराव होलकर यांणी मोठें यश संपादिलें. ते सालीं तिकडेसच (कुरुक्षेत्राकडे) छावणीस राहिले..

**४२. शिंदे यांचें निजामाशीं यशस्वी युद्ध—औरंगाबाद**

तों देसी नानासाहेब व नबाब निज़ामअलीखान यांचा कांही बिघाड जाहाला.[67] ते समई नानासाहेब यांणीं जनकोजी सिंदे व दत्ताजी सिंदे यांस नेऊन सांगितलें कीं "तुम्ही हिंदुस्थानांत पराक्रम बहुत केले. मारवाडियासारिखे राठोड यांजपासून

---

६३. 'धाकटा' भाइसं. प्र. धर्मपुत्र.

६४. 'वीरश्री' क. प.

६५. 'गाशा गुंडाळून' क. प.

६६. कंसांतील शब्द १८७९, १८८६ व भाइसं. प्र. त नाहीत.

६७. "नानासाहेब यांची स्वारी पैठणास लग्नाकरितां गेलेली होती" असें क. प्र. त अधिक वाक्य आहे.

सकल राज्य सोडविलें[६८] तें आम्हीं कानीं मात्र ऐकून त्रप्त जाहालों; परंतु आपलें द्रिष्टीनें पाहिलें नाहीं. प्रस्तुत मोगलांचा व आमचा बिघाड जाहाला आहे. आमची फौज बहुतकरून दादासाहेब यांजसमागमें हिंदुस्थानांत गेली. तुम्हीं फौज आबदुल आलीचे आवईवर ठेविली आहे. प्रस्तुत आम्ही तुमचे जिवावरी बिनघोरी आहों. साल मजकुराची मसलत तुमचे जिवावरी आहे." असें म्हणतांच सिंदे मर्द व च्यार माकूल[६९] मनुष्य पदरीं, यांणी मान्य करून [जलदीनें सांडणीस्वार पाठवून फौज आणविली[७०]] फौजसुधां नवाब औरंगाबाजेसच गाठिला[७१] नबाबाजवळ फौज आगदीं मराठे व्यकटराव निंबालकर व गोपालसिग राजा खंदारकर व इभ्रामखान गारदी; येक जाधवराव[७२] निराला करून करोल तीस हजार फौज होती. तिजवर चाल करून सिंदे गेले आणि भोंवताले गलीम उभे[७३] राहिले; परंतु मोंगल बाहेर येईना. त्यास मराठे निंबालकर वगैरे याचा फितुरीचा संशय जाहला होता. तों मराठेयांस ईरे पडली की "आमचा आभाव नबाबास पडला आहे, हें उत्तम नव्हे. युद्ध करावें." म्हणोन तमाम फौज सिध होऊन शहरानजीक [बाहेर बागांत[७४]] उभे राहिले. तों दत्ताजी सिंदे व नानासाहेब याचा पुत्र खासा विश्वासराव यांणी फौज सिध करून चालून आले. नबाब निजामअली तयार होऊन या फोजेस न मिलतां दूरून तमाशा पाहात उभा राहिला. यांणी तीन टोळ्या करून तिहींकडून[७५] उठले. जानराव निंबालकर याजवर दताजी सिंदे व व्यंकटराव निबालकर यांजवर जनकोजी सिदे व वरकड उमराव यांजवर विश्वासराव, ऐसी फौज उठली. व्यंकटराव याची बहीण जनकोजी सिंदे यांस दिल्ली होती. सोइरे जाहाले तरी येकमेकांचे येथें जेवणास जावेंयावें; परंतु क्षत्रिय धर्मांत अंतर करितां येत नाहीं. म्हणोन मराठियांचे गोड हत्यारीची तरवारींची येक घटका खणाखणी, मारामारी जाहाली. तों व्यकटराव याचे मेहुणे आणि इकडे जनकोजी सिदे यांचे साडू नागोजी माने म्हसवडकर, यांणीं आवघे फौजेंतून उठून जनकोजी सिंदे यांसच गाठ घातली, परंतु सिंदे यांजपासी करोलीचे सामान[७६] भारी. करोलाकडून मार देवविला. त्यांत नागोजी माने यांस गोळी लागून ठार पडले. गैबतच मारा जाहाला.[७७] ईश्वरें चितांतील हिंमत पुरती केली नाही.[७८] आस्तु. इहलोकी कीर्ति करून परलोकीं साधन केलें. नागोजी माने

---

६८. "मारवाड राठोडे म्हणजे बहुत पराक्रमी, लढाईंत पडोन सिरछेद जाहला तरी त्याचें कबंध रणांत नाचतें; त्यांसारिख्यांस देखील तुम्ही जेर करून आपली छाप त्यांजवर ठेवून त्यांजवळून राज्य हरण करून घेतलें." असा क. प्र. चा पाठ.

६९. 'काबील' सा. प्र.

७०. कंसांतील मजकूर १८७९ व १८८६ प्रतींत नाहीं.

७१. 'गांठावा' भाइसं प्रत.

७२. 'माधवराव' भाइसं प्रत.

७३. 'गुप्तरूपें राहिलें.' भाइस. प्रत.

७४. हे शब्द १८८६ भाइसं. प्रतींत नाहीं.

७५. 'तीन फौजा करून तिन्हीकडून तिघे उठले' सा. प्र.

७६. 'बल'सगजो.

७७. 'गैबीचा' सा. प्र.

७८. 'पुरों दिल्ली नाहीं.' सा. प्र.

यांचा मुडदा काढून नेला. याजवर सायंकाळहि जाहाला. व्यंकटराव यांस मेहुणे यांचें परम दुःख जाहालें. मुलें-माणसेंहि समागमें होतीं. मायाजाळें सर्वत्रांस परम दुख जाहालें. त्यांचे देहाचें सार्थक केलें. नबाब बंदेगा आली डेरियास येऊन त्यांचें मूल दत्ताजी माने यांचें समाधान केलें. ते वेळीं नबाब यांचे चित्तांतील विकल्प निघाला.[७९]

## ४३. दत्ताजी शिंदे सिंदखेड येथें निजामाचा पुरा पराभव करून तह करतात

तों राजश्री रामचंद्र जाधवराव पांच हजार फौजेनिसी नबाबास मिळावयास ताबडतोब येत असतां तें वर्तमान दत्ताजी शिंदे यांस कलतांच त्यांणी त्याजवर दहा हजार फौज रवाना केली. फौजेची गांठ पडावी तों रामचद्र जाधवराव हे सिंदखेडचा आश्रय करून सिंदखेडांत राहिले. फौजेचे व त्यांचे युद्धप्रसंग नित्य होतच होते. दिवसेदिवस जाधवराव पाण्याचे[८०] तसदीनें जेरीस येत चालिले[८१] हें वर्तमान [*निजाम आली] यांणी ऐकून भोवताला तोफांचा आराबा देऊन गोल बांधून बाहेर निघाले. बहूत मोंगल होऊन गेले; परंतु याजसारिखा काबिल कोणीच जाहाला नाही. तों राजश्री नानासाहेब याचेकडून फौजा गोपालराव व रास्ते व पोवार व आणखी फौजा येऊन सिंदे यांसी सामील जाले. मध्ये मोंगल व भोंत्रताले गलीम वेढून हां हूं करीत दोन कोस[८२] झुंजत भांडत मजली करून सिंदखेडास दाखल जाहाले. तों खासे नाना व भाऊहि येऊन पोहोंचले. ते दिवसी दताजी सिंदे इरेस पडून आपण उडी टाकूण[८३] करोल व तोफा व जेजाला व सुतरनाला व हस्तनाला आसे ढासणें धरून मार दिल्हा. तों मोगलांचे फौजेचा गोल. याजमुलें घोडीं, मनुष्यें पलूं लागलीं. ते समईं दुतर्फा यंत्रांचा कडाखा ऐसा जाहाला कीं, 'न भूतो न भविष्यति.' भडभुजे लाह्या भाजतात तैसी गत जाहाली. धुराचे गर्दीत कोणी कोणास दिसेनासे जाहालें. दताजी सिंदे केवळ[८४] डुक्कर खळीस येतो तैसे इरेस पडून मारामार केली. तों नबाब* केवळ हातघाईस आला. भाऊसाहेब याचे नेत्र संतोष जाहाले. तारीफ केली कीं, 'दताजी सिंदे यांचे मर्दुमकीची शर्थ आहे![८५] जसें ऐकण्यांत आले तसें कर्तव्य करून दाखविलें.' आसें बोलून मोठें संकटें दताजी सिंदे यांस उखळोन काढिले. सेंदोनसें खांसे ठार पडले. नबाबासहि आसें जाहालें को, "गलिमाशी झुजें बहुत केलीं; परंतु याप्रमाणें निधडा सरदार मराठियांत नाहीं" म्हणोन त्यानेहि स्तुति करून आपले जागा मुकाम करून राहिले. मानकरी लोकांचें समाधान करून नांवाजिलें.

---

७९. कागदपत्रावरून बखरीतील व्यंकटराव हें नांव चूक असून त्याऐवजीं हणमंतराव असें पाहिजे. तो कोणत्या निंबाळकरांपैकी?

८०. 'पोटाचे' तुं. प्र.

८१. 'जेरीस आलों' सा. प्र.

८२. 'मास' सगजो.

८३. 'उठून' १८८६ व १८७९ प्र. नाहीं.

८४. 'जसा' सा. प्र.

*या वेळीं सलाबतजंग निजाम होता.

८५. दत्ताजीचा पराक्रम पेद. १,१.

पुढें सल्याचें सूत्र आरंभिलें. तेव्हां आठ[८६] दिवसांत मोंगलांचा व गलिमांचा सला साखरखेडलियाचे मुकामीं जाहाला.[८७]

## ४४. जनकोजी सिंदे व हरिगड येथील गुजालसिंग गिराशा

नंतर श्रीमंतांनीं राजश्री जनकोजी सिंदे यास हिंदुस्थानचे मोहिमेस आज्ञा दिल्ही. दताजी सिंदे खासा चांभारगोंदियास लग्नाकरिता गेले. श्रीमंत निघोन पुणियास गेले. जनकोजी सिंदे च्याळीस हजार फौजेनिसीं मजल दर मजल हिंदुस्थानांत चालिले. जनकोजी सिंदे याची उमर ती लहान. परंतु पराक्रमास[८८] केवल वृधाप्रमाणें; स्वधर्मशील, भक्त-परायण, क्षेत्रीयासी औदार्य, सहनशील[८९] [होते. ते] नर्मदापार होऊन उज्यनीम दाखल जाहाले. तेथून पुढें बुदीस गेले. तों त्या राज्यांत तेथें हरिगड[९०] म्हणोन होता. तेथें गुजालसिग[९१] म्हणोन गिराशा होता. त्याणें संपूर्ण मालवियांत धशत लाऊन गुप्तरूपें खंडण्या घेत होता. त्या गडास एकाएकींच जाऊन पोहोंचले तो गड उगाच माळासारिखा होता; परतु भोंवताली झाडी[९२] बहुत व चढण भारी होती. तो कांहीं गांवांत सापडला नाही. दोन अडीचसें लोक[९३] व बायका होत्या. तेव्हां जातीचे गिराशी, त्यांणीं रात्री मध्यें बायका व भोवताली गिराशे घालून जरीपटक्याचे निशाणावर चालोन घेतलें. मारामार करीतच मोर्चियातून पार पडून गेले. तेथें बाळोजी सिंदा म्हणोन पालक लेक होता. नामी सरदार जाहाला होता. त्यास गोली लागोन ठार जाह्ला. त्यासमागमें त्याचे स्त्रीनें सहगमन केलें.[९४]

## ४५. जनकोजी सिंदे यांचें जयनगर व मारवाड प्रांतींचें यशस्वी कार्य

तेथून पुढे खेचीवाडा व राजगड व पाटणा व बुंदी, कोट यांच्या खंडण्या घेऊन जयेनगरचे प्रांतांत गेले. तेथें माधवसिग राजा याणें च्यार दिवस हिंमत धरली होती. त्यास झुजावयास पुरवेना. आसे जाणोन वीस लक्ष रुपये खंडणी घेऊन तेथून पुढें मारवाड प्राती जावें तों उदेपूरकर राणा यांजकडील सिवसिग सिसवदे येऊन जाबसाल केला की, "शिवपुरियाचा राजा आमचा चाकर आसतां त्याणें घोंटाळा केला. किले, गढिया बळकाऊन आम्हांसी बेबदल[९५] होऊन आपले प्रातात धामधूम करितो. येविसी सांप्रतकालीं च्यातुर्मास बरसातकालचे दिवस आहेत.[९६] शिवपूरनजीक छावणी करावी. वीस लक्ष रुपये तुम्हास देतों. सिवपूर व गढी हस्तगत

---

८६. 'आठपंधरा' सगजो.

८७. या परिच्छेदांतील सर्व मजकूर पु. क. सां. भाइसं मं. प्रतीत नाहीं. सा. सगजो तुं. वगैरे प्रतीत आहे.

८८. 'कर्तव्यास' भाइसं प्र.

८९. 'पोक्त बुद्धि आणि गंभीरता, स्वामीसेवेसी अति तत्पर, त्यांचे उपमेस कोणीच नाही' असा जास्त मजकूर क. प्र. त आहे.

९०. 'हरगड' सा. शें. प्रत.

९१. 'खुशालसिंग' भाइसं.; 'गुमानसिंग' सा. प्र.

९२. 'झाडीची डांग' सा. प्र.

९३. सामान भा. सं.

९४. 'सयागमन घेतले' सगजो.

९५. 'बदल' सा. प्र.; 'बेमान' सा. क. प्रत.

९६. 'राहावी' भाइसं. प्र.

करून द्यावी." तेव्हां जनकोजी सिंदे यांणीं मनसुबा केला कीं, "दताजी सिंदे गांवास स्वदेसीं गेले आहेत. ते येईपावेतों च्यातुर्मास उगाच येकादे ठिकाणीं राहावें, त्यास हें उत्तम आहे. 'येक पंथ दो काज' आसें घ्यानांत आणोन मान्य केलें. खांसा आपण सिवपुरास मोर्चे लाऊन[97] राहिले. राणोजी भोइटे, सरनोबत बरे कर्ते मनुष्य होते; त्यांणीं फौज़ेनिसी ढेकळचाचे[98] गढीस मोर्चे लाविले होते. तों येकायेकीं मोर्च्यांत राणोजी भोइटे यांस गोली लागून ठार जहाले. हें वर्तमान जनकोजी सिंदे यांणीं ऐकोन बहूत कष्टी जहाले तों त्या स्थली दीपवालीहि जाली, सिवापुरचे राजास हस्तगत करून उदेपूरकर राणे व त्याचें ऐक्य करून दिल्हें. राणाजीचे आज्ञेंत शेवावृत्तीनें राहावें. याप्रमाणें करून आपले कराराप्रमाणें ऐवज घेतला.

**४६. रघुनाथरावाचा जनकोजीशीं नजीबखानाच्या पारिपत्याविषयीं आग्रह**

तों लाहूराकडून रघुनाथराव दादा मसलत[99] फते करून देशास जात असतां मार्गीं जनकोजी सिदे यांस भेटावयास आले.[100] दादासाहेबहि दोन कोश मुकामापासून आडवे आले. उभयतांच्या भेटी जाहल्या. नंतर जनकोजी सिंदे यांचे डेरियास येऊन येकांती जनकोजी सिंदे यांस मसलत[101] दिल्ही की, "आंवदांची मसलत बुडाली तरी पुर्वेल. क्रोड रुपये सिबंदी वाढली तरी चिंता नाहीं, (ती) देऊं, परंतु नजीबखान रोहिला याचें पारिपत्य करून त्यास जिवें न सोडावें. येवढी आम्हांस जोड द्यावी. आम्हीच त्याचें पारिपत्य केलें असतें;[102] परंतु मल्हारराव यासी आगत्य त्याचें पडलें. त्यांचा 'धर्मपुत्र' म्हणोन त्याणी आगत्य धरून आपले तर्फेनें आंतरवेद प्रांत व कुरुक्षेत्रपासून कुंजपूर देखील चालीस लक्षांची मामलत त्याचे स्वाधीन केली. यास मल्हारराव यांसी माधवसिंग जयनगरकर व बिजेसिग मारवाडी व आणखी बहूत [पुत्र] आहेत. त्यांत हा नजीबखान रोहिलाहि पुत्र जाहाला आहे! जितके यांणी पुत्र म्हणविले त्यांचा फलादेशहि भोगीतच आले. परंतु त्यांचा अभिमान जाईना. त्यांचे जितके 'धर्मपुत्र' आहेत तितके मात्रागमनी आहेत.[103] आम्हीं त्यांस 'पिसालल्या कुतरियाची' गत केली आसती. परंतु 'तुपाचे घागरीवर उंद्राचें पिटकुलें बसतें' तैसा प्रकार जाहाला आहे. आतां तुम्हास पदर

---

९७. 'मोर्चे लावून शह देऊन' सा. प्र.

९८. 'सडकोळधाचे शाहास' क. प्र.; 'सडकोळचाचे गढीस' भाइसं. प्र. 'टेकाळे' १८७९, १८८६ प्र.

९९. 'स्वारी' क. प्र.

१००. 'गेले' सा. प्र.

१०१. 'मनसबा' सा. प्र.

१०२. यापुढें क. प्र. जादा मजकूर आहे तो; 'परंतु मल्हारराव यांस तो शरण आला. याजमुळें त्यास अभिमान पडोन त्याचा त्याणी आगीकार केला. आम्हांजवळ सक्त भीड खर्चून बक्षीस मागून घेतला. आमचा त्यांचे भिडेपुढें उपाय नाहीसा जाहला. त्यांस तो दुष्ट नफर आहे. मातृस्थानी लघुशंका करणारा असा मनुष्य आहे. आमची बालंबाल खातरी जाहाली आहे." हा मजकूर भाइसं. सगजो. मंडळ प्रतींत नाहीं.

१०३. 'सर्पास दूध पाजीत असलें तरी त्याचा दुष्ट स्वभाव जाणार नाही.' असें सां. प्र. मध्यें जास्त वाक्य.

पसरोन जोड येवढीच मागतों." आसें म्हणतांच जनकोजी सिंदे तसलीम करून आर्ज केला कीं, "दादासाहेब बारगिरास आज्ञा कराल त्याप्रमाणें वर्तणूक होईल. नजीबखान म्हणजे कोण जिनस ? त्याचें पारिपत्य आम्हांकडे लागलें. पण आपण लाहूर, मुलतान, पंजाब देखील आटकेपावेतों मुलुख काबीज केला. आतां आम्हांस मोहिमेस रान कोणतें ?" आसें म्हणतांच दादासाहेब यांणीं उत्तर मागुती केलें कीं, "नजीबखान याचा सिरछेद केल्यास आम्हास तुमची सर्व जोड पावली." याप्रकारें तीन वेलां जाहालें. मग परस्परें बहुमान हती, घोडे, जडजवाहीर देऊन रघुनाथराव देशास आले.

**४७. जनकोजी मल्हाररावांची भेट घेण्याचें टाळतात**

तों आठपंधरा दिवसां मागाहून [त्याच मार्गानें जनकोजी सिदे] आले. त्यांस बारा कोशांचें आतर होतें. [सिंदे होळकर यांची चित्तशुद्धता नवती.][१०४] तेव्हां मल्हारराव यांणीं गंगाधरराव तात्यांस बोलाऊन आणून विच्यारिलें कीं, "सिंदे यांची जन्माची सांगड होती, तोंपावेतों श्रीमंतांसहि[१०५] आमचा वचक होता; व कितेक कामेंकाजें केवल आसाध्य ती साध्य केली; आतां आमचें येक मूल आहे, तेंहि पिशाचवत आहे. आणि आमचें वार्धिक्यपण जाहालें. त्यापेक्षां हर यत्न करून जनकोजी सिंदे यांस भेटून त्यांचे चितांतील किलमिष काढून त्यांचे हाती आपलें मूल द्यावें." आसें बोलून गंगोबा तात्यांस जनकोजी सिंदे यांजकडे पाठविलें. गंगोबा तात्या भेटून सविस्तर वर्तमान ममतापुरस्कर केवल आजीद होऊन जाबसाल केला कीं, "सुभेदार यांचें म्हातारपण आणि तुम्हीहि सुज्ञ मनुष्य आहां. सुभेदार भेटावयास येतात तुम्ही आव्हेर न करावा." म्हणोन बोलतांच जनकोजी सिदे यांस तिरस्कार[१०६] आला' आणि उतर केलें कीं, "त्यांची आमची पुन्हा भेट आतां स्वर्गी. अजूनहि तुम्हांस जितके करावयाचे उचित दिसेल तितकें करावें." तों गंगोबा तात्या केवल चागलाच गळा पडला. तेव्हां जनकोजी सिदे यांणी जाबसालाची तोड केली कीं, "प्रस्तुत दताजी सिंदे प्रसंगी नाहीत. त्याच्या विचाराशिवाय आपणास भेटावयास पुरवत नाही." असें बोलून गंगाधरपंत यांस वाटेस लाविलें.

**४८. मल्हाररावाचा जनकोजीस स्वामिद्रोही सल्ला**

मल्हारराव यांणीं वर्तमान ऐकोन आधिक उणा जाबसाल ध्यानांत न आणितां, "मूल आहेत" म्हणोन कूच करून सिदे यांचें लस्करानजीक दोन कोशांवर मुकाम केला. मान, महत्त्व ध्यानांत न आणितां मल्हारराव तयार होऊन जनकोजी सिंदे यांचे डेरियास चालिले. हें वर्तमान जनकोजी सिंदे यांणीं ऐकोन निश्चय केला कीं "आतां आडवे जावें हें उत्तम.[१०७] नाहींतरी आश्लाघ्यता येईल." म्हणोन जनकोजी सिंदे तयार होऊन आडवें भेटले [त्यांस डेऱ्यास आणोन सत्कार केला]. नंतर आठ-

---

१०४. कंसांतील मजकूर १८७९, १८८६, भाइसं. मंडळ वगैरे प्रतींत नाहीं; सा. प्र. मध्यें आहे.

१०५. 'ब्राह्मणासहि' पाठभेद

१०६. 'रोष' क. प्र.

१०७. 'उचित' सा. प्र.

पंधरा दिवस मल्हारराव यांणीं तेथें रात्रं-दिवस राहून त्यांचे चितांतील विकल्प[१०८] काढून मनाचा मळ तोडिला. मुलास हातीं देऊन देशास जावयास निरोप मागितला. ते समईं जनकोजी सिदे यांणी आर्ज केला कीं, "सुभेदार तुम्हीं आम्हांस वडील आहा. तुम्हीं अटकेपावेतों मुलूख काबीज केला. आतां आम्हांस मोहिमेस रान आसुदें कोणतें?" तेव्हां मल्हारराव यांणीं उत्तर केलें कीं, "तुम्हांस रान येक आहे. भागीरथीस पूल बांधोन आयोध्येस जावें. सुज्यातदौला यासी तंबी पोचऊन पाहिजे तितके रुपये मिळतील. रान आसुदें आहे. जनकोजी सिंदे यांणीं उत्तर केलें कीं, "भागीरथीस पूल बांधणें कसें घडेल?" तेव्हा मल्हारराव यांणी सांगितलें कीं, "नजीबखान रोहिला यास हातीं धरून त्याचे हातून हें कार्य करून घ्यावें." हें वचन ऐकतांच जनकोजी सिंदे यांणीं जाबसाल केला की, "नजीबखान रोहिला मात्रागमनी आहे. जलमस्थानी मैथून[१०९] करणार. गाजुदीखान याचे घरीं वाढला त्याचें सार्थक केलें! हें तुम्ही जाणतच आहां. त्यांत कार्यातुर होऊन कालावर नजर द्यावी तरी खावंदाचे द्रोही व्हावें. त्यांणीं आम्हांस मोहीम नजीबखान याजवरच नेमून दिल्ही आहे. आसें असता हें कर्म केलियास श्रेष्ठ[११०] स्वामीद्रोही व्हावें. त्यात आम्हांकडे केवल सिलेदारी कर्म नाही. आम्ही सरकारचे पागेचे बारगीर. आम्हांकडून हा विचार घडूं नये. आसें बोलतांच मल्हारराव यांणीं उतर केलें कीं, "बाबा तुमचा मूलस्वभाव.[१११] आटकेपासून रामेश्वरपर्यंत येकछत्री राज्य जाहालें. हिंदुस्थानांत एक नजीबखान मात्र खणू[११२] राहिला आहे. त्याचें पारिपत्य केलिया पेशवे आटकेपासून जासुदाचे हातें पैसा आणविर्तील. मग तुम्ही आम्ही सहजच निर्माल्यवत जाहालों. मग कोणी पुसणार नाहीं. यास्तव येवढे खणू रक्षून जें कर्णें तें करावें." याप्रमाणें सांगोन मल्हारराव होळकर यांणीं आपला पालक पुत्र तुकोजी होळकर दोन हजार फौजेनिसी [सिंदे याजपासी] ठेवून निरोप घेऊन देशास चालिले.[११३]

**४९. दत्ताजीसहि मल्हाररावाचा तोच निमकहरामी मंत्र**

तों [इकडे] दताजी सिंदे गांवीं होते, त्यांणी लग्न[११४] करून समागमें नारो शंकर च्यार हजार फौजेनिसीं घेऊन जनकोजी सिदे यांजकडे चालिले. तों वाटेंत राजश्री दादासाहेब यांची भेट जाहाली. बहूत प्रकारें गौरव करून, जनकोजी सिंदे यास नजीबखान याजविसी सागितले होते तसेच पदर पसरून यांसहि सांगितलें. दत्ताजी सिंदे यांणीं मान्य करून दादासाहेब पुण्यास पोहोंचलें. दताजी सिंदे

---

१०८. 'किलाफ' सा. शें. प्र. 'किलमिष' दूर करून चित्तशुद्धता करून घेऊन येखलाशी जाहाल्यानंतर त्यांचे हाती' असा क. प्र. अधिक मजकूर.

१०९. 'लघुशंका' सा. प्र.

११०. 'भ्रष्ट'? 'स्पष्ट' असें पाठांतर.

१११. 'बाबा, तुमचा स्वभाव फार चांगला, एकनिष्ठ आहां 'सां. प्र. 'कुलस्वभाव' भा. इ. सं. प्र.?

११२. 'खूळ' सा. प्र.; 'खली' पु. प्र. 'खाडू' सां. प्र.

११३. 'निघाले' शें. प्र.

११४. दुसरें लग्न सां. व क. प्र. या वेळी दत्ताजी आपल्या मुलीच्या लग्नासाठीं श्रीगोंद्यास गेला होता (का. ३, १८४)

उज्यनीस आले तों मल्हारराव उज्यनीस गेले. जनकोजी सिंदे यांचें व मल्हारराव यांचें ऐक्य जाहालें. हें दताजी सिंदे यांस पूर्वी सूचना होतीच. मग दताजी सिंदे आडवे जाऊन बहूत सन्मान करून उज्यनीस घेऊन गेले. दोनच्यार रोज राहून उपच्यार मेजवान्या जाहाल्या. उपरातिक दताजी सिंदे याणीं मल्हारराव यास प्रश्न केला कीं, सुभेदार तुम्ही आटकेपावेतों मुलूख काबीज केला. आतां आम्हांस मोहिमेस आसुदें रान[११५] कोणतें आहे ?" तेव्हा मल्हारराव याणी सांगितलें कीं, येविसीं सूचना जनकोजी सिंदे यांस सांगितली आहे आणि तुम्हांसहि सांगतों की, नजीबखान रोहिला यास हातीं धरून भागीरथीस पूल बांधोन पलीकडील आयोध्या व डाका बंगाला व माहूर[११६] देशपावेतों मोहीम करावी. रानहि आसुदें आहे व पैसाहि पाहिजे तितका मिळेल आणि सुज्यातदौला यास तंबी[११७] पोहचऊन भागीरथी पलीकडील अर्धा मुलूख घ्यावा, त्यांत दहा पाच किले भारी असतील, त्यांत ठाणीं घालावीं, म्हणजे चितास येईल तेव्हां श्वेतबंधासारखें जावयास—यावयास येईल. हें न करितां तुम्ही नजीबखान यांचें परिपत्य कराल तरी तुम्हांस पेशवे धोत्रे बडवावयास लावतील.[११८] आसें स्पष्ट सांगितलें. तेव्हा दताजी सिंदे यांचे घ्यानांत गोष्ट ठसली. खांवंदांनी सांगितलें तें मिथ्या [असा] भास जाहला; मल्हारराव यांणी सागितलें हेंच पुर्तेपणें खरें प्रत्ययास आलें आसे जाहालें. लोभियाचे घ्यानांत धन बसतें तैसें जाहाले. मल्हारराव यांणी मंत्र सागोन देशास आले. तसेच मागून विठ्ठलराव सिवदेव देशास जात होते. त्यांनी हीच गोष्ट सांगितली. आग्नीवर आज्य टाकावे तसेच पुर्तेपणें ठसलें. जनकोजी सिंदे यांचे चितांत मल्हारराव यांचा मनसोबा ठसला[११९] नाहीं. सुभेदार याचें ऐकावें तरी निमकहरामी पदरास येते. आणि धनियाची इतराजी होईल. खावंदाची आज्ञा ज्याप्रमाणें त्याप्रमाणें जनकोजी सिदे यांची वृत्ती जहाली होती. इकडे दत्ताजी सिंदे यांणी [ मल्हारराव होळकर बोलले[१२०] तो ] मजकूर प्राधान्य केला.

---

११५. 'जागा' भाइस प्र.

११६. काऊर किंवा काहूर; सा. प्र. हा प्रांत कौरकुरा असावा असें प्रा. पोतदार सुचवितात.

११७. 'जरब देऊन' क. प्र.

११८. या विधानाला अजून पक्का आधार नाही. दत्ताजीनें तो मानला असेंहि पुढील इतिहास सांगत नाही.

११९. 'ठरला' भाइसं प्र.

१२०. कंसांतील मजकूर १८७९, १८८६ प्रतींत व भाइसं. मध्यें नाहीं.

## प्रकरण पांचवें

# प्याद्यानें क्रोड रुपयांचे आशेस गोविलें!

### ५०. दताजी सिंदे व गाजुदीखान वजीर यांत तोफा-निमित्तानें गोळागोळी

जनकोजी सिंदे यांणी मारवाड प्रांतींचा बंदोबस्त करून दिलीकडे चालिले. रेवाडीवर जाऊन पोहोंचले. तों दताजी सिंदेहि तेथें जाऊन मिळाले. चुलत्या-पुतण्याच्या भेटी जाहाल्या. यांस त्या रानात भय कोणाचें नवतें. यास्तव दताजी सिंदे यांणीं आपली स्त्री भागीरथीबाई व जनकोजी सिंदे यांची स्त्री कासीबाई यांस बरोबर घेऊन आले. तेथून कूच करून दिलीस पोहोंचले. दिलीपार लाहूर दरवाजाकडे मजमूच्या[१] टिलियावर यमुनातीरी मुक्काम करून राहिले. गाजुदीखान वजीर याची भेट जाहाली. जनकोजी सिंदे याचा मानस की, "वजिरास समागमें घेऊन नजीबखान याचें पारपत्य करावें." गाजुदीखान याचे चितांतील भावार्थ हाच होता. बाह्यार्थ, दताजी सिंदे, वजीर यांसी नजीबखान याचे पारिपत्याचें बोलत. परंतु चितांत तो अर्थ नाहीं.[२] निदान गाजुदीखान यांणी पंधरा लक्ष रुपये कबूल केले. आपणहि समागमें यावयास सिद्ध जाहाले. याप्रमाणें वजिरासी निश्चय जाहाला. तों दताजी सिंदे यांणीं विच्यार केला की, "हरयेकविसीं कवाईत करून हा मजकूर राहाता करावा." म्हणोन वजिराकडील वकील यास आज्ञा केली कीं, "पातशाई रिसाले-यांतील दोन तोफा पूर्वीं आकबरशा पातशहाचे जिलबीस चालत होत्या, त्याप्रमाणें येक 'आटक' व येक 'फतेलस्कर' व आणखी एक 'किलेकुशाद' ऐशा तीन तोफा देणें." वर्कंड जिकडील तिकडे गेल्या होत्या. परतु भारी म्हणावयासी तीन तोफा मात्र राहिल्या. पंचरस सुवर्णासारिख्या तेजस्वी, चौदा हात लांबी व पेटीस रुंदी सात हात लागत होती. तोंडीं च्यार हात दोरी[३] लागत होती. याप्रमाणें आणखी येक मातबर नव लक्षांची होती. आशा तोफा मागतांच गाजुदीखान वजीर यास परम विषाद आला आणि प्राण गेला तरी पुरवेल, परंतु 'तोफा द्यावयास आनकूल पडत नाहीं.' म्हणोन उतर होतांच दताजी सिंदे याणी फौज सिद्ध करून पातशाही रिसालियाकडे[४] चालोन गेले. तो गाजुदीखान यांजकडील सामान चालोन आले. तेव्हां थोडीबहूत गोलागोली जाहाली. तों वजिराचें सामान थोडकें, लयास गेलें. त्यास यांची उपट सोसेनासी जाहाली.[५] मग सामान सरून ठिकाणास माघारे गेले. तें

---

१. 'मनूच्या टिल्यावर' भाइसं. प्र.

२. यापुढें सां. प्रतीतील मजकूर असा "गाजुदीखान वजीर याचे मनांत नजीबखान याचे पारिपत्याकरितां सिंदे यासी जो लागेल तो पैसा मी पुरवीन, परंतु या नफराचें पारपत्य करावें. तूर्त पंधरा लक्ष ...वगैरे."

३. "सात हात वर्तुळ व तोंडास चार हात वर्तुळ" सां. प्र.

४. 'जाऊन पाहिलें'. पाठभेद.

५. ही लढाई इ. स. १७५९ ता. १९ जानेवारीस झाली असें सरकार म्हणतात. (फॉल २, पृ. २०१).

गर्दीत दिलीचा पुरा जयसिंगपुरा म्हणोन होता, त्याचा सत्यानाश जाहाला. शहर लुटलें. एवंच शहराचा विनाशकाल ! आसो.

**५१. तोफांची उज्जनीस पाठवणी, दताजी कुंजपुरा येथें व सैन्य काश्मीर अटकपर्यंत**

सिंदे यांणीं दोन तोफा 'अटक' व 'किलेकुशाद' आशा दोन तोफा काढिल्या.[६] आटकेची जोडकरीण 'फतेलस्कर' तोफ होती, तेवढी मात्र सिलिमगडचे किल्यांत राहिली. आटक तोफेस[७] साडेतीनसें बैलांच्या तीन माला वोढावयास लाविल्या, दोन हती लाविले; परंतु तोफ जागेवरून हालेना. तेव्हां येक मनुष्य शहरांतून धरून आणून तोफेवर जेब केलें. बकरी व कोंबडी व नारळ व लिंबे यांसी गणती नाहीं. मोठे संकटें तोफ लस्करांत आणिली. उज्यनीस तोफ लस्करात लाऊन द्यावयाची विवंचना केली, तों निभावणीचें संकट. सिंदे यांचें मानस होता की, "येक वेल आणखी नागुरास बिजेसिंग याजवर जाऊन तोफ लावावी." आसी उमेद[७] बहूतकरून होती. तों तोफेची निभावणीची बुधी कुंठित जाहाली. तेव्हां जाटाकडील रूपराम कटारी समागमे होता, त्याणें आपले खंडणीपैकी दोन लक्ष रुपये सूट मागितली आणि तोफ उज्जनीस पोंचती करावी, असा करारमदार करून तोफ त्याचे जिमेस[८] केली. त्याणें इजारा करून तोफ वाटेस लाविली. तों शेवट उज्यनीस पावली नाही. त्याचा पुढें विनाशकाळ आला, तेव्हां तोफ चमेलीच्या खलियात[९] येऊन आचेरीच्या[१०] घांटाखालीं राहिली. 'किलेकुशाद' तोफ समागमें घेतली. गाझुदीखान वझीर याचे चितांत किलाप आल्यामुळें वझीर दिलींतच राहिला. दताजी सिंदे याणी कूच केलें. ते मजल दर मजल पाणिपतावरून कुरुक्षेत्रास गेले. तेथें आठ मुकाम करून, च्यार तुलादाने करून, पुढें मजल दरमजल शतद्रु नदीपावेतों गेले. तों लाहूरांतील सुभा सदीपबेग याचा पुत्र व लक्ष्मी नारायण, त्याचा दिवाण, आसे येऊन भेटले. त्यांचे याचे विचारें साबाजी सिंदे व त्रिंबक बापूजी आसे पंधरा हजार फौजेनिसी पुढें लाहूर, मुलतान व पंजाब व कास्मीर आटकेपर्यंत मुलूख जप्तीस पाठविले. आपण खांमा तेथून कूच करून कुंजपुरानजीक मुकाम केला. चितांत योजना केली की, "नजीबखान यास हस्तगत[११] करून त्याचे हातून भागीरथीस पूल बांधून महत्कार्य करावें." जनकोजी सिंदे व नारो शंकर व आंताजी माणकेश्वर यांचे चितांत की, "श्रीमंतानी आज्ञा केली त्याप्रमाणें वर्तावें. नजीबखान याचें पारपत्य करावें, ठेवू नये," हें सर्वत्रांचें आनुमतें होतें.[१२]

---

६. अटक तोफेचा गाडा मराठ्यानी जाळला असें सरकार म्हणतात. (फॉल २, पृ. २०१); तोफा नेल्याचा उल्लेख ते करीत नाहोत.

७. 'हुटहुट' सगजो; 'हुटहुटी' तु. प्र.

८. 'स्वाधीन केली' सगजो.

९. 'घाटाखाली' भाइसं. प्र.

१०. 'अटेरीच्या' तु. प्र., सगजो; 'आचोरीचे' क. प्र.

११. 'मामील' सा. प्र

१२. खुद्द नानासाहेब पेशवे यांचें नजीबखानासंबंधी मत असें. "नजीबखान पुरा हरामखोर बाट आहे. बेमान. त्यास वाढविणें सर्पास दूध पाजण्यासारखें आहे. त्याचें पारपत्य करावें." (काव्ये. १६७) "नजीबखान बाट. अर्धा अबदाली, त्याचें राजकारण न करावें." (काव्ये. १७१)

**५२. गोविंदपंत व दत्ताजी यांचा नजीबखानाशीं स्नेह : इतर सर्व विरोधी**

इकडे गोविदपंत बुदेले यांचा व नजीबखान याचा स्नेह होता. त्याणें गोविंदपंत याजकडे सूत्र लाविलें कीं, "गोविदपंत दाजी, तुमचे हाती आम्हांस सुभेदार मल्हारराव होळकर देऊन गेले. प्रस्तुत राजश्री दत्ताजी सिंदे याचा शह भारी आला[१३] आहे. निभावणी होणें कठिण आहे." हें गोविंदपत बुदेले[१४] यांणी ऐकून त्यास आभय दिले की, "तुम्ही आपले जागा स्वस्त राहावें. उभयपक्षी रदबदली आम्हांकडे लागली." आसें बोलून गोविंदपंत बुदेले येऊन दत्ताजी सिंदे यांसी भेटले. सिंदे यांणीं गोविंदपंत बुंदेले यांस मनसोबा भागीरथीस पूल बांधावयाचा विच्यारिला. गोविदपंत यांणी जाबसाल केला की, "पाटीलबाबा, बिना नजीबखान यास हाती घेतल्याशिवाय हें कार्य होत नाही." तो याचेहि चित्तात तोच भावार्थ होता. त्यांणीहि हाच संदर्भ[१५] लाविला. ती गोष्ट याच्या चित्तात ठसली. गोविंदपंत बुदेले यांसी वचन दिलें की, "नजीबखान यांस बेलाशक बोलावून घेऊन यावें. तुमचे आमचे आनुमतें कर्तव्य तेंच करू," म्हणोन सागितले. मग गोविदपंत याणी वकील नजीवखान याजकडे पाठविले. तों तो आगोदरच आतुर होता. च्यार हजार फौजेनिशीं नजीबखान रोहिला भेटावयास आला. दोन कोसावर येऊन मुकाम केला. हे वर्तमान दताजी सिदे यास कललें व बुदेले याणी सागितलें. [तेव्हां] त्यास आडवे जावयास सिध जाहाले. तेव्हां जनकोजी सिदे व नारो शंकर व आंताजी माणकेश्वर व जानराव बांवळे[१६] व आणखी छोटे मोठे सरदार एकत्र मिळून विचार[१७] केला की, "नजीबखान रोहिल. जसा 'ससा भाणवसात चुकोन सांपडतो' तसाच हा सहज आला आहे. त्यास आजचे समईं सोडू नये." म्हणोन बोलून दत्ताजी सिदे यांजकडे गेले. त्यांस हें वर्तमान बोलताच दत्ताजी सिंदे यांणीं आव्हेर* केला आणि उत्तर केलें की, आपले कार्याकरितां वैरी मित्र करणें प्राप्त आहे.[१८] यात आम्ही खावंदाचे वाईट काय करितों?" म्हणोन धिकारिलें. जनकोजी सिदे[१९] आपले जागां परम श्रमी जाहाले

---

१३. 'सिंदे यांची बदनजर आम्हावर दिसते. आपले हाती मल्हारराव देऊन गेले, याची शरम आपल्यास असावी, म्हणोन बोलणे लाविलें' असा क प्र. मधील पाठ यापुढे आहे.

१४. 'याणी आणि वरकड यांणीं ऐकून भा. प्र.

१५. 'संदर्प' भाइसं.

१६. 'सांबले' शें, भा क. भाइसं. प्रती.

१७. 'इत्यर्थ' भाइसं.

*'मोंगलाई' मसलतीस दत्ताजीनें विरोध केला, यांतच मराठ्यांच्या स्वभावधर्माचें सार आलें. याच्या उलट सरकार मात्र मराठ्यांचा मोंगलाई मसलतीचा प्रयत्न होता असे फारशी लेखांच्या आधारें खरें मानतात! (फॉल २ पृ. २०४)

१८. आपले कार्याकरितां वैरी वोळखिजे याचें...' तु.प्र.; 'वैरी जेरीस असला तरी' कल्याण प्रत तसेंच

'आपले कार्याकरणें वैरी असला तरी समेट करून कार्य करणें.' भाइसं. प्रत

१९. यापुढे मजकूर आहे तो असा. 'याणीं वडिलास सुचविलें की, यास हातीं धरल्यास परिणाम शुद्ध लागणार नाही. आसे निखालस सागितलें; याज उपरीं वडिलाचे मर्जीस येईल तें खरें. आसें सांगोन' क. प्र.

कीं, " नकटें आसावें पण धाकटें नसावें." यत्न कोणाचा न चाले. बायका-मुलेंबालें देखील कोणाचे चितीं नजीबखान यास सोडावें आसें नाहो. आपो कोणाचे न ऐकतां दताजी सिंदे आडवे जाऊन भेट घेऊन आले. ते समईची ममता आणि जिवाळा सांगावा असा आर्थ नाही. [एकमय चितें उभयतांचीं जाहाली.[२०]] त्यांणी नजीबखान यांसी जाबसाल केला कीं, " आम्हास भागीरथी पूल बांधून द्यावा. आघाडी तुम्हांस देतों. पलीकडील रुपया मिळेल त्यांत दहावी तक्षीम देऊं. तुम्ही आम्ही एका खावंदाचे चाकर येकनिष्ठ होऊन सेवा करावी," म्हणोन बोलिले. नजीबखान याणें तें मान्य केलें आणि बेलभंडार इमान त्यासी दिल्हे. त्यानें आपली सानकरोटी यांस दिल्ही. केवल येकदील जाहाले. आठ-पंधरा रोज येक जागा राहिले.

**५३. नजीबखानाचा दत्ताजीविरुद्ध सुजाउद्दौलाशी गुप्तपणें करार व उठाव**

तिकडे भागीरथीपार सुज्यातदौला अयोध्येत होता. त्याजकडे गुप्तरूपें चेतराम[२१] वकील यासी नजीबखान याणें पाठविलें. की, " दताजी सिदे यांचा निश्चय, मोहीम तुम्हांवर आहे. आम्हीं येकवेल मनसोबा केला आणि आबदुल अलीस घेऊन आलों. तुम्ही चौकडून उफराळा केला नाही. तो मनसोबा या रीतीचा जाहाला. आम्हीच सर्वत्रांचे दोषी जाहलों आणि वाईटपणा घेतला. आता येक वेल आपणास पुसावें याकरिता सागून पाठविले आहे. याचे उत्तर काय ते करावें." म्हणोन वकिलानें जाबसाल केला की, "अनूपशहरकर आमदखान लगडा पठाण मात्र ममतेंत आहे. तुमचा विश्चय काय तो सागावा." मग सुज्यातदौला याणें उत्तर केलें कीं, "आपला बाप मनसूर आली याची वझिरी जाऊन इकडे कालक्षेप करून आहों. येयेहि सुखरूप राहू देत नाहीत. मरणाहून आपेश खोटे.[२२] आतां आपला कांही दुसरा अर्थ नाहीं नजीबखान यास सागावे की, मी सर्वस्व तुजला साह्य आहें; पन्नास हजार फौज व तीनशे तोफा तुझे जिमेस करितों व पाच[२३] कोट रुपये लागले तरी चिंता नाहीं.[२४] परंतु गलिमास नदीपार होऊं देऊ नये." याप्रमाणें सानकरोटी इमानप्रमाण ,घेऊन वकील आला.

**५४. नजीबखानाचें अंतःकरण शुद्ध जाणून दताजी त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागतो**

इकडे आबदुलआलीचे सूत्र वरलेवर ठीकच होतें. इतक्यांत सुज्यातदौलाला याजकडून आश्रय खातरजमेचा होताच, नजीबखान रोहिला दताजी सिंदे यांचे डेरियास येऊन बोलिला की, " साहेब, तुम्ही गण[२५] मुक्तेश्वरी जाऊन तीर्थविधी करावा. मजला आज्ञा द्यावी. मी मिरापुरानजीक सुक्रिताल आहे तेथे जाऊन भागीरथीस पूल बांधून ठीक करितों. तोंपावेतों येक महिन्याने आपणहि मागाहून यावें." नजीबखान[२५]

---

२०. कंसांतील मजकूर १८७१ व १८८६ भाइसं. प्रतीत नाहीं.

२१. 'जतराम' शें. प्र. 'जयतराम' भाइसं. प्र.

२२. 'कठीण' भाइसं.; 'वोखटें' सा. प्र.

२३. 'पांच कोट रुपये खर्च लागला तरी इतका खर्च पुरवितों' सा. प्र.

२४. 'ॠणंमुक्तेश्वरी' भाइसं. प्र. गड-मुक्तेश्वरी' १८७९ व १८८६ प्र.

२५. या शब्दापुढें क. प्र. पाठ असा— 'कपटवेश करून, माया दाखवून, केवळ जीवप्राणतुल्य भासवून.

यानें आगोदर महिना-पंधरा दिवस राहून केवळ आर्जव करून आकृत्रिम भाव दाखविला होता. याजकरितां सिंदे यांस खरेंसे भासलें. हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें, बहुमान देऊन गाजदीपुऱ्याचे मुकामाहून रवानगी केली. ते समई जनकोजी सिंदे व सर्वांनीं सांगितलें की, याचें पारपत्य करावे तें न केले. आस्तु. आतां यासी जवल ठेवूनच कार्य करून घ्यावें. यास निरोप देऊं नये." म्हणतांच दताजी सिंदे यांणी जाबसाल केला की, "तुम्ही[२६] आवघे कर्तव्याचे मनुष्य आणि आम्हीच एक नाकर्ते[२७]! तस्मात आम्हांस काही एक सुचत नाही. नजीबखान याचे अंतर[२८] शुद्ध (असल्याचे) आम्हास पुर्तेपणें प्रत्ययास आलें. तेव्हा आम्ही त्यास निरोप दिल्हा." या प्रकारे उत्तर होतांच दुसरे कोणी[२९] न बोलता सर्वत्रानी कल्पना केली की, "मुगीस पक्ष फुटतात तसी गत जाहाली." उपाय नाही; म्हणोन आपले जागां स्तब्ध[३०] राहिले.

## ५५. नजीबखानानें दत्ताजीस दगा दिला

(त्यानतर) नजीबखान याणें कूच करून शुक्रतालास गेला. शुक्रताल म्हणावयास कारण कीं, शुक्राचार्य स्वामीनी परिक्षिती राज्यास भागवत श्रवण करविलें होतें. तें (हें) स्थल आणि ते स्थली परिक्षिती राज्यास शापानलें तक्षक-दौश होऊन भस्म[३१] जाहाला. त्या स्थलीं जाऊन राहिले. ते स्थल परम गूढ, भागीरथी उतर–वाहिनी येऊन पालखीचे दाडीसारखें नदीचें वलण येऊन दक्षण वाहिनी गेली. ते स्थलीं नजीबखान यानें लस्करचा मुक्काम केला होता. आलीकडील तोंडीं खळ्या[३२] भारी दोन डोंगरगण्यासारिख्या[३३], जावयास सुदामत वाट नाही. कोठें कोठें सुमार्ग चांगले सुगम होते. तेथें खंदक, खडक लागला त्यावरी तोफा व वरकड रिसाले ठेवून बंदोबस्त ठेवून दुर्ग केवल आसाध्य केले. तों इकडे दताजी सिंदे भागीरथीस गण-मुक्तेश्वरीं येऊन तीर्थविधी केला. आधीच सिंदे दानशूर व रणशूर होते. त्यांत आलभ्यलाभ, श्रीभागीरथी प्राप्त जाहाली. मग ज्यास जसे ईश्वरें आनकूल दिले तसे दानधर्म केले. ये अर्थी दोहरा[३४] आहे—

जलकी शोभा कमल है, दलकी शोभा पील ।
धनकी शोभा धरम है, कुलकी शोभा शील ॥

(असो.) तों नजीबखान याजकडील पत्राची मार्गप्रतीक्षा करीत होते. तों आकस्मात नजीबखान याजकडील हालकारे याणीं पत्रें दिल्हीं. खुशाल जाहाली. नंतर येकांतीं

---

२६. "तुम्ही सर्वत्र शहाणे, आम्ही केवळ मूर्ख; मला काहींच ज्ञान नाही." सां. प्र.

२७. 'नाकाबील' सां. प्र.

२८. 'याचा आंतर शोध आम्हांस' भाइसं प्र.

२९. 'दुसरें कोण बोलतो' सा. प्र.

३०. 'अजुर्दे होऊन' क. प्र.

३१. 'निधा (ध) न पावला' क. प्र. शुकाशीं संबंध असतां शुकाचें शुक्र होऊन 'शुक्र–ताल' झाले.

३२. 'खड्या' शें. प्र.

३३. 'डोंगरगण्यासारिख्या' भाइसं. प्र.; 'डभोरगणें' सगजो.

३४. हा दोहरा सगजो, मंडळ, भाइसं. प्रतीत नाहीं.

जाऊन[35] पारशी पत्रें मुनसीकडून वाचून पाहिलीं. त्यांतील अन्वय घ्यानांत आणून पाहिला. तों नजीबखान याणें पत्रें लिहिलीं कीं, "तूर्त बरसातकाल, नदीस पाणी भारी, तूर्त पूल सिध होत नाहीं. तुम्ही या समईं कोणीकडे तरी मोहीमेस जावें. बाजत बरसात देख लेऊं." याप्रमाणें उत्तर आलें. तरी यासी कृत्रिमभाव उमजला नाहीं. जाबसाल दिल्हा कीं, "तूर्त राहिले तर राहूं द्यावें; तुम्हीं फौजेसुधा यावें." म्हणोन नजीबखान यास पत्रें लिहिलीं. रोहिल्यानें साफ उतर केलें कीं, "आपणास यावयास आनुकूल पडत नाही. तुम्हीं देखिली बुधी करावी."

**५६. दताजी सिंदे यांची सुजाउद्दौल्यावरील स्वारीसाठीं शुक्रताल येथें चढाई**

आमें साफ उत्तर देतांच दताजी सिंदे यांची मर्जी केवल दिक जाहाली. लहान थोर यांणीं व भाववंदानी व खावंदानीं सागितलें तें न केलें. मल्हारराव यांचे मनसोब्यावरून सर्वत्राचा आव्हेर केला त्याचा फलादेश या प्रकारचा जाहला. नजीबखान याणें मात्रागमन केलें. म्हणून (दताजी सिंदे) केवल दिक[36] होऊन एक-दोन दिवस आनं–पाणी देखील वर्ज केलें. मग जनकोजी सिंदे यांणीं हिमतीची मसलत दिल्ही कीं, "आधीच लाहानथोराचें आईकिलें नाही. आता 'हिमत मर्दा मदत खुदा' मातीं मातीं मरावें. नजीबखान म्हणजे कोण जिनस ?[37] चढते घोड्यानिसी उडऊन टाकू.[38]" [जनकोजीनें असें] म्हणताच दताजी सिंदे यांसहि आवेश आला. तेच क्षणीं नगारा करून कूच करून मजल दर मजल भागीरथीतीरी हस्तनापुरीवर मुकाम केला. तेथून दिली इंद्रप्रस्त कचे चालीस कोस. हस्तनापुरीं कांहीं वस्ती नाहीं. साक्षा मात्र जुनी पांढरवस्ती; उगीच दिसती आहे. तिथें टेकाडें मात्र आहे. तेथें तीर्थाचा कूप व वटवृक्ष मात्र आहेत. साक्षा मात्र सागतात कीं, या स्थलीं हस्तनापूर होतें. तेथें मागती रोहिल्यांकडील वकील चेतराम येऊन भेटला. वटवृक्षाखालीं एकांतास[39] बसल्यावर त्याणे जाबसाल केला की, "प्रस्तुत तुम्ही आलियानें काम कारागर[40] होत नाही; आता माघारें जावें." [असें] म्हणतांच दताजी सिंदे यांणी उतर केलें की, सुज्यातदौला व तुम्हीं मिलोन क्रोड रुपये खंडणी देणें. म्हणजे माघारें जातों." म्हणताच वकिलानें उतर केलें की, "कौरव-पांडव यांचा घरकलह लागला ते समईं भगवान श्रीकृष्ण परमात्मा याणें आपले आंगें येऊन याच वटवृक्षाखालीं सिष्टाई केली. ते समईं दुर्योधन याणें उत्तर केलें कीं, "सुईचे आग्रावरील मृतिका प्राप्त व्हावयाची नाहीं. तेथें इद्रप्रस्त कैचें व वरुणवंत कैचें ? साक्षात् भगवान याची शिष्टाई याच जागी सिधीस गेली नाहीं तेथें तुमचा मनसोबा काय सिधीस जातो ? पुरवेल तरी कूच करून जावें; नाहीं तरी युध्यास

---

३५. 'जाऊन'च्या पुढें "पारसनीस" पारसी कागद वाचणार समागमें होतांच; त्यास बोलावून कागद त्याजकडून वाचून पाहिले असा क. प्र. पाठ.

३६. 'दंग' सा. व भाइसं. प्र.

३७. "नजीबखान याचा केवा काय ?" क. प्र.

३८. 'घोड्याच्या पायाच्या ठोकरी-खाली उडवून देऊं' सां. व क. प्रती.

३९. 'सांबलीस' सगजो. व सा. प्रती.

४०. 'कामगारी होत नाहीं' भाइसं. प्रत.;

आपण सिधच आहों." या प्रकारें त्याचें निष्ठुर उतर होतांच वकील यांस वेडेंवांकडें बोलून पिटून लाविलें. आपण कूच करून शके १६८१ भाद्रपद[४१] शुा १० शुक्रवारीं शुक्रतालास जाऊन पोहोंचले. चढते घोडयानिसी चालोन जावें अशी हिंमत धरून गेले. ते वेलेस पाहतात तों जागा केवल आसाध्य. कोसपर्यंत उभे राहूं देईनात. खळघाचा आश्रय करून तोफांचा व बाणांचा मार देऊं लागले. च्यार घटिका उभे राहून मायंकालीं तेथून कोसभर मागें सरून; मिरापुराकडे शुक्रतालापासून दोन कोस–जेथें परिक्षिती राज्यास रुषीचा श्राप जाहला म्हणोन[४२] धनवंती यास समजल्यावरून उठवावयास जात होता तों मार्गी तक्षक नागराज याणे ब्राह्मणाचा वेश धरून धनवंतरी याचा पराक्रम पाहून, धनवंतरी यास मूप द्रव्यें देऊन माघारा फिरविला. तें स्थली साक्षी कूप म्हणजे आड आहे; तेथें सिदे याचे डेरे जाहाले. तमाम आतरवेद प्रांती रोहिल्याचीं ठाणीं होती तीं घेतलीं. मिरापुराचे सैंदहि[४३] येऊन भेटले–पूर्वी दक्षिणेसहि सैद आला [होता] तो त्या मिरापूरचा. तेथें सिदे राहून प्रातःकाली नगारा करून, फौज सिध करून चालोन [गेले. त्याजकडून तोफांचा व बाणाचा मार होऊं लागला. याणीं मनसोबा त्यांजवर तोफा चालू कराव्या असा केला.[४४]] घ्यावें. [व] दुरोन तोफा लावाव्या. तों इकडील तोफा लावीत तो गोला कारागर होईना. खालीं तोफा लागू केल्या तों खल्यात गोला पडू लागला. वरती तोफा लाविली तों शुक्रतालावरून गोला पार भागीरथीत पडे. आसी गत जाहाली. त्यांजकडील तोफांच्या व बाणांच्या माराने दाहा पाच घोडीं व मनुष्यें ठार पडली. असा प्रकार जाहाला. या प्रकारें नित्यानित्य भाद्रपदमासपर्यंत गोलागोली होत गेली. नजीबखान याणें

---

४१. 'वैशाख शु. १० स' असाहि पाठ कांहीं प्रतीत आहे. भाद्रपद शुा १० मीस (ता. २ सप्टेंबर १७५९) मोडक जंत्रीप्रमाणें शुक्रवार येत नाही. जुन्या शक १६८१ च्या पंचांगांत श्रावण शुा १० मीस शुक्रवार येतो. जदुनाथाच्या मते ही तारीख १५ सप्टेबर १७५९ आहे. पण फॉल च्या पृ. २०८ च्या टीपेंत दिल्ली बखर १–९–१७५९ अशी तारीख देते. ती तारीख बखरीच्या तारखेशी बरीच जुळती आहे.

४२. 'म्हणोन' पुढें कल्याण प्रतीचा पाठ असा आहे.–"धनवंतरी यास समजल्यावरून आला, कीं श्रापयोगेंकरून राजा मृत्यु पावेल. त्यास लक्षावधि मरावे परंतु लक्षावधींचा पाळणवाला न मरावा, असे समजोन आला, कीं याचा मृत्यू टाळावा. तेव्हां ऋषीचा पुत्र सानिध्य होता. धनवंतरी यास ऋषीचे पुत्रानें पृच्छा केली की, तुम्ही कोठील कोण ? तेव्हां धनवंतरी यानें उतर केले की, राजास ऋषीने श्राप दिला तेणेंकरून राजा मृत्यु पावेल; त्यास निधान पावो देऊं नये म्हणोन आलों. त्याजवरून ऋषिपुत्रानें त्यास पृच्छा केली की पाहूं तुझा पराक्रम. मृत्यू पावला त्यांस तू कसा उठवितोस ? म्हणोन एक वृक्ष सानिध्य होता, त्यास ऋषिपुत्रानें तो वृक्ष शापून दग्ध केला. धनवंतरी याणें मंत्रसामर्थ्येंकरून वृक्ष जसा होता तसाच केला. तेव्हा ऋषिपुत्रास समजले की, राजास निधान पावों देणार नाही. ही खातरजमा होऊन त्याजला अपरिमित द्रव्य देऊन वाटेस लाविला. ते स्थली साक्षीस कूप आहे. म्हणजे विहीर' इत्यादि.

४३. 'सय्यदबंधूपैकीं.'

४४. हा कंसांतील मजकूर १८७९ व १८८६ व भाइसं. प्रतींत नाहीं.

भागीरथीस पूल बांधून कुतुबशाहा गुरू दाहा हजार फौज व बुणगे नदी पार राहिले होते. वीस हजार फौज व तोफा नजीबखान याजवल ते स्थलीं होत्या. त्याजला रस्ता नदीवरून होऊन नदीपलीकडून रसद पुलावरून रोहिले यांस पोचत होती. गहूं, तादूल कमोदी, तीस बत्तीस शेर पके याप्रमाणे सवगाई होती. गलिमाचे लस्करात आठ शेर, नऊ शेर धारण व वैरण रुपयास साहा[४५] पुलें. याजमुलें घोडी व उटे अस्तिचर्मं जाहाली; हाती उठवणीस आले.[४६] याप्रमाणें भाद्रपदमासपर्यंत जाहालें.

## ५७. दत्ताजी–जनकोजींचें नजिबाशीं युद्ध

तों एके दिवसी फौज सिध होऊन, फौजेंत जनकोजी सिंदे येऊन, जानराव बावळे व नारो शंकर व जिवाजी भोईटे व दिल्लीची कुमक व नागरमल व बहादरखान बलोच असे प्रथक[४७] दुसरेकडे ढांसण[४८] धरून गोलागोली करीत होते, त्या फौजेंत दत्ताजी सिंदे गेले. तेव्हा त्या लोकास अधिक हिमत चढून पुढें खळयांकडे मार देत चालिले. तों नजीबखान रोहिला यांजकडून फौज सिध होऊन खळया सोडून आलीकडे आले. त्याजवर दत्ताजी सिंदे याचें त्यांचें झुंजास तोंड लागले. तों जनकोजी सिंदे यांचे बाजूस रोहिल्याचे सामान होतें, तेहि खळयाबाहेर निघाले. तों त्याची तोफची व बाणची वगैरे यत्राचा भडिमार दत्ताजी सिंदे याजवर होऊ लागला. परतु वाट[४९] चालेना. रोहिल्याची आग भारी. आणि ही गोडी फौज, घोडीहि उठावणीस आलेलीं, या रीतीचें वर्तमान होताच साडणी स्वार जनकोजी सिंदे याजकडे आला. त्यांणी सुचविलें की, "पाटीलसाहेब याणी घोडे घातले. मारामार जाहाली." हे वर्तमान जनकोजी सिंदे याणी ऐकोन नगारा केला. उभयतां चुलते-पुतणे यांची हिंमत सारखीच आणि येकमेकाचे आचहि[५०] बालगून होते. मग घोड्यास तंगवार करून खासा जनकोजी सिंदे 'हर हर' शब्द करून उठले. तोफांचे माऱ्यात आले, तोहि मार खाऊन बाणांचा व हस्तनालांचा व सुतरनालाचा व जेजाल्याचा मार खाऊन वेलाशक रोहिल्यांत मिसळले. मोठा धडाका[५१] जाहला. क्षणभर तरवारीची टिपरघाई जाहाली. तों हें वर्तमान दत्ताजी सिंदे यांणी ऐकोन दातनिकषीस[५२] येऊन तिकडून घोडी घातलीं. त्यांणीहि मिसळून मारामार[५३] केली. दोहोकडून मार मोसून रोहिले यांचें सामान निघोन खंदकापार जाहाले. यांचें फौजेचें ढांसण खंदकास लागले.[५४] तों पुढें मार्गहि नाहीं आणि त्यांकडील आगीनें केवल भाजून काढिले. दत्ताजी सिंदे यांजखालील घोडी

४५. 'दाहा पुलें' शें. प्र.

४६. 'घोडीं व उंटें उठवणीस येऊन अस्थिचर्मं जाहालीं' सा. प्र.

४७. 'प्रत्येक' सा. व भाइसं. प्र.; 'प्रत्यक्ष' म. प.

४८. ठांसून भाइसं. प्रत.

४९. 'धांव होईना' सगजो.

५०. 'अचपल गुण' सा. व. सगजो.प्र.

५१. 'कडाका' सगजो. 'कडाखा' सा.प्र.

५२. 'दातनिकसीस' सा. प्र.

५३. 'त्यांनीहि मिसळ होऊन धाव केला' सा. प्र.

५४. याच्यापुढ 'पाहून चढावळीनें खंदकास गेलें' असा भाइसं प्र.त पाठ आहे.

खंदकाच्या तोंडावर ठार पडली. पाटील पायउतारा खंदकाचे तोंडीं उभे राहिले. हातांत तरवार होती. मोठ्या हिंमतीचा पुरुष. त्यांजवर घाव तरवारेचा करावयास हात पोंचेना. मग हातांत तरवार होती ती झुगारून मारिली. पलीकडे रोहिला ठार पडला. इकडे जनकोजी सिंदे यांणी मार खाऊन खंदकास तटून[५५] उभे राहिले. ते समई जनकोजी सिंदे यांची उमर वीस वर्षाची होती,[५६] परंतु मर्दुमी,[५७] मसलत भारी. जनकोजी सिंदे याचे खालील खांसा घोडी ठार पडली; व जनकोजी यास मनगटावर तरवारीची जखम लागली व भालेची जखम कानपटीस लागली, परंतु हालकी होती. तसेंच दत्ताजी सिंदे यास भाल्याची जखम व गोळीची मानेस कातरती गेली. ते समई भले लोकानीं दोघेहि सरदार बले वोढून काढिले. सिंदे याजकडील मनुष्यें खासे साडे सातसें ठार पडले. केवल धारच खचली. बारासें घोडीं ठार पडली. दोन हजार[५८] घोडे मनुष्यें जखमी घायाळ जाहाली. सिदे यांजकडील सरदार जिवाजी सिंदे म्हणोन बरा मातबर मनुष्य, तीन हजार पागा त्याचे जिमेस होती, तो ठार पडला. त्याचा पुत्र हणमन्तराव सिंदे तेहि कामास आले. दोन अडीचसें मुडदे खंदकापासी राहिले, काढावयास फावले नाही. फौज माघारी सरून गोटात आली. लष्करांत जिकडे तिकडे प्रलय जाहला. ते समईं कितेक लोकाचा लौकिक जाहला. कितेकांनी स्थित होती ती आबरू गमावली. आठ-पधरा दिवस जखमा बऱ्या व्हावयास लागल्या. परंतु नजीबखान यांस काही चैन पडों दिले नाही. नित्य गोलागोली होतच होती. तों दसरा जवळ आला.

### ५८. अबदली लाहोरास येतो, तेथून साबाजी शिंदे निघून येतात

मग नजीबखान याणे आपला भाऊ खंदारास आगोदर पाठवून आबदुल आलीस सिध केलेंच होतें. इकडे सुज्यातदोला हास्तगत होनाच. तैसाच आमदखान लंगडा पठाणहि त्याचे मेळणीत होताच. तसाच माधवसिंग जयनगरकर व विजयसिंग मारवाडी. आगदो हिंदुस्थान भारून टाकिले होते.[५९] हें आगदींच दत्ताजी सिदे यास माहीत नाही. [असा काट नजीबखान याने केला ][६०] खदारचा पातशाहा आबदुल आली चालीस हजार फौजेनिसी आटक उतरून लाहूर प्राती आला. तों त्या प्राती साबाजी सिदे होते त्याणी येक मोठें आरिष्ट केलें. कामाऊचे[६१] पहाडानजीक ज्वालामुखी म्हणून महा-जाग्रीत स्थान शक्तीचे पीठ होतें. ते महाक्षेत्र. तेथील ब्राह्मण केवल आत्मघ हिंदुस्थान प्राती प्रतिसूर्य होते. त्या क्षेत्रात जाऊन साबाजी सिंदे याणी विध्वंस केला तेव्हां तेथील ब्राह्मणांनी शक्तीपुढे सहस्त्र चंडीचा होम केला. प्रथम आहोती दत्ताजी सिंदे यांचे नांवे टाकिली. पूर्णाहुति नानासाहेब याचे नावें दिली. पुढील भवितव्य तैसेच हाणार.

५५. 'थेटून' सा. प्र.

५६. 'लहान वय होत्साता, मोठें धैर्यवान, मर्दुमकी मोठी, ते समई त्याचाहि घोडा पडला' क. प्र.

५७. 'हिमत' सा. प्र.;

५८. 'दोन अडीचशें' भाइसं. प्र. व क. प्र.

५९. 'हिदुस्थानात जाळे घालून त्याची दोरी रोहिल्याने आपले हाती धरली होती' असा सा प्र पाठ.

६०. १८७९ व १८८६ प्रतीत नाही.

६१ 'लाहूरचे' भाइसं. प्र. व क. प्र

आसो. साबाजी सिंदे यांणीं दुराणीस तोंड न देतां निघोन आले.[62] पंज्याब मुलतान प्रांतीं त्रिंबक बापूजींचे[63] पथक होते. सात[64] हजार फौज होती. ते केवल कुबेर जाहाली होती. पंज्याब मुलुख केवल गरीब, निशस्त्री. त्या रानांत जे चाकर मनुष्य [होते] त्याणी मात्र हत्यार धरावें. वरकड कोणी न धरावें. या प्रकारे तो मुलुख गरीब. पांच रावतानी गावात जाऊन चावडीस बसावें आणि गांवातील मालमत्ता ज्याची त्याजकडून आणावी. शेवटी त्याचेच डोईवर देऊन लष्करापावतों येऊन पोंचवावें. ऐशा सुखांत होते. केवल गरीब खासदार यांजपासीं हजार-पांचसें रुपयाची मालमत्ता[65] बालगून होते. गिलच्याचे कवेंत सांपडले. निघों पावले नाहींत. साबाजी सिंदे मात्र निघाले होते.

## ५९. कालगतीनें दत्ताजीस सुजा स्नेही वाटून त्याच्या साह्यानें नजीबखानाच्या पराभवाची मसलत

इकडे दसरा[66] जाहाल्यावर दत्ताजी सिंदे यांणीं लहानथोर सरदार मिलऊन मनसोबा केला की, "च्यार महीनें या स्थलीं मोहीम केली; परंतु नजीबखान रोहिला जेरीस येईना. दिवसेंदिवस शेणामेणाचे [होते ते] लोखंडाचे होत चालिले. त्यास यत्न कोणता काय करावा ? आतां येक मात्र तजवीज करावी. हर इलाजे भागीरथी पार फौज घालवावी. म्हणजे पलीकडे रोहिल्याचे बुणगे व खजीना आहे, तो लुटून टाकावा. आणि नदीस पूल बांधला आहे तो तोडून टाकावा. आणि फौज पलीकडे ठेवावी. म्हणजे सहजच वैरी अप्रयास जेरीस येईल." तें समई कितेक लोकांनीं दिकत घेतली कीं पलीकडे सुज्यातदोला पन्नास हजार फोजेनिसीं असतां हें कसें घडेल ?" दत्ताजी सिंदे बोलिले कीं, "सुज्यायतदौला याचा व आमचा स्नेह भारी. पूर्वी मनसूर आली याचे कामास आमचे बाप राणोजी सिंदे बहुत प्रकारें आले[67] होते. प्रस्तुतहि त्याजकडील वकील आम्हापासी आहेत. त्याचे बोलण्यात व स्नेहांत अंतर दिसत नाही" म्हणून बोलिले. परंतु 'मोंगलाई मसलत' आसी यास उमजले नाही एक सुज्यातदौला याचे बलावर तर नजीबखान याणे हिमत बाधिली आसे आसतां कालगतीमुळें झापड पडली. "जैसी दैवाची उजरी तैसी बुधी उपजे शरीरीं," असा प्रकार घडला. आसो

## ६०. दत्ताजीची फौज हरिद्वाराजवळ भागीरथी पार होते

[दत्ताजी सिंदे] "नदी उतरावयासी यत्न पाहावा" म्हणून बोलिले. तो नजीक मिरापूर होते. तेथील मिदी सैद हे नजीबखान याचे द्रोही होते. त्यांस

---

६२. नाहीं, दुराणीशीं लढून पराभूत होऊन आले. रा. ख. १, १४१ व १४२.

६३. हा 'अत्रे' असावा.

६४. 'दहा हजार' सा. प्र. 'सातआठ' क. प्र.

६५. 'मालियत' सा. प्र.; शें. प्र.

६६. दसरा, १ ऑक्टोबर १७५९ ला होता. एकूण शक्रतालाची मोहीम पावसाळ्याचे चार महिने चालली.

६७. हें खरें आहे; परंतु त्यामुळें सुराजउद्दौला आता दत्ताजीस सामील होईल हें खरें नव्हतें.

बोलावून नदी उत्तरावयाचा[६८] विचार पुसला. ते समई सैंद यांणी सागितलें कीं, "हरिद्वाराजवळ जैता गुजर म्हणोन गिराशा भारी आहे. त्यास मात्र चोरवाट विदित आहे. त्याजसिवाय दुसऱ्यास ठाऊक नाही." मग हर इलाज करून जैता गुजर यास आणून त्यास बहुमान करून, हती, चौघडा, जडजवाहीर, जडावाची कंठी दिल्ही. त्यास पाच लक्षांचा मुलूख द्यावा असा करार केला. तेव्हां त्याणें "वाट दाखवितों" म्हणोन मान्य केले. मग यांणी आपले फौजेची चौकसी निवड करून गोविंदपंत वुदेले व अन्ताजी माणकेश्वर याचा पुत्र तात्या व जिवाजी भोईटे व तुकोजी होळकर, आसे वीस हजार फौजेनिसीं निघोन जैता गुजर या समागमें दिल्ही. कार्तिक शुद्ध[६९] प्रतिपदेस हरिद्वारास जाऊन पोहोंचले. तेथें खलाल भागीरथीस होता. नाभी परयंत पाणी होतें. दाहा हात निभावलें म्हणजे पार पडले. नाही तर चार हात गेले म्हणजे डोहात पडलियावर समुद्रात गेल्याची गत! मग यत्नच नाही. ऐशा संकटांतून फौज भागीरथीस पार गेली. हें वर्तमान दत्ताजी सिंदे यांणी ऐकोन परम खुशाली केली. तोफाहि जाहाल्या.

**६१. सिंदे सैन्याच्या तावडींतील नजीबखान गोविंदपंत बुदेल्यामुळें वांचतो. सुजाची फौज आल्यामुळें सिंदे-सैन्य परत येतें**

हें वर्तमान नजीबखान रोहिले यांणी येकतांच तेच क्षणी कुतुबशाहा पांच हजार फौजेनिसी पुलावरून बुणगियांत लाऊन दिल्हा. दुदेखान रोहिला तो अगोदरच नदीपार होता. दुदेखान व कुतुबशाहा येकत्र जाहाले. इकडून नजीबखान रोहिला यांणीं ताबडतोब सांडणीस्वार सुज्यातदौल्याकडे रवाना केला कीं "तुमचे भरंवशावर आम्ही हें कर्म पतकरिले. आता गलिमाची फौज नदीपार जाहाली. माझा जीव जगत नाहीं. अजूनहि तुम्ही जलद कुमक करिता तरी[७०] उतम आहे. नाही तरी दताजी सिंदे यांस भेटून आम्ही पुलावरूनच पार होतो. तुम्हांसाठी म्या येवढें दुर्घट काम अवलबिलें आहे." म्हणोन सांडणी सुज्यातदौला यांजकडे पाठविली. गंगापार सिदे यांची फौज गेली. त्याणी नजीबखान याचे बुणगे व मुले-माणसे व खजिना गांठला. तेच दिवसीं अगदीं हस्तगत व्हावें; परंतु गोविंदपंत यांचा व नजीबखान यांचा चांगला स्नेह होता. म्हणून पाच लक्ष रुपये घेऊन[७१] त्याची बाजू मारून नेली. कमाऊचे पहाडांत भारी किला होता तेथें जाऊन आगदीं भारधडी पोहोंचली. निमित्य टाळावें म्हणोन गोविंदपंत यांणीं पिछाडी गांठली. त्यांत दोन लक्ष रुपये व पांच हत्ती व दोन-च्यारसें उंट व च्यारसें घोडी सांपडलीं. ती घोडी घेऊन पुलाकडे यावें तों सुज्यातदौला फौज पन्नास

---

६८. 'नदीचा उतारा विचारावा' सगजो

६९. 'वद्य प्रतिपदा' भाइस. क. सां. प्रती. व 'शुा १' असा सगजो. सां. शें. प्रतींचा पाठ आहे. राजवाडे यांना शुा १ मान्य खं. १ पृ. २२०, टीप पहा.

७०. 'तर माझी निभावणी होईल' नाहीं तरी परिणामास लागत नाही. क. प्र.

७१. गोविंदपंतासंबंधीं बखरकार येथेंहि कलुषित दिसतो. उलट गोविंदपंत दत्ताजीच्या सांगण्यावरून दोघांमध्यें मध्यस्थी करतांना दिसतो. खं. १ ले. १४०

हजार व दीडसें[७२] तोफा घेऊन चालून आला. याचे कहीची व त्याची आकस्मात गांठ पडली. काही कही लुटली गेली. हें वर्तमान गलिमांनी ऐकून ते क्षणी माघारें पळूं लागले. कोठें दम न खातां दोन रात्री दोन दिवस चालोन खलाल[७३] उतार होता, तेथें पोहोंचले. झाडून नदी उतरून आलीकडे आले. त्या गडबडीत हजार बारासे मनुष्यें वाहून गेली. दम खाऊन उतरते तरी इतके मनुष्य वाहून न जाते. आसो.

**६२. दत्ताजी सिंदे प्रीतराज व गोविंदपंत यांजवर नाराज**

दताजी सिंदे यास वर्तमान कळतांच याची खुशाली होती तो मोडली. निर्वाण समय भासला. सुज्यातदोला याजकडील वकील प्रीतिराज[७४] होता; त्यास बोलावून आणिले आणि पुसले कीं, "तुम्ही आम्हासी मसलत काय करीत गेला आणि काय कर्तृत्व केलें[७५] ?" म्हणोन वकिलाची अप्रतिष्ठा करून दवडून[७६] दिल्हा फौज येऊन मिळाली. गोविंदपंत यांजवर वहुतच श्रमी मसलतीस धका लाविला म्हणोन, जाहले. 'आसो, पुढे पाहून घेऊं.' म्हणोन उगेच राहिले. सुज्यातदोला याचा मुकाम[७७] भागीरथीचे पलीकडे जाहाला. याजकडील कोणी तार्थाचें स्नानास जाऊं न पावें असें जाहाले. तो फोजेतून तोफांचे गोले मारूं लागले.[७८] आस्तु.

**६३. नजीबखानाचें दग्याचें कारस्थान : दिल्ली पातशाहाचींहि मराठ्यांविरुद्ध फितुरी पत्रें**

पुढें सुज्यातदोला याची नजीबखान याणें एकांती भेट घेऊन मनसोबा केला की, "(तुमचा व सिंदे याचा स्नेह पूर्वीपासून आहे. तरी त्यांसी[७९]) तुम्ही भेटीस आणावें व दगा करून दताजी सिंदे यासी भेटीचे समई जिवे मारावे." म्हणोन मनसोबा करून दताजी सिंदे यांजकडे राजगीर[८०] गोसावी याचा लेक[८१] उमरावगीर गोसावी, सुज्यातदौला याकडे होता,** त्याचे पदरी पाच हजार फोज होती, उमर तो पंचवीस वर्षांचे खाली; परतु कर्ता[८२] मनुष्य होता.** त्यास सुज्यातदोला याणें काही चितांतील कापटय कलों न देता वरकर्णीनि ममतापूर्वक बोलोन दताजी सिंदे याजकडे पाठविलें. मनसुबियांत दाहा पाच येरझाऱ्या केल्या. निदान मनसुब्यांत ठरविले की, "सुज्यातदोला याजकडील क्रोड रुपये खंडणी घ्यावी. नजीबखान यानें

---

७२. 'तीनसे' सा. प्र.

७३. 'खलाल्लास' सगजो. 'खळाल उतरून आलीकडे पोचले' सा. प्र. पाठ.

७४. 'प्रीतिराम' क. प्र.; 'प्रीतराज' सा. प्र.

७५. 'दाढी धरून पाय तुडवावे हें कर्म तुमचें' असा क. व. सां. प्रतीचा पाठ.

७६. 'लावून' मं. प्र.

७७. 'मुलूख' भाइसं. प्र.

७८. येथें 'गलीम यांणी तो तळ बळकाऊन तेथेंच राहिले. त्या जाग्यावरून हालले नाहीत' असा सा. प्र.त व क प्र.त अधिक पाठ आहे.

७९. 'कंसातील मजकूर १८७९ व १८८६, भाइस. व मंडळ प्रतींत नाही.

८०. 'राजेंद्रगीर' पाहिजे.

८१. 'चेला' सा. व भाइसं. प्र.

८२. 'शाहाणा, चतुर' क. प्र.

व तुम्ही पाहून घ्यावें.[८३] नजीबखान भेटीस येऊन सलामामला होईल तों स्वस्त राहावें.[८४] नजीबखान याचे लस्करांतून[८५] येकीकडे हजार फौजेनिसीं येऊन भेटून जावें.[८६]" याप्रमाणें दताजी सिंदे व जनकोजी सिंदे व नारोशंकर व आंताजी माणकेश्वर याचा पुत्र आसे मिलोन ठरविलें. इमान-प्रमाण बोलून करारात आणिले. तों इकडे सिंदे यांस बोलण्याचे भरीस लाऊन आबदुल आलीकडे वरचेवर पत्रें पाठविली की, "सुज्यातदौला येऊन पोंहोंचला. आमदखान लंगडा पठान दाहा हजार फोजेनिसी सिधच आहे. माधवसिंग जयनगरकर हा केवल आम्हास आप्त. याणें स्वतां[८७] येक बाजू आटपलीच आहे. मल्हारराव होळकर देशीहून तीस हजार[८८] फोज घेऊन मजल दरमजल दताजी सिंदे यास मिलावयास येत होता. तो माधवसिंग याणी शहास गुतऊन पाडिला आहे. महत् कार्य त्याणे केले. याप्रमाणे आज केवळ 'ससा भाणवसास' सापडतो तैसी शिकार अनायासे सापडली आहे. सत्वर येऊन पोंचावें. दक्षणेस यक मनुष्य जाऊ पावणार नाही." याप्रमाणे पत्रे पाठविली आणि आबदुल आलीस जल्दीने आणविला. तसेंच दिलीत आलमशाहा पातशाही करीत होता, त्याचें भवितव्य[८९] होणार त्यासहि बुद्धविपर्यास निर्माण जाहाला. त्याणेहि फितुराचो पत्र सुज्यातदौला याजकडे पाठविली की, "तुम्हां सर्वत्र मिलोन दक्षिण लोकाचें पारिपत्य करावें. गाजुदीखान याचा शिरच्छेद करावा. वजिरी तुम्हास देईन आणि बक्षीगिरी नजीबखान रोहिला यास देईन." म्हणोन पत्र पाठविले. इकडे आबदुल आली खदारचा पातशाहा यासहि पत्रे पाठविली की, "नजीबखान व सुज्यातदौला याणी गनिमाची फौज इरेस गुतविली[९०] आहे. तुम्ही थोर थोर मजली करून दिलीस येऊन पोहोचावें. दिली हस्तगत करून गाजुदीखान याचे पारपत्य करून मग चौंकडोन दताजी सिंदे यासी 'गसे होलपट' करून खबर सांगावयास दक्षणेस मनुष्य जाऊ देऊं नये." म्हणोन आबदुल आलीकडे आलमशाहा पातशाहानी दिलीहून पत्र पाठविलें.

---

८३. "नजीबखान यास तुम्हीं पाहून घ्यावें. नजीबखान याचा जावसाल आम्हाकडे नाहीं किंवा रोहिला याशीं सख्य करणें असल्यास आपण स्वस्थ राहावे. त्याचाहि समेट करून देतों." क. व सा. प्र

८४. "व नजीबखान याणें भेटोस यावें जावें. हजार फौज घेऊन यावे." सां. प्र.

८५. 'नजीबखान याची फौज एकीकडे सोडून' सां. व क. प्रत.

८६. या मजकुराचा सा. प्र. तील पाठ असा—'तुम्ही हजार फौजेनिसीं नजीबखान याचे फौजेंतून उभयतां दत्ताजी सिंदे व जनकोजी सिंदे व नारो शंकर व अंताजी माणकेश्वर याचा पुत्र आसे मिळोन भेटावयासी यावें'

८७. 'सवती' सा. प्र.

८८. 'सहा हजार' भाइसं. प्रत.

८९. 'त्यास मृत्यूने ओढिलें. याजमुळें त्यास वासना फितुरीची होऊन' असें वाक्य क. प्र.त आहे.

९०. 'गोन्त्रिली' सगजो. 'इरेस पाडिली' सा. प्र

### ६४. दत्ताजीस सुज्याउदौलाच्या भेटीस जाण्याचें राहविलें : सुजाची जन्मकथा : पन्नास क्रोड रुपयाचे आशेस गुंतविलें

तों इकडे दताजी सिदे क्रोड रुपयेचे आसेस लागून भेटीस पुलावर जावें असा इत्यर्थ जाहाला. मग जनकोजी सिंदे व नारो शंकर, भागीरथीबाई, दताजी सिंदे यांची स्त्री, होती; त्याणी येकातीं जाऊन भीड सोडून जाबसाल केला कीं, "आबदुल आली दुराणी याची फौज च्याळीस हजार आटक उतरून लाहूर प्रांतीं आली. आमची फौज होती तो काही उधलली. काहीं पंजाबांत होती तिची गत काय जाहाली ती समजत नाहीं. हे वर्तमान प्रसिधच ऐकत आहां. दुसरे आमदखान लंगडा पठाण दाहा हजार पंधरा[९१] हजार फौजेनिसीं जमून रोहिला व ते येक विच्यारे[९२] आहेत. सुज्यातदोला हि पनास हजार फौजेनिसी—(त्याची) कुलीहि दैत्याची—व तीनसे तोफा घेऊन पुलावर उतरलाच आहे. नजीबखान वीस हजार फौज व दाहा हाजार पायदळ, प्रत्यक्ष वैईरी, युद्ध करीतच आहे. आसें चोहूकडून जालें पसरले आहे. तुम्ही आपले ऐश्वर्यानें व हिमतीनें व ईरषेनें धुद जाहाला आहा. परंतु आम्हीं मुले—बायकांनीं येथे[९३] दुराणी यास सापडोन मरावें किवा वैरियाचे घरीं कुलंबिणी व्हावे, इतके मात्र उरले आहे. प्रत्यक्ष वैरी नजीबखान याचे फोजेंत पुलावर जाऊन भेटावें ही मसलत, हा मनसोबा, केवळ नेणतें मूल आसेल त्याचे (फार तर) ध्यानांत[९४] न येईल आणि तुम्हास काळाची झापड कसी पडली[९५] हे न कले." असें ऐकून दताजी सिंदे यास परम क्रोध आला आणि बोलता जाहाला की, "जनकोजी बाबा, तुम्हास जिवाची आस्ता आहे, तुम्ही फौजेंत राहावे. आम्ही भेटीस जातों. दैवी आसेल तें होईल." म्हणोन बोलताच जनकोजी सिंदे बोलिले की, "तुम्ही फौजेंत राहावें. आपण भेटीस जातो." म्हणोन गला पडले. मग नारो शंकर माकूल[९६] मनुष्य बोलिला की, "तुम्हास भ्रांती का पडली हें न कले आधीच नजीबखान याचे फौजेत गेल्यावर तो काही प्राणानिसी माधारा येऊं देत नाही. कदाचित् त्याणें हें कर्म न केले तरि पुलावर सुज्यातदौला यासी भेटावयास जाल.[९७] तेव्हां तो केवल मनुष्य नव्हे. प्रत्यक्ष जातीचे[९८] दैत्य व कुळाहि दैत्याचा फौजहि भारी, आग केवल. हा हतीचे मागले पायावर पाय देऊन शेपूट ओढून धरितो तेव्हा हाती जाऊ पावत नाही. तैसेंच भागीरथीसारखी मोठी नदी, [तिचे] मोठे विस्तीर्ण पात्र, ते सुज्यातदौला याणें

---

९१. 'पधरा हजार' हा पाठ सा. प्र. त नाही.

९२. 'एकत्र मतें' सगजो.

९३. या वाक्याबद्दल 'मुलेंबायकांनीं तुरुकहांडीस पडावें' असा सा. प्र. पाठ आहे.

९४. 'मनसबा [ वाईट, असें ] केवल नेणतें मूल असेल त्याचे ध्यानांत येईल असा सा. प्र. पाठ आहे.

९५. 'जनकोजीस ही मसलत औवघड पडली आसे दिसतें. म्हणोन गला पडले' असा भाइसं. पाठ.

९६. 'काबील' सा. प.; 'उमदा मनुष्य, बहुत पाहिलेले आणि शाहाणा' क. प्र.

९७. 'आणिले' भाइसं.; 'आले' पु. प्र.

९८. 'आंगींहि दैत्य' सा प्र.

सहज हात-पोहणीनें आडसांगडीनें[९९] सहज रिकामें जावें यावें.[१००] नदींत बुडी देऊन सुसर ओढून काढावी! उमर तो पहिली पंचविसी, परंतु शक्ति येवढी!" तेव्हां जवळ कोणी ग्रहस्त होते त्यांणीं विचारिलें की, "मनुष्य व्यक्तीमाजी येवढा पराक्रमी व्हावयास कारण काय?" नारो शंकर यांणीं उतर केलें की, मनसूर आली यासी पोटीं पुत्रसंतान नव्हते. म्हणोन येवढें राज्य, केवल दुसरी पातशाई, आसें सुख असतां मनसूर आली केवल पुत्राविना[१०१] [दीन] जाहाला. हळहळ वाटून चितांत योजना केली की, "धिक् जिणें! याहून फकिरी बरी; परन्तु हे जिकीर कामाची नाही." म्हणोन उदास वृत्तीनें आतीत अभ्यागत, फकीर-फुकरा यासी धर्म करून, उदास मानून, फकीर व फुक्रा यांसी द्रव्यदान व वस्त्रदान व आंनदान करून आपण जात्या स्वकर्म उजूतवाज् करून सावध जाहाले. पुत्रउदेशें आयोध्येंत ब्राह्मण व बहिरागी यांस आनुष्ठानास घातलें. ते समई त्याच्या[१०२] दैवयोगें केल्या कर्माचे सार्थक, ईश्वरावर भार झाला. मग त्याचें कुलदैवत 'मक्केहून' 'मेलऊन'[१०३] त्याची रोज-बंदगी करितां येक आवलिया फकीर आला. त्याणें स्वपनी फळ दिलें की, "तूं पुत्राचे उद्देशें श्रमी आहेस. तरी मी तुजला फल देतों. हें आपले स्त्रीस भक्षावयास द्यावें.[१०४] म्हणोन फळ हातीं दिल्हें. आसें स्वप्नांत पाहिले. तों सूर्यउदईं प्रत्यक्ष फकीर आला. त्याणें येऊन फळ दिल्हें; आणि दुवा देता जाहाला, "फल आपले स्त्रीस भक्षावयास देणे. चांगला बलवान पुत्र तुजला होईल." म्हणोन सांगतांच त्यास रात्रीं आधीच स्वपनांत साक्षातकार जाहालाच होता. मग मनसूर आली याणें फल नेऊन स्त्रीस भक्षावयास दिलें आणि बाहेर आला, तो फकीर गैब जाला. मग मी मोहास[१०५] गुंतोन सेवाचोर[१०६] जाहालों" म्हणून खेद बहूतच करिता जाहला. आसो. 'या प्रकारें ईश्वरकृपेचें देणें! फल स्त्रीनें भक्षण करितांच पुत्र जाहला, तोच सुज्यातदौला.' आसे म्हणतांच तेथें कोणी पाखंडी होते त्यांणी उत्तर केलें कीं, "प्रालब्धीं नसतां पुत्र देवानें कोठून दिल्हा? यास प्रमाण भारती आहे की नाहीं?" [त्यांणी उतर केलें कीं,] "भक्ताचे प्रालब्धी पुत्रसंतान नसतां [ईश्वर] नवेंच निर्मून देतो. त्यास सिध्धी असे साक्ष देत[१०७] आहे." त्यांत कोणी कल्पना घेतली कीं "याजकडे भक्तपणाचें कर्म काय? प्रत्यक्ष म्लेंच्छ योनीस जन्म आला, अमंगल तप त्याचे कश्मल[१०८] फल, म्हणोन दिकत घेतली." "तेव्हां नारोपंतांनीं प्रत्योतर केलें की, "भक्तपणा कांही पाहतां यांत लागत नाही.[१०९] दैत्यकुळी भक्त प्रल्हाद जाहला कीं नाहीं? तसेंच राक्षसकुळीं बिभीषण जाहाला की नाहीं? तसें आविंदी

---

९९. 'बिनसांगडीनें' क. प्र.
१००. 'येतो जातो' भाइसं. प्र.
१०१. 'पुत्राविसी' शें. प्र.
१०२. 'त्याचा दैवयोग' भाइसं. प्र.
१०३. सा.शें. व भाइसं. प्रतींत हे शब्द.
१०४ 'देणें' भा. प्र.
१०५. 'लोभास' भाइसं. प्र.
१०६. 'सेवाचाकरी केली नाहीं' भा प्र.
१०७. 'असे सिद्ध आहे, शास्त्र साक्ष देत आहे.' सा. प्र.
१०८. 'त्याचें कसें फल' भाइसं. प्र.
१०९. 'भक्तपणास कांहीं यातायात लागत नाहीं' तं. प्र. (यातबीत म्हणावयाचें आहे.)

मतलबासी[११०] कारण नाहीं. तो केवल नेकजात पुरुष[१११] होता. आसें दुवा दिल्हा त्याचें फल. या योगें करून बल उतकृष्ट प्राप्त जाहालें. आसो. त्याणें दंगा[११२] न करितां सहज दोघांस बगलेस धरून गंगेंत नेऊन बुडविलें तरी त्याचें काय करावें?" आसे बहुत प्रकारे बुधीवाद सांगून, दृष्टान्त देऊन, भेटीची मसलत राहाविली. उमरावगीर गोसावी बाहेर डेरियात होता. त्यास साफ सांगितलें कीं, "आम्हांस पुलावर भेटावयास आनकूल पडत नाही. तुम्हांस भेटीचें आसेल तर तुम्हीं हजार फौजेनिसी नजीबखान याचे फौजेचे आलीकडे यावें. आम्हो इकडून येतों. परस्परें भेटी होतील. हे न घडेल तर तुमची आमची कागदोपत्रीं भेट. इमानप्रमाण करून आमची क्रोड रुपयांची हुंडी उतरोन[११३] द्यावी. तुम्ही मित्रवादे जाऊन आयोधे स्वस्त राहावें. नजीबखान याचा कुमक करूं नये." याप्रमाणें बोलतांच उमरावगीर यास परम विशाद आला. "आम्हो तुम्ही हिंदु आसतां दगादुगा होऊं देऊं आसें नाहीं. हें चितांत काय आणिले?" म्हणोन क्षणभर रदबदली केली. परंतु यांणी खातर न केले, मसलद मोडली. उमरावगीर याणें सुज्यातदौल्यास वर्तमान सांगितलें. तेव्हां तो आपले जागा फिके होऊन राहिले. मागती नजीबखान व नबाब सुज्यातदौला एकत्र होऊन राहिले. मागती नजीबखान व नबाब सुज्यातदौला एकत्र होऊन मसलत केली की, "हा तर मनसोबा राहिला. आता एक करावें. क्रोड रुपयाचे लटके आशेस गोंवून[११४] पाडावें. तों आबदूल आलीहि येऊन पोहोंचत[११५] आहे दुराणी आलियावरी मराठे यांस उठों न द्यावें, बसले जागी मारावें." म्हणोन या प्रकारें मसलत करून 'आज रुपयेची निशा देतों, उद्यां निशा करतों. म्हणोन आशा लाविली.



११०. 'अविधाशी मसलत नाही.'

१११. 'प्राप्त पुरुष' सा. प्र. 'पुण्य पुरुष सगजो.

११२. 'दगा' सा. भा. शे. प्रती.

११३. 'करोन' भाइसं प्र.

११४. 'गुतवून' मं. प्र. 'नेऊन' भाइसं. प्र.

११५. 'दुराणीहि येऊन पोंचेल' सा. प्र.



## प्रकरण सहावें

# ' मरणाहून अपेश वोखटें '

### ६५. अबदली लाहोरास, साबाजी कुरुक्षेत्रांत, दत्ताजीचीं बायकामुलें मिरापुरीं व स्वत: शुक्रतालच्या तळावर

इकडे अबदुल आली लाहूरास पोहोंचला, तों साबाजी सिंदे व संदीपबेग याचा पुत्र यांणीं रान[1] सोडोन कुरुक्षेत्राचे रानांत आले. दताजी सिंदे यांसी पत्रें पाठविलीं कीं, " तुम्ही आजून तेथें कां राहिला ? दुराणी गिलच्याची फौज भारी आली. तुम्ही निघतां[2] तरी उत्तम, नाही तरी तुम्हांस[3] कोणी यमुना उतरूं देणार नाहीं." म्हणोन पत्रें येतांच यास निर्वाण समय भासला. मग डोलियावरील पडल[4] निघतें तैसी गत जाहाली. परंतु द्रव्याचा लोभ सुटेना. फौजेंत मोठीसी खलबल जाहाली. तमाम उंटें घोडी वैरणीमुळें[5] मेलीच होती. त्यांणी उंटें घोडीं घेतली. मग दताजी सिंदे याणीं बुनगी काढन मिरापुरावर[6] तेरा कोसांवर ठेविले आपण सडे फौजेनिसीं तलावर राहिले.

### ६६. गाजुदीखान फितुरी अहमदशहाचा शिरच्छेद करून अंतर्वेदींत दत्ताजीस भेटतो

तों इकडे फितुराची पत्रें दिलीहून आलमशाहा याची सुज्यातदौला यास गेलीं होती. त्याची उत्तरें आलमशाह[7] यांजकडे जात होती तों आकस्मात गाजुदीखान याचे चौकसीस[8] सांपडली. पत्रे वाचून पाहिली तों त्यांत आपला घात व्हावयाचा प्रसंग देखिला.[9] ते समई गाजुदीखान बेलाशक किल्यांत येऊन आलमशाहा[7] याचा सिरछेद करून, दिलींत मुडदा तैसाच टाकून, प्रहररात्र उजाडावयाची आहे तों आगोदरच गाजुदीखान व नागरमल व बहादुरखान बलोच आसे च्यार हजार फौजेनिसी निघोन च्यालीस कोस तिसरे दिवसीं[10] येऊन आंतरवेदींत पोहोंचले. आंतरवेद म्हणावयास हेंच कारण की, यमुना व भागीर्थी या दोहींचे मध्यभागीं कचे च्यालीस[11] कोसाची मर्यादा, या नामे आतरवेद. तेथें गाजुदीखान वजीर सिंदे जेथें होते तेथें येऊन पोहोंचले. तों आडवें यावें जावें याचाहि मान पाहिला नाही. आकस्मात गोटाजवळ येऊन दाखल जाहाले. सुज्यातदौला याजकडील मुसेखान[12] व

---

१. ' जंगल भाइसं. प्र. 'राज्य' १८७९ व १८८६ प्र. 'लाहूर' सा. प्र.

२. 'निघाल' शे. प्र.

३. 'आम्हांस' भाइसं प्र.

४. 'पडल राज्यमदाचें निघालें आसे होऊन जागे जाहालेसारखी गती जाहाली' भाइसं. प्र.; 'पडदे' मं. प्र.; 'पील' भा. प्र.

५. 'वैरणीच्या दुष्काळामुळें' सा. प्र.

६. ' मिरापुरवाले कोशावर ' सा. प्र. 'मिरापुरचे तळापासून तेरा कोश' क. प्र.

७. 'आदमशाहा' असा पाठ आहे. पेद. २७, २४५ व पेद २, १०७ पहा. अलमगीर

८. 'चौकीस' भाइसं. व सा. प्र.

९. 'पाहिला' सा. व भाइसं. प्र.

१०. 'प्रहरीं' सा. प्र.; सगजो. प्र.

११. ' मुलूख एकशेंहेंचाळीस ' सा. व क. प्र.

१२. 'हुसेनखान' सा. प्र.

व गफूरखान व उमरावगीर गोसावी आसे येऊन [सिंदे यांचे डेरियांत] मसलत करितात तों येकायेकींच पाईक[13] येऊन मुजरा केला कीं, "साहेब, वजीर तो आन[14] पोहोंचे." आसें म्हणतांच पाटीलबाबा बाडाच्या बाहेर येऊन पाहतां गाजुदीखान याच्या आंबाऱ्या देवडीस[15] येऊन पोहोंचल्या. दताजी सिंदे यांणीं विस्मय केला कीं, "यांणीं महत्त्व न पाहतां येकायेकींच येवढें निकडीनें यावयासी प्रयोजन काय?" आसें म्हणतात तों वजीर हतीवरून उतरोन दत्ताजी सिंदे यास हातीं धरून तेच क्षणीं येकांतीं जाऊन साफ सांगितलें की, "आवघें हिंदुस्थान फिरलें. आबदुलआलीची फौज[16] पाणिपत कर्नाल रोखे येथें आली. सुज्यातदौला व नजीबखान व आमदखान लंगडा हे पाऊण लक्ष ऐसी हजार फौज घेऊन आहेत. तुम्ही क्रोड रुपयेचे आषेस लागलां आहां, तुम्हांस क्रोड रुपये कोण देतो? [आवघी भूलथाप आहे. आबदुल आलीचा मार्ग लक्षीत आहेत.][17] आता आवघा मनसोबा येकोकडे ठेऊन या समई कूच करून जावें." आसें ऐकतांच सर्वत्रांचे तोंडाचें पाणी पळालें.[18] होणार पुढें, परंतु आजच जाहालें आसें भासलें. कूच करावें आसा निश्चय जाहाला. सांडणीस्वार व पत्रें मल्हारराव होळकर यांजकडे पाठविली की, "तुम्ही जयनगरचा शह सोडोन[19] लौकर येतां तर उत्तम आहे. नाही तर तुमची-आमची पुन्हा भेट होत नाही." म्हणोन निदानची पत्रें पाठविली.

**६७. सुजाचा वकील परत येतो; वकीलहि दत्ताजी वांचले ह्याबद्दल स्वतःस धन्यता घेतो**

तों लाहूराकडून साबाजी सिंदे पळोन आले. तेहि येऊन पोहोंचले. ते समईच उमरावगीर गोसावी यासी सांगितलें की, "आबदुलआलीची फौज नजीक आली. आतां नबाब सुज्यातदौला यास सांगावें की, 'प्रस्तुत आम्ही त्याचे पारिपत्यास जातों. तुम्हांस इमान आमचे आसे, आमचा स्नेह राखणें असल्यास आजचे समई क्रोड रुपयाची चिठ्ठी[20] उतरून देणें, व तुम्ही कूच करून आयोध्येस जावें" म्हणोन बोलोन त्याज समागमे हती व घोडा व सिरपेंच व मोतियांचा तुरा देऊन वस्त्रेंहि दिल्ही· आणि याप्रमाणें सांगितले. ते समई उमरावगीर गोसावी यास उमजलें की, "अविधांनी 'मोंगलाई मसलत' केली होती; परतु दत्ताजी सिंदे भेटीस आले नाहींत म्हणोन उत्तम. नाहीतर आम्हांस जन्माचे आपेश येतें. ईश्वरेंच[21] अरिष्ट वारिले." म्हणोन संतोष पावोन उमरावगीर सुज्यातदौला याजकडे आला. इकडील वर्तमान सविस्तर सांगितलें. ते समई सुज्यातदौला याणें चित्तांत विस्मय केला की, "आशा अरिष्टांतून आजचे समईं दत्ताजी सिंदे निभाऊन चालिले! आमची केली मसलत तसीच राहिली."

---

१३. 'रोहिला' शें. व भाइसं. प्रती.
१४. 'आये चलो' भाइसं.
१५. 'डेऱ्यास' सगजो.
१६. 'दौड' सा. प्र.
१७. कंसांतील मजकूर १८७९, १८८६ प्र. भाइसं. प्रतींत नाहीं.
१८. 'वाळलें' शे. व भा. प्रती; 'आळलें' भाइसं.
१९. 'अति निकडीनें सोडोन' क. प्र.
२०. 'हुंडी' सा. प्र.
२१. 'आम्हांवरील अपेश टाळिलें' क. प्र.

### ६८. दत्ताजीचें सैन्य अबदलीवर : अबदलीच्या सैन्याचा कावा

दुसरे दिवशीं दताजी सिंदे यांनीं कूच करून मजल दरमजल कुंज्यपुरानजीक जाऊन यमुना उतरून आलीकडे आले. तों गिलज्या कुरुक्षेत्रावर आला. याची बातमी कुरुक्षेत्रावर आली. मग दताजी सिंदे यांणी मुलेंमाणसें व बुणगे व जनकोजी सिंदे व गाजुदीखान यांस दिलीकडे वाटेस लाविले. आपण सडे होऊन कोणी येक कुमकेस मिळाले नाहीं तों आबदुल आली गांठावा (व त्याचा रेच मोडून टाकावा[२२]) म्हणोन पाणपतावर गेले. तों तेथून सोळा कोशांवर गिलच्या आहे म्हणोन बातमी आली. दताजी सिदे यांणी तमाम लहानथोर सरदार यास मसलतीस बोलावून सांगितलें कीं, "खदारचा पातशहा आबदुलआली चालोन आला आहे. मी तर पेशवे यांचा बारगीर. माझी काही आबरू विशेष नाहीं. परंतु तुम्ही सर्वत्र राज्यांतील मराठे सरजामी सरदार. तुम्हास 'मरा' म्हणवत नाही.[२३] तरी 'देईन मान व देईन प्राण[२४]' या अर्थी दोहरा[२५] आहे तो सागतो.

मारूं तो मर जाऊंगा, हटू तो जनोकी[२६] लाज ।
ये खुदा परवर दिगार, दोनों कठीण काज[२७] ।।

आसा समय प्राप्त जाहला आहे. त्याचें उत्तर काय? म्हणोन बोलतांच सर्व सरदार नामी व मातबर व कुलीन होते. त्यांणी निसटूर[२८] उत्तर केलें कीं, "पाटील, तुम्ही फौजेचे पाठीवर उभे राहाल तर आम्हीं इरेनें युद्ध करूं. तुम्हीं फौजेस टाकून पुढें जाल तर आम्ही शत्रूवर उठणार नाही. मग जें होणें ते होऊं. आम्ही गलिम जातीचे. पाठीवर काठी उडती तोंच जे होणें तें होईल. नाहीतर आम्ही मराठे, झाडास बाधिले तर झाड घेऊन जावें, हा आमचा स्वभाव. बोलावयाचा मात्र धर्म आहे की, 'जेथें साहेबांचे पाय[२९] पडतील, तेथें आमचे डोसकें पडेल.' परंतु त्याचे वांटेकरी थोडके. नाहीं तर 'जेथें साहेबांचें डोचकें पडेल, तेथें भल्यांचे पायहि[२९] पडणार नाहीत;' आसा विच्यार आहे. त्यांत तुम्ही खावंद आहा. आसें म्हणताच दताजी सिंदे बोलिले की, "तुम्ही ज्या रीतीनें सांगाल त्याप्रमाणें वर्तणूक करूं." म्हणोन बोलून रात्री मुकाम करून राहिले. गिलच्याची बातमी आणविली. तो तेथून कचे

---

२२. कंसांतील मजकूर १८७९, १८८६ व भाइसं. मध्यें नाहीं.

२३ 'मरा म्हटलियास कोणी मरत नाहीं.' सगजो.

२४. 'देय मान देय प्राण' पु. प्र.; 'लेजे दे दान की लेजे दे प्राण' तु. प्र.; 'लेजे दे दान की दीजे प्राण' सा. प्र.; 'लज्य दे दान की लज्य दे प्राण' सगजो.

२५. हा दोहरा शें. प्रतींत नाही.

२६. 'जनकी' पाठांतर.

२७. क. व भाइसं प्रतीत या दोहऱ्याचा अर्थ दिला आहे तो असा-"रणात शूरांस मारूं. नाही तर आपण मरून जाऊं. बच्याऊन माघारे येऊं हा भरंवसा नाहीं. अगर समरांगणी पळून जाऊं तर सर्व लोक निंदा करितील. तोंड जनास कसें दाखवावें म्हणोन. श्री भगवंतास प्रार्थना ही कीं, दोनी कर्मे कठीण. यांतून कसें पार पाडशील. असा समय प्राप्त जाहला आहे."

२८. 'निरोतर' सा. शें. सगजो.

२९. 'पायपोस' सा. प्र.

वीस कोसांवर आबदुलआली येऊन पोहोंचला. ही बातमी येतांच सिदे यांणीं पुढें हारोळीस फौज जिवाजी भोईटे व नाईकजी भोईटे व गोविंदपंत बुदेल व अंताजी माणकेश्वर यांचा पुत्र पधरा हजार फौजेनिशी पुढें रवाना केलें. त्यांणी जाऊन सोला कोसांवर दुराणी यास गांठिलें. परंतु ईश्वराचें कर्तव्य, गलिमाचा विनाशकाल. नाहीं तरी दुराणी लोक पके मर्द नवते. याची गांठ पडताच आबदालीनें कूर्मवत फौजेचें आकर्षण करून गोल बांधून कुंजपुरियाचा रस्ता सोडून, कमाऊचे[३०] पहाडाचे सुमारें यमुनातीरीं आडचण होती तिकडे तडाखा पळूं लागले. तेव्हां पुढें हारोलीस गेले होते त्याणीं चितांत योजना केली कीं, "दुराणी केवळ नामर्द[३१] आम्हांस भिऊन तडाखा पलतो. दत्ताजी मागेंच आहेत तों आपण घोडें घालून येवढें यश घ्यावें."[३२] म्हणोन मोठी कडनिकड माडिली. नजीबखान[३३] आबदुलआली यास न मिले पावेतों युद्ध करावें म्हणोन मनसोबा केला.

**६९. त्र्यंबक बापूजीच्या उघड्या आलेल्या पथकास दत्ताजींचा देकार**

तों इकडे दताजी सिदे याणी प्रातःकालीं उठोन, फौजेस ताकीद केली आणि शंख वाजविला आणि शिगें वाजविली. सेला, भाला आणि अनीन तंग सिध्ध करून, आगांत बक्तरें व चिलखतें, टोप, पेटचा, जिरे दस्ताने, टोपास बिन्या, दंडास बावन बिरदें वगैरे निसीं सिध होऊन गोटाबाहेर निघाले. तों आकस्मात पंज्याब प्रांतीं त्रिबक बापूजीचें पथक गेले होते ते दुराणीनें बुडऊन तमाम मनुष्याचा बंद धरून भोंवताली राखणदार ठेविले. सायंकाली आदशेर आन्न द्यावें, आगावर वस्त्र नाहीं. परंतु ते समई त्यांणी जीवदान देऊन सोडिले हेच आधिकोतर. त्याणी पंजाबची संपदा मिळविली होती ती जाऊन दैवहत[३४] जाहाले. जसें स्वप्नी दरिद्री राजा होतो आणि जाग्रत होतांच चरणसंपुष्ट[३५] आणावयाचें संकट पडतें. तसी गत जाहाली. असो. त्यांनीं जीव जगविले हेच मिळविलें. कुरुक्षेत्राचे तल्यावरून जगदोधारास गेले. त्यांसमागमे पांच गिलचे देऊन रवाना केले. ते दोन आडीच हजार माणूस नागवे उघडे, केवल मोठे मोठे सरदार होते. ते ओलखू येईनात; आसे आवस्तेनें[३६] आले. तों याणी तल सोडून बाहेर युध्यास जावे म्हणोन ठिकाणाबाहेर निघाले, तों ते पुढें नागवे उघडे घायाल आले. ते वेलेस सर्वत्राचे मुखावरील पाणी उतरलें. माहा आपशकून, आसी सर्वत्रांची कल्पना जाहाली. दत्ताजी सिंदे यांस वाईट वाटलें.[३७] परंतु मागती विवेक केला की, "ज्या ज्या काली जें जें होणार होणें तें होतच आहे." म्हणोन दोन घटिका घोड्यावरून उतरोन सर्वत्रांस भेटून, त्यांचें समाधान

---

३०. 'लाहुराच्या' भाइसं. सगजो. भा. प्रती.

३१. 'च्योकल चाकल' (?) भाइसं.; 'पोकल' मं. व भा. प्रती.

३२. 'संपादावें' मं. प्र.

३३. 'नजोबखान यास मिळाला नाहीं तों सा. प्र.

३४. 'दरिद्री' भाइसं. प्र.; 'धनविरहित' भा. प्र.

३५. 'तृणकाष्ट' सा. प्र.;

३६. हे लोक पांचशें होते असें रा. खं. १।१४६ मध्यें आहे.

३७. 'भासलें' भाइसं. प्र.

करून, खांशास पोशाख व लहान मनुष्यांस दोन दोन वस्त्रें सरसकट पनास रुपये खर्चास देऊन आपण घोडयावर स्वार जाहाले. सिदे केवल खजानपूर[३८] सरदार, द्रव्यवान होते. त्यांस कांही द्रव्याची परवा नाहीं. आसो

**७०. बुंदेले व भोइटे यांच्या सैनिकांच्या नाकाशिरांचा अबदलीनें चौथरा केला**

पुढें गेले तों गिलच्या जाऊन यमुनातीरी आडचणीत येकीकडून पालवे[३९] व शेरणीची बेटें व पाणीयाची झील आसे आडचणीत उतरले. गिलच्यानें जातेक्षणीच हतीवर व उंटावर झडत पडत बुनगे नदीपार केले. आपण सडे पंचवीस हजार फौज व पांवसातशें उंटावरील सुतरनाला व पांचच्यारशे उंटावरील बाणांच्या कैच्या व जिलीबीतील हलक्या तोफा पनास ऐसा जमून उभा राहिला होता. तों दत्ताजी सिंदे यांचे फौजेचा घुरला द्रष्टीस पडों लागला. ते समईं नाईकजी भोईटे व जिवाजी भोईटे व गोविदपंत बुंदेले यांणीं आपण येश घ्यावें म्हणोन त्या अडचणीत शिरोन घोडीं घातली. ते समई आबदुलआली याणें हुशारी करून सुतरनालाचे व बाणांचे उंट बसवून तोफांचा व सुतरनालेयांचा व बाणांचा येकदाच मार केला. तों पुढे होणार भवितव्य. भोईटे व बुदेले यांचे द्रष्टीस काय पडले हें न कळे! येवढे पराक्रमी होते; परंतु त्यांच्या पोटात हरणाची कालजी सिरली आणि निशाणें माघारी फिरऊन तडाखा पळों लागले. त्यांचे मागें फौजहि भरधाव पळों लागली. बापास पुत्र व पुत्रास बाप पुढें उभे राहीनात, तेथें दुसरें कोण राहतो ? आसा पळ सुटला. तेव्हां गिलचा पाठीस लागोन, तमाम जसा कुणबी विल्यानें शालवाचे पीक कापितो त्याप्रमाणें गलिमाचे लोकांचीं सिरें कापू लागला. गिलचे केवल बेहोष, येका शरिराचे[४०] तीन भाग याप्रमाणें आवस्ता केल्या. येकानें पुढे डोचकें कापावें, येकानें मागें सैती मारावी व डोचकें कापून न्यावें, तें सरकारात रुजू करावें. त्याणें इनाम दर सिरास पांच रुपये घेऊन येकानें नाक कापावें. आशा येक शरीराच्या[४१] तीन आवस्ता करून येका क्षणांत आडीच हजार खाशाची सिरें छेदिलीं! दुराणी व गलीम सरमिसल जाहाले आणि पलत येतात तो दत्ताजी सिदे फौजेसुद्धा जाऊन[४२] पोहोंचले. येवढे सिंदे आंगे मर्द व हमेशा लढती असता, ज्या फौजेने मारवाडो राठोड हटविले आणि येकदिल, आसी फोज आसतां, पुढील सोहाळा पाहून केवल दिपतात तैसे दिपोन दत्ताजी सिंदे वगैरे उभे राहिले. तोंडें काली खापरासारखीं दिसों लागलीं. लोकांची इरेश्री उतरली. आगे दत्ताजी सिदे उभे राहिले; परंतु त्याची कुमक करविली नाही. दत्ताजी सिंदे तोंड करतात तों इकडे फौजेचे सेले तोडापुढे[४२] येईत

३८. 'खजिन्यानें पुरे' मं. प्र.;

३९. 'पाल' शें. व भा. प्र.; 'पाने' सा. प्र.; 'पाणी' शें. प्रत.

४०. 'सिराचे' भाइसं. प्र.

४१. 'घेऊन' सा. प्र.

४२. 'दत्ताजी सिंदे इकडे तोंड करताना इकडील फौजेचे तोडासन्मुख सेले फिरविले, इकडोल फौज इकडे येत अशी तु. प्र.; 'दत्ताजी बाबा वोढ करून पुढें त्यांजवर जाण्याची हिमत करीत. परंतु शेल्याचे सोगे डोळयावर पुढें येत आणि दुसरीकडे तोंड करून पाहात तों हिकडील सोगे तोंडापुढें येत.' क. व सां प्र.

आणि फिरोन दुसरीकडे तोंड करीत तों इकडील सोगे तोंडापुढें येईत. आसी आपले जागीं गडबड जाहाली; परंतु कुमक करविली नाहीं. त्यांणीं आपले स्वइछें-करून सिरें कापून दुराणी आपले लष्करांत निघोन गेले. तमाम सिरांचीं नाकें कापून डेरियापुढें कलवड जसा गोव-यांचा उडअ,[४३] त्याप्रमाणें काल-चावडींतील चौथरा घातला. आडीच हजार लोकांचीं डोचकीं[४४] कांहीं थोडीं नव्हेत! आसो.

### ७१. अबदलीस मिळालेली हिंदुस्थानची फौज

दत्ताजी सिंदे तिसरे[४५] प्रहरपर्यंत तेथें उभे राहून, माघारे फिरोन पुलानजीक उतरले. आबदुल आली सडा होता. तो आगदीच नदीपार गेला. दुसरे दिवसीं दुराणी यांणी (?) ताबडतोब नजीबखान यासी मिरापुरचे तलावर [ जाऊन ] मिलाला. तिकडून सुज्यातउदोलाहि पनास हजार फौज व तीनसें तोफा भागीरथीपार उतरून आलीकडे आला व आनूपशहराहून आमदखान लंगडा पठाण दाहा हजार फौजेनिसी येऊन मिळाला. आसी येक लक्ष चाळीस हजार फौज येक जागां मिलाली.

### ७२. दत्ताजी दु:खित : गनिमी काव्यानें लढणार

इकडे दुसरे दिवसी दत्ताजी सिंदे या ीं कूच करून दुराणीचे तलावर आले, तों सिरांचा गंज पाहिला. आणि डोल्यास पाणी आणिलें. येक क्षणांत पंधरा हजार फौजेंतील निवडक मनुष्य गेलें. ओळख्या कोणी द्रष्टीस पडेनासा जाहाला. फौजेंत मोठा प्रलय. फोजेंत जिकडे तिकडे रुदंती जाहाली. मोठा प्रलय. क्षणभर तेथें उभे राहून सोमाजीबाबा भोंसले फलटनांत राहात होते, ते केवल साधु मनुष्य होते, त्यांणीं ते दिवसीं क्षणभर क्षत्रिय धर्म केला. परंतु विनाशकाल! त्यांचेंहि सीर कापून नेलें होतें. मोठ्या प्रयासें त्यांचें धड मात्र हुडकून काढिले त्या धडास आग्नप्रसाद दिल्हा. मोठी मजल करून बाहदरगडाचे नजीक बुणगे व जनकोजी सिंदे यांची गांठ घातली. तेथून मजल दरमजल तिसरे दिवसीं दिलीचेनजीक मजमूचे टिल्या-नजीक[४६] मुकाम करून राहिले. किल्यातून गाजुदीनखान वजीर आला आणि "आम्हीं कोठें राहावें?" म्हणोन विच्यारलें. तेव्हा दत्ताजी सिदे यांणी सांगितलें की, "तुम्ही स्वस्थ राहावें. दुराणी नामर्द, त्याच्याने आमचें काय होणें आहे? आम्ही गनिमी काव्यानें राहातों. तोंपावेतों मल्हारराव [होळकरहि येऊन पोहोंचतात[४७]] यांचीं पत्रें आलीं आहेत. त्यांणीं या उद्देशें जयनगरचा शह सोडून येतात. तेहि येक दोन दिवसांत येऊन पोहोंचतील." आसें त्यांचें समाधान करून त्यास किल्यांत जावयास सांगितलें. आपण स्वस्थ राहिले.

---

४३. 'हुडव' मं. प्र.; 'उडव्या' शें. प्र.
४४. 'नाकें' सगजो.
४५. 'तीन प्रहर रात्रपर्यंत' क. प्र.
४६. 'मजूचे टेकडीवर' सगजो.; 'यमुनेचे कडेवर' क. प्र.
४७. कंसांतील मजकूर १८७९, १८८६ व भाइस. प्रतींत नाहीं. पृ. ६४

## ७३. दत्ताजी बायकामुलांना चमेलीपार जाण्यास सांगतात

ते समईं भागीरथीबाई यांनीं नारो शंकर यांस सांगन पाठविले की, "आजपावेतों आमचा साह्य काल होता.[४८] आसाध्य कर्म तें साध्य होत होतें, आतां जी गोष्ट योजावी ती त्रिपर्यास होते. प्रस्तुत सर्व हिंदुस्थान येक जाहालें. दीड लक्ष फौजेची गणती दुराणी व आवघेहि झाडून जमले आहेत. तुम्हापासीं पन्नास हजार फौजेची गणती नाहीं. पाटील तों दुराग्रहास प्रवर्तले. 'आपण मरावें आणि जग बुडवावें' आसा त्रिच्यार घडला आहे. तुम्ही मरावें आणि आम्हीं तुरुकधाडीस[४९] पडावें आसेंच आमचें प्रालब्धीं ईश्वरें योजिलें होतें म्हणोन ईश्वरें आम्हांस जलमादारभ्य[५०] या रानांत आणिले. तुम्हीं पाटील यांस विवेक करून सांगावें" म्हणून सांगून पाठविले. ते समई नारो शंकर यांचीहि मुलेंमाणसें समागमें होतीं. त्यांणी चितांत योजना[५१] केलीच होती कीं, "सर्वत्र मिलोन पाटीलबावांस सांगोन पाहूं." मग नारो शंकर व जानराव वांबले व गोविंदपंत बुंदेले व जनकोजी सिंदे [असे] येकत्र होऊन दताजी सिंदे यास त्रिव मिलून साफच जाबसाल केला कीं, "तुम्हीं मरावयास सिध्ध जाहाला;[५२] परंतु मुलें-लेकरानी पाप काय केलें? याजकरितां आपण सडे या स्थलीं राहून बुणगे व कबिले चमेलीपार लावून द्यावे, मग तुमचे दैवी असेल तें घडेल." म्हणोन ऐकतांच दताजी सिंदे यांस विषाद येऊन बोलते जाहाले कीं, "नाना, तुम्ही काय समजोन हा आर्थ बोलिला? आम्हांसहि पुरतेपणें समजलें आहे की, आमचे आयुष्याचा अन्त जाहाला. मग मुलेंमाणसें जगून काय करावीं? कोणीं आपण तरावें व जग तारावें, कोणी आपण बुडावें व जग[५३] बुडवावें. मुलेंमाणसांची शाका करून हातीस आंदू घालून मारतां मारतां मरावें. मरणाहून आपेश वोखटें.[५४] आपजय घेऊन नानासाहेब व भाऊसाहेब यांस तोंड काय दाखवावें? म्हणोन आतां हला करावा[५५] हाच निछय, याहून दुसरी कल्पनाच नाहीं." आसें ऐकोन नारो शंकर यांणीं उतर केलें कीं, "पाटील, तुम्ही बोलिलां हें पुऊंन घ्यालच यांत संदेह नाहीं. तुम्ही बोलिला हें कराल; परंतु मुलेंमाणसें मारवत नाहीत. हें कर्म येक-दोन वेळां शाका[५६] मंडलियाचे राजयानें केल्या आणि हिंदुस्थानांत बुंदेकोटियाचे राजे हाडे रजपूत

---

४८, 'होता काळ होता' सा. प्र.

४९. 'तूर्त धाडोस' भा. प्र.; 'तुरक बंदीस' सा. प्र. पृ. ६४ पहा.

५०. 'या जन्मांत या रानांत' मं. प्र.

५१. 'विवंचना' सगजो.

५२. 'तुम्ही मरावयास उदार जाहालां परंतु मुलांमाणसांचीं काय वाट? त्यांणीं काय पातक केलें आहे कीं, असते आयुष्यांत प्राण द्यावा? आयुष्याची मर्यादा जाहालियावर ठीकच आहे, मग कोणाचाच उपाय नाहीं. आज त्यांचे धाडीस पडतील." क. प्र. 'ते तुरुकधाडीस पडतील' शें प्र.; 'ते तूर्त बिडोस पडात्रे' सगजो.

५३. 'कोणी आप तरावें आणि जग तारावें; कोणी आप बुडावें व जग बुडवावे' सा. प्र.

५४. 'आपेश वाईट' भाइसं प्र.;

५५. 'मरावें' पाठभेद.

५६. 'सोळा मंडळी यांणीं' मं. व भाइसं. प्रती. त्यापुढें भाइसं. प्रतीचा पाठ आहे तो असा "या रानींच केले ते दिवस ते वेलेस तसेच गुदरले आणि हिंदुस्थानांत धुंदी केली."

यांणींच ही कर्मं करावीं. मराठियांस मायाजाल सुटत नाहीं. या गोष्टी घडणार नाहींत. तुम्ही वाटेस लावाल तर उतम; नाहींतर आम्ही आपलीं मुलेंमाणसें वाटेस लावतों." म्हणोन आपले डेरियास आले. दताजी सिंदे उठोन बाडांत स्त्री भागीरथीबाई यांजकडे गेले. त्याचे चितांतील काळली घ्यानांत आणिली, तों त्याचे चितांतहि निघतां उतम. त्यांत भागीरथीबाई गरोदर, नऊ[५७] महिने पूर्ण भरत आले होते. मग दताजी सिंदे यांणीं चितांत योजना केली कीं, "पोटीं पुत्र नाहीं[५८] स्त्री गरोदर आहे, तेव्हां वाटेस लावितां उतम आहे." म्हणोन बाहेर येऊन जनकोजी सिंदे यांस बोलाऊन सांगितलें कीं, "बुणगे, मुलेंमाणसें घेऊन तुम्ही चमेलीपार व्हावें आणि आम्ही येथें राहून जें होईल तसें पाहून घेऊं" आसें आईकतांच जनकोजी सिंदे यांणीं जाबसाल केला की, "काकासाहेब, तुम्ही राहतां आणि मीं जाऊन काय करावें? मजकडून ह्या गोष्टी घडावयाच्या नाहींत. तुम्ही मुलेंमाणसें पाठवितां तर उत्तम आहे. नाहीं-तरी आम्ही आग्रह करीत नाहीं." आसा (जनकोजीचा) राहावयाचा दुराग्रह ऐकोन दताजी सिदे याणीं डेरियात येऊन मुलामाणसांस च्यार गोष्टी विवेकाच्या सांगितल्या. त्याजवर त्या समईं बाइकांचा शोक, ज्याप्रमाणें मनुष्य मरतें, त्या प्रकारचा जाहाला. भागीरथीबाईस आसें जाहालें कीं, "पाटील आजच आपणांस आंतरले. भगवंतें आजच आमची तोडातोड केली." म्हणोन बहुत प्रकारें शोक केला. आगदी बुणगे व मुलेंमाणसें यांस पोचवावयास दहा हजार फौज समागमें व सुरजमल जाट याजकडील वकील रूपराम कटारी यास समागमें देऊन वाटेस लाविलीं. तेथून हुलकाबाजे (स)[५९] बारा कोस बुणगे जाऊन पोहोंचले.



५७. हें विधान सर्वस्वीं बरोबर नाहीं.

५८. 'आपणांस पुत्र संतान नाहीं.'

५९. 'फरकाबादेनजीक' सा. प्र.



# प्रकरण सातवें

# ‘ बचेंगे तो औरबी लढेंगे ’

## ७४. पाटील दत्ताजी शिंदे ह्यांचा लढण्याचा निश्चय

तों तेच दिवशीं आबदुल अली दुराणी व सुज्यातदौला व नजीबखान रोहिला व आमदखान लंगडा व कुतुबशहा व दुंदेखान रोहिला आसे यमुनेपलीकडे ‘शाहाधडा’ म्हणोन मोठा पुरा होता, ती आंतरवेदीची उतरती पेठ (ती पेठ) व पंचगण,[1] आसे दोन पुरे मिळोन आर्धी दिल्ली होईल, ते दोनी पुरे मारून त्यांचा सत्यानाश केला. येक लक्ष चालीस हजार फौज होती. पौष शु० १४ स संक्रांतीची भोगी होती. ते दिवशीं यमुनातीरीं दुराणीचा मुकाम जाहाला. यमुनेचे आलीकडील तीरीं गलीम पाणी पीत होते व पलीकडील तीरीं दुराणी पाणी पीत होते. दोनी सैन्यें येकमेकांनीं पुर्तेपणें पाहिली. तों सिंदे यांजकडील फौज भारी पाहोन (दुराणी) फारच संकटांत पडले. ते दिवसीं दत्ताजी सिंदे यांणी दिलीसमीप राजघाट होता. तेथें हाती घालून यमुनेस ठाव पाहिला. तों ठाव लागला नाहीं. तसेंच मजमूचे टिळिया-नजीक[2] घाट होता त्याच्याहि नजीक जाऊन ठाव पाहिला. तों तेथेंहि ठाव नाही. तों केवळ सायंकाल जाहाला. रात्रीचे रात्र आपलाले जागा. पहिले[3] प्रहर रात्र उरली. मग दत्ताजी सिंदे यांणीं जानराव वांबले यांसी नजीक घाट होता तेथें घाट राखा-वयास जावें, म्हणोन सांगून पाठविला. [4]मालोजी सिंदे म्हणोन बरा उमदा[5] मनुष्य होता, तो हजार फौजेनिसीं दिलीनजीक राजघाट होता तेथें घाटावर त्यास पाठविला. दिवस उगवला. समागमें नामी पाच सात हती व सडे बुणगे व तीन[6] लक्ष रुपये समागमें होते. त्यांत हती नामी जव्हेरगज[7] व पटागज व कृष्णगज व रामबाण आसे च्यार हती आमोल्य. त्यांजवर महातहि थोर, आवरूचे. चौघास खडी ताजीम होत होती. त्यांस दत्ताजी सिंदे यांणी ताकीद केली की, “यार हो ! निदान समय येऊन पडला[8] आहे. आमचे आबरूवर आलें आहे. आमचे मनांत आहे कीं, “निदान समई हतीस आंदू घालून लढावें.” आसें माहातांनी ऐकून उतर केलें की, “रावसाहेब, आम्ही बहूत दिवस तुमचें अन्न भक्षिलें आहे. येक

---

१. ‘पटपंचगण’ सा. प्र.; ‘पचगण’ आसे तीन पुरे मारून सत्यानाश केला भाइसं. प्र.

२. ‘यमुनेचे कडेनजीक’ भाइसं. प्र.

३. ‘पहाटेची रात्र प्रहर उरली’ सा. प्र.

४. ‘वाल्होजी’ तु. व सगजो.; ‘मल्हारराव’ भा. शें. सा. व क. प्रती.

५. ‘उमराव’ भाइस. प्र.

६. ‘दोन’ सगजो.

७. जवाहीर; पटावर, आपबाप, व रास-वाव’ अशीं हत्तीची नावें सगजो. प्रत देते. ‘जवाहीरगज, पोटागज, रामवाण, मदन-मस्त कृष्णगज; त्यांत चार हती बहूत थोर’ क. प्र

८. ‘वालखादग’ ‘वाजखादान’ (?) पु. व तु. प्रत.

वेळ आपण इरे सोडू नये.' आमचा प्राणान्त समय आला आहे. आम्ही कांहीं वांचत नाहीं." आसें ऐकून येकमेकानी निरवानिरव करून समागमें हतीवर घटकाहि वाजत होती. तीन घटका दिवस आला तों तमाम फौज जेऊन खाऊन, तिलगूल वांटून, जीन सामान सिद्ध करून बसलेच होते. तो आबदुल आलीची फौज व तोफखाना सिध्ध होऊन काही राजगडचे घांटें चालिले व कांही मजमूचे टिळि-याचे[१०] घाटे व कांहीं रेवा[११] डीचे घाटें चालिले. इतकियांत किल्यांतून गाजुदीखान वजीर आला. तो दताजी सिंदे यांस बोलतां जाहला कीं, "तुम्हीं[१२] गलीम आहा, तुम्ही घाट धरले, ते (अशास) ही मोगलांचीं कर्मे. त्यांणी घाट धरले [णें], तेव्हां आपलेकडील लोकास घाट धरणें होणार नाहीं. तुम्ही घाट सोडून दुरोन गनिमी काव्यानें राहाल तर आम्ही किला राखतों; किंवा तुम्हापासी राहतों." आसें म्हणतांच दताजी सिंदे यांणी सांगितलें की, "तुम्ही बिनघोरी किल्यात जावें. आम्ही आज कांही घाट धरून झुज करीत नाही." असें सांगून वाटेस लाविलें.

### ७५. बयाजी सिंदे याचें अबदली–सैन्याशीं यमुनाकांठीं युद्ध व मरण

तो दुराणियाची फौज व तोफा[१३] पलीकडील तीरी येऊन दाखल जाहाल्या. गलिमाचा काल आनकूल नाही, प्रतिकूल जाहला; म्हणोन यमुनेनें घाट त्यास दिल्ही. पलीकडील[१४] तोफांचा मार जाहला. तेव्हां जानराव वांबल्यांचा घाटावर दम निवेनासा जाहला. उटावरील सुतरनाला व हतीवरील हस्तनाला पुढें घालून मागें फौज तडाखा उतरूं लागले तों पाच घटका दिवस आला होता. इतकियांत जानराव वांबले याजकडील स्वार धावत आला की, "पाटीलबाबा, तुम्ही काय म्हणोन स्वस्थ बसलां? दुराणीची फौज आधी यमुनापार जाहाली[१५]. आम्हांस घाटावर ठरूं[१६] देत नाही. तोफानी शंभर-दीडशे मनुष्यें ठार जाहाली." आसे वर्तमान ऐकतांच दताजी सिंदे याजपासी साबाजी सिंदे याचा पुत्र बयाजी सिंदे बसले होते. त्यांस आज्ञा केली की, 'बयाजीबाबा, तुम्ही जानराव वांबले याची कुमक

---

९. "आपण हें रण सोडून निघालां तर" सा. प्र. 'आपण इरेस पडला, त्यापेक्षा आमचे प्राण वाचत नाहीत. परंतु प्राणाची आशा धरून आज्ञा उल्लंघन करून आम्ही तोंडें मागें फिरवणार नाही." सां. प्र. येथें संहितेंत घेतलेला पाठ क. भाइसं. भा. वगैरे प्रतीत आहे.

१०. हा पाठ भाइसं. प्रतात नाही.

११. 'चमेलीचे घाटे' हा पाठ सा. व सगजो. प्रतीत आहे. 'रेवाडीचे घाटे' हा पाठ भाइसं., धो., सां. व क. प्रतीत आहे.

१२. या वाक्याबद्दल पाठ आहेत ते असे—"तुम्ही गनीम आहां. तुम्ही घाट धरले. ते हीं कर्मे मोंगलांचीं. तुम्हांस घाट बांधणे सोसणार नाही. तुम्ही घाट सोडून दुरून गलिमी काव्याने रहाल तर आम्ही किला राखतों" सा. व सगजो प्रत. शेवटच्या वाक्याबद्दल शे. प्रत चा पाठ असा—'गलिमी काव्याने राहिला तरी ठीक नाही.' भाइस प्रतीचा पाठ असा—'त्याणी घाट धरिले तेव्हा आपलेकडील लोकास धरणें होणार नाही. तुम्ही घाट सोडून दुरोन गलीम कोठे राहिला तरी ठीक नाही. आम्ही किला राखतों."

१३. 'दिलीकडील' शे. व भाइसं प्रती

१४. 'आलीकडील' भाइसं. प्र.

१५. 'उतरली' सा. व सगजो.

१६. 'येऊं' भाइसं. प्र.

करावी." असा हुकूम होतांच बयाजी सिंदे यांणीं उठोन तसलीम केली आणि जाबसाल केला कीं, "पाटीलसाहेब, आम्ही लाहूराहून आलों [तें] गिलच्यासीं युद्ध न करून पलून आलों[१७] म्हणोन आपल्या चितांत सौंषय आला होता. चालीस हजार फौज दुराणीची. [त्या] फौजेपुढें आम्ही च्यार[१८] हजारांनीं काय करावें ? आस्तु. आतांहि प्रसंग आहे. खावंदहि जवल आहेत. बहुत दिवस साहेबाचें निमक भक्षिलें आहे. शेवा घडेल ती रूबरू[१९] द्रष्टीनें पाहावी." आसें म्हणतांच दताजी सिंदे यांणीं प्रत्योतर केलें की, "बयाजीबाबा, तुम्ही हमेशा लढाया करितां. नव्यानें झुंज करीत नाहो. केलियाचें नवल नाही, न केलियाचें मात्र नवल. आतां बोलावयास फुरसत[२०] नाहीं, त्वरा करावी." म्हणोन बोलिले. बयाजी सिंदे यांणी पांच-सात हजार फौज घेऊन[२१] नदीची झील उतरोन घाटास गेले. तों दुराणी वगैरे फौज अलीकडील तीरीं[२२] निम्मी आली. ते समई बयाजीबावा याणीं चितांत योजना केली की, "दुराणीची फौज तों नदी उतरली. आतां दताजी सिंदे यांस तोंड काय दाखवावें ? म्हणोन पांच-सात हजार फौजेतून पंधरा खाशांनिसीं बयाजी सिंदे यांणी घोडे घातले[२३] त्यांणीं त्यांजवर घाव घातला. तों बयाजी सिदे यांस गोली लागोन ठार जाहाले. आर्धा मुर्दा वाळवेंत आणि आर्धा पाण्यांत पडला. त्यासमागमें दाहा मनुष्यें ठार पडली. गलिमाचे फौजेनें आगदींच घाट सोडिला.[२४] रोहिले व दुराणी यांणीं घाट घेऊन आलीकडील बाजूस उभे राहिले. तोंपर्यंत दताजी सिंदे यांचा दुराणीस धाक सलाबत होती

**७६. मालोजी सिंदे यांचा राजघाट-युद्धांत मृत्यु : दत्ताजीचें क्षत्रिय-धर्म-प्रतिपादन**

इकडे बयाजी सिंदे यांजकडील स्वार धांवत आला आणि दताजी सिंदे यांसी बोलिला कीं, "पाटीलबाबा, बयाजी सिंदे ठार पडले. मुर्दा त्यांणीं नेला आणि घाट घेऊन फौज जमून पुढें उभी आहे." आसें ऐकतांच नगारा करून दताजी सिंदे घोड्यावर स्वार जाहाले. तों फौज आगोदरच सिद्ध होती. जनकोजी सिंदे यांणीं आंगांत बखतर घातलें. दताजी सिंदे यांणीं रागास येऊन आंगांतील सामान काढविलें.[२५] आणि बोलिले कीं, "आज कांही आम्ही युद्ध करीत नाहीं. मल्हारराव होळकर नजीक आले आहेत. ते येक दोन दिवसीं येऊन पोहोंचणार, तोंपावेतों काव्यानेंच दुरून राहावें." म्हणोन आपण घोड्यावर स्वार जाहाले. घाटाचे सुमारें चालिले,

---

१७. 'युद्धप्रसंग न करतां चुकावून आलों.' सा. प्र. बयाजी सिंदे हा साबाजीचा पुत्र.

१८. 'दाहा हजार' सा. प्र.

१९. 'उरुबुरु' सगजो.; 'रुबेरुब' पु. प्र.

२०. 'पुरवत' सा. प्र.

२१. 'यमुना उतरोन' भाइसं. प्र.

२२. 'तों दुराणीची फौज आलीकडील तोंडीं आली. सा. प्र. आलीकडील तीरानजीक' सगजो.

२३. 'उठवून दुराणीचे लोकांवर घोडे घातले' सा. प्र. हा पाठ १८७९, १८८६ व भाइसं. प्रतींत नाहीं.

२४. 'गलिमाचे फौजेनें आघाडी घाट सोडून दिल्हे' सगजो. प्र.

२५. 'काढिले' भाइसं. प्र.

तों फौज जमून मुजऱ्यास आली. मुजरा करितांच[२६] आज्ञा केली कीं, "निशाणाबरोबर चालावें." आसें सांगोन फौज निशाणाबरोबर लाविली. तों यमुनातीरीं आडचण भारी. शेरणीची बेटें[२७] होतीं, तीं दिसेनात, आशा आडचणींत शिरले. *मराठियांस पाठीवर काठी उडत[२८] आसली तरी हिंमत होत नाहीं.[२९] त्यांस दवयोगें करून दडणें (स)[३०] शे ीची बेटे सांपडली. वीरश्रीची कोणाची शरम कोणास नाही. तों निशाणें जाऊन युद्धास तटली. ते समईं दोनी तरफानें तोफा व हस्तनाले व सुतरनाले व जेजाला व गंजिफियांच्या गाड्या व रेहेकले व गरनाल वगैरे गारभांडी व बंदुखाची मारगिरी गिलच्यांनी केली; कीं, जैसे भडबुजे लाह्या भाजतात, कीं, विद्युलतापात होतो, तसा येक धडाका जाहाला; मोठी गरदी जाहाली. बाणाचा वर्षाव परजन्यधारांप्रमाणें[३१] जाहाला. घोडीं माणसें धुद जाहालीं. कोणी कोणास वोलखीनासा जाहाला.[३२] मोठे मोठे वीर, त्यांच्या वीरश्रिया उतरल्या. आलीकडे मराठे यांणी झुंज याप्रमाणें पाहिलें नाहीं. 'न भूतो न भविष्यति' आसी गरदी जाहाली. त्याप्रसंगी जे आसतील त्यांस मात्र तो आनुभव ठाऊक आसेल. चौहूंकडून धडाका येकसारिखा दोन घटकांपर्यंत होत होता. तेथून दोन कोशावर घाट होता. तेथें गोविंदपंत बुंदेले होते. तिकडून त्यांणी यमुना उतरून परस्परें मार ऐकून रानभरी[३३] जहाले. यांजकडे यावयास फुरसत जाहाली नाही. पांचसातसें खाशियांची डोचकीं कापून न्हेलीं. तसेंच दिलो राजघाटावर मालोजी सिंदे (होते) तेहि घाटावरून उधळून शाहाधड्यानजीक घाट उतरून, बाणाचे खास्तीवर आले. तिकडूनहि फौजा आल्या. मालोजी सिंदे यांची फौज झाडून त्यांसीं पोटासी सांपडली. त्याजमुलें ज्यांचें आयुष्य सरलें नाहीं[३४] तें मात्र निभाऊन आले. खांसा मालोजी सिंदे बाणाच्या खास्तीनें[३५] निघाले होते. त्याणी चितांत योजना केली कीं, "दताजी सिंदे आम्हांदेखतां बहुताबहुतांचो टीका करितात. आतां आम्हीं त्यांस तोंड काय म्हणोन दाखवावें?' म्हणोन त्याणीं घोडे घातले.[३६] हे त्यांतच गैरबात जाहाले. त्यांचा मुरदा कोणी दृष्टीनें देखिला नाही. इकडे दत्ताजी सिंदे यांजकडे तुबल युद्ध होतच होतें. निशाणापाशीं पांचशेंहि[३७] स्वार नाहीत. त्यांत आधींच मराठा फौज;

---

२६. 'मजुरा करीत त्यांस आज्ञा करीत कीं, तुम्हीं निशाणाबरोबर चालावें.' तुं. प्र.

२७. 'का (मा) ऊस व शेरण्यांचो बेटें' तुं. प्र.

२८. 'पडत' सगजो.

२९. 'पाठीवर काठी उडत आसली तरी हिंमत होते.' सा. प्र.

३०. 'दडण भारी' सा. प्र.

३१. 'मेघमालांप्रमाणें' सा. व सगजो प्रत.

३२. 'तेणेंकरून कोणी कोणास दिसेसे जाहाले' असा पाठ सा. प्र. मध्यें आहे; परंतु तो १८७९ व १८८६ सां. मध्यें नाहीं.

३३. 'गोविंदपंत बुंदेले यांस तिकडेच ताण बसविला.' सा. प्र.

३४. आयुष्य पुरतें ते मात्र वांचले, सा. प्र.

३५. 'खास्तीनें खालीं होतें.' भाइसं. प्र.

३६. 'असें मनांत आणून घोडा उठवून दुराणीचे लोकांवर जाऊन पडले' क. प्र.

३७. 'फौज' सा. व सगजो; 'पांच हजार स्वार' शें. प्र.

हिंमत पकी[३८] नाहीं. त्यांत आडचण होती. त्या योगेंकडून आडचणींत फौज गैबत जाहाली. चालीस हजार फौज; थोडी न्हवे. परंतु आडचणींतच; कांहीं दिसेनासें जाहालें. इकडे निशाणाकडे जनकोजी सिंदे झोंबतच[३९] होते. दताजी सिंदे निशाणाचे बाजूस उजवेकडे होते. दिलीचे बाजूस उजवेकडे पंचवीस खासे व आपण उभे होते. गिलच्यास त्यांची दहशत होतीच. फौज भारी.[४०] परंतु हिंमत धरून बेलाशक आंगावर कोणी येईनात. परस्पर झोटधरणी होतच होती. हतीवरील घटका वाजत होती. आठ घटका पूर्ण भरल्या.[४१] त्याच आडचणीत पांचशें मनुष्यें ठार जाहाले. तैसी घोडींहि पडली. तसेच जखमीहि जाहाले. केवल शेणसडा होऊन गेला ! ते समई जवल तानाजी खराडा म्हणोन सरदार होता. त्यांणें आर्ज केला की, "पाटीलबावा, दुराणीची फौज झाडून उतरली. गोविंदपंत बुंदेल तों तिकडेच बुडविले. तसेंच मालोजी सिंदे यांचा ठिकाण नाही. निशाण उघडें पडले. आबरू जाणेचा प्रसंग. निशाण काढतां उत्तम आहे." आसें म्हणतांच दताजी सिंदे यांणी उतर केले की, "आप मेला जग बुडाले. आबरू जाते आणि वांचतो कोण ? आजून निघावयाची काय बाकी राहिली आहे ? सफेजंगी[४२] होऊन गेली, आता निशाण काढाल तर फौज पळू लागेल. मग मग म्यांहि पलावे ? मग देशी तोंड मीं दत्ताजीनें काय म्हणोन दाखवावें ? आसें बोलिल्यावर तानाजी खराडे मागती बोलिले की, "पूर्वींपासून देव, दैत्य, दानव काय करीत आले ? त्यांत आम्ही मृत्युलोकीचीं माणसें पडलों. आल्या वेळेस मान द्यावा. या समईं काळावर नजर देऊन निघावें." म्हणोन बोलिल्यावर दत्ताजी सिंदे यांणीं साफ सांगितलें कीं, "हा खंदारचा पातशाहा आबदुल आली चालोन आला आहे. या रानांत ईश्वरें मृत्यु आणिला तरी उतम आहे. योगी, संन्यासी, तपस्वी नाना प्रकारचें देहदंडण करितात कीं, मोक्षसाधन व्हावें. त्यांत आम्हां क्षत्रियां स्वधर्म[४३] हाच कीं रणांत विनमुख होऊं नये[४४] म्हणोन सर्व साधनें साधिलीं. तेंहि कर्म ईश्वरें दाटून वोढून[४५] आणिलें. आशांत कोणी आभाग्य आसेल तो विनमुख होईल. रण सोडून निघाल्यास दोंहीसहि मुकावें; इकडे नर्कसाधन, इकडे आपेश; मरणाहून[४६] वोखटें; यांत मरतांच उत्तम." म्हणोन गाडून[४७] उभे राहिले.

---

३८. 'भारी' सा. प्र.

३९. 'झटतच' सा. प्र. टीप.

४०. 'धास्त' सा. प्र.

४१. 'जाहाल्या' पाठभेद. 'आठ घटका दिवस आला.' क. प्र.

४२. 'सबगहा' सगजो.

४३. 'स्वकर्म हेंच कीं' तुं. प्र.

४४. 'रणांत विन्मुख न होतां मृत्यु आल्यास' सा. प्र.; 'रणांत सन्मुख मृत्यु आल्यास' सा. प्र. टीप.

४५. 'चालून' भाइसं. प्र.

४६. 'इकडे आपेश मरणाहून निंद्य' सगजो.

४७. 'गांठून' तुं. प्र.; 'मनाचा खंबीर करून' क. प्र.

**७७. पाटील दत्ताजी सिंदे यांचें वीरमरण व वीरवचन**

तों इकडे जनकोजी सिंदे निशाणापासीं झोंबत होते. त्यांचे उजवे दंडास येकायेकीं गोली लागोन दंड मोडला, हाड बाहेर आलें. जनकोजी सिंदे यांस कलम[४८] येऊन घोडयाखाली आले. तों जवळ खिजमतगार उभा होता. तो धांवत दत्ताजी सिंदे यांजकडे आला आणि घाबरेपणें वर्तमान सांगितलें की, "बाबासाहेब गोळी लागोन पडले." आसें वर्तमान ऐकताच दत्ताजी सिंदे याणीं जवळ लोक उभे होते त्यांस बोलिले को, "बाबा आम्हांस सोडून गेले. आतां आम्हांस देशी तोंड दाखवावयाचें कारण नाहीं. रणांत मृत्यु आला तर उतम[४९] आहे; नाही तर विष खाऊन प्राण द्यावा." आसें बोलोन दत्ताजी सिंदे यांजपुढें दाहा[५०] हजार कुतुबशाहा व दुराणीचे लोक उभे होते, त्याजवर अठरा असामीनीं[५१] घोडीं घातलीं. घोडयांचीं[५२] तोंडें सिरतात तों आकरा खासे ठार पडले. जात्या खाशांनीं घाव केला. निघावयास जागा नाहीं. तेथून माघारे गोळियाचे मान्यांत निघाले. तों यशवंतराव जगदाळे थोराळकर[५३] यांस गोली लागोन ठार पडले. त्यांचा भाऊ पिराजी जगदाळाहि समागमेंच होता. त्याणें भावाचे मुर्द्यासाठी बहुत प्रेत्न, काढावा म्हणोन केला. पाटील यांणीं लालमणी[५४] घोडयाचें तोंड किंचित माघारें फिरऊन 'मुडदा ओढा ओढा[५५] म्हणोन बोलतात तों येकायेकींच ये (आ) कागाची दोरी तुटली, तसी गोली बगलेस बरगडीस[५६] लागोन (दत्ताजी पाटील) घोडीखाली आले. तों नजीक तानाजी[५७] व राजाराम चोपदार व राघोबा शेणवी पागनीस जवल होते. त्यांणीं इत्यर्थ केला की, "बहुत दिवस यांचें आन्न भक्षिलें आणि पाहिजे तितके विलास[५८] यांच्या जिवावर केले. आतां यांस टाकोन जावें याहून मरण बरें." म्हणोन घोडयावरून उतरले. तों [दत्ताजी] घायाल होते, प्राण कांहीं गेला नवता घायाल काढावा तरी त्यांजकडील फौजेनें निकड बसविली. घायाल काढावयास फुरसत[५९] नाही. तों नजीबखान रोहिला याचा गुरु कुतुबशाहा आंबारीत बसोन आला. त्यास राघोबा पागनीस, राजाराम चोपदार[६०] यास

---

४८. 'तव' सा. प्र.; ('तवई' सगजो. = घेरी, भोवळ, मूर्छा, कळ; कलमलणें.

४९. या सर्व वाक्याबद्दल भाइसं. प्रतीत 'मरावें' एवढाच शब्द आहे.

५०. हा शब्द शें. व भाइसं. प्रतींत नाहीं.

५१. 'असामीनिसीं' सा. प्र.

५२. "त्यांचे फळींत घोडयांचीं तोंडें फिरतात तों अकरा असामी ठार पडले. खाशास निघावयास जागा नाहीं. तेथून गोलीचे टप्यावर फळींतून पार पडून निघाले" असा क. प्रतीचा पाठ

५३. 'थोराळेकर' सा. प्र.

५४. 'कल्याणी' असेंहि वाचतां येईल.

५५. 'वोलखावा' भाइसं. प्र.

५६. दत्ताजीस गोळी कोठें लागली? 'मानेवर' रा. खं. १, १६५; नुरुद्दिन म्हणतो 'डोळयांत.' ऐ. प. पृ. ४५२; बखर 'बरगडीस'.

५७. तानाजी खराडयाचें नाव भाइसं. शें., क., सां. वगैरे प्रतीत आहे. सा. प्र. देत नाही.

५८. 'सुख' भाइसं प्र.

५९. 'फुरसत पडेनासी जाली' सा. प्र.

६०. 'राजाराम चोपदार याचें नांव कागदोपत्रीं सांपडतें' असें ग्वाल्हेरीहून श्री. फाळके कळवितात.

म्हणाला कीं, "तुम्हीं कुतुबशाहा याजपावेतों जावें आणि 'दताजी सिंदे घायाल रणांत' म्हणोन सांगावें कीं, तुम्ही यांचा बचाव करावा. नाहीं तरी आबदुल आली दुराणी हरामी याची गांठ पडली तरी आमचीं व पाटील यांचीं सिरें कापून नेतील, त्यापेक्षां त्याजकडे पाडाव सांपडले तरी उत्तम." म्हणून राजाराम चोपदार यास पाठविला. तों कुतुबशाहाची आंबारी जवल नजीक आली. त्यांस राजाराम चोपदार याणें मुजरा केला. रात्रंदिवस येणेंजाणें सहजच होतें. ओलख पूर्वींचीच होती. तेव्हां त्याणें पुसिलें कीं, "राजाराम तुम उदर काहां ?"[६१] म्हणोन अविंधी भाषेनें पुसलें. त्याणेहि खरें वर्तमान सांगितलें कीं, "साहेब, पटेल घायाल पडा है, या बचावे.' आसें म्हणतांच कुतुबशाहास बहुत आनंद जाहाला. इक्षुदंडांतूनच शर्करा सांपडते किवा[६२] ऊधस् (कासे)—तच नवनीत सांपडतें, तैसा आनायासें करून लाभ जाहाला; आणि बोलिला कीं, "पटेल कहाँ है ? दिखलाव." म्हणोन तैसेच आंबारीसुद्धां राजाराम याणें जेथें दताजी सिंदे घायाल पडले होते तेथें आले. अंबारीतून उतरून जवळ आला.[६३] तों दताजी सिदे उताणे पडले होते तेथें कुतुबशाहा याणें जाबसाल केला की, "पटेल हमारे साथ तुम और लढेंगे ?[६४] म्हणोन पुसलें. दताजी सिदे सावध होते. त्यांस पुर्तें उमजलें की, हें कांहीं आपणांस वांचवीत नाहींत. मग व्यंग गोष्टी सांगणें हे विहित नव्हे." म्हणोन दम बांधोन जाबसाल केला कीं, "[इन]शा अला ताला ! बचेंगे तो और भी लढेंगे." आसें ऐकतांच कुतुबशाहा याणें कमरेचा सुरा काढोन, लाथेनें ढकलून, पाल्था घालून, दताजी सिंदे यांचा सिरच्छेद केला. राघोबा पागे व राजाराम चोपदार यांणीं बहूत ग्लानता केली कीं, "साहेब, इसको बचाव करना, क्रोड रुपये पाहिजे तर देऊं." म्हणोन बोलिले. परंतु यांणीं न ऐकून आपलें महत्कार्य साधलें. तों आठ घटिका दिवस आला होता. तों कुतुबशाहा याणें सीर भाल्यास टोंचून[६५] साहादानें वाजवीत जाते जाहाले. फते जाहाले म्हणोन नजीबखान याजकडे वर्तमान गेलें. तो कुतुबशाहाहि जाऊन पोहोंचला. आणि सीर त्यांणीं काढून रुमालांत घातलें.

---

६१. 'राजाराम तुम कहो' सगजो. 'तुम्ही उपर कहाँ ?" भाइसं. प्र. 'तुम उदर कहाँ ?' शें. प्र. 'तूं कहाँ ?' साने प्र. याच्यापुढें क. प्र. चा असा पाठ आहे. "कुतुबशाहास बोलिला कीं, तुम्ही उपकारी आहां म्हणून अविंधी भाषेनें नेकजात पुरुष आहां. याजकरितां तुम्हांकडे आलों."

६२. 'दुधांतून नवनीत' यापेक्षां कासेंतून दूधाच्या ऐवजीं नवनीतच एकदम येणें. ऊधस्=कांस. 'ऊधसींच' मोडींतील चुकीचें वाचन तुपगीच झालें.

६३. या वाक्याऐवजीं सां. प्रतीचा पाठ असा. 'कुतुबशाहा अंबारींतून दत्ताजी सिंदे यास बोलिला कीं, पाटील आमचे अंबारीचे पुढें बसावें,' शत्रूस शरण जावयाचे नाहीं म्हणन दत्ताजीनें उत्तर केलें कीं, 'यांतून वांचलों तरी तुमचे अंबारीपुढें बसीन.'

६४ 'पटेल तुम आगे बैटंगे' भाइसं. व भा. प्रति. 'पटेल, हमारे पास अंबारीके आगे बैठना म्हणून बोलला.' क. प्र.

६५. 'खोऊन' सा व सगजो प्रती. 'ठेऊन' मं. प्र. 'जोडून' शें. प्र.

प्रकरण आठवें

# जनकोजी शिंदे यांचा कोटपुतळीस ससैन्य पळ

### ७८. घायाळ जनकोजी सिंद्यांचा अबदली-सैन्यानें केलेला पाठलाग

तों इकडे, दताजी सिंदे घायाळ खालीं[1] आले. त्यांजवल[2] त्यांचेखालील लालमणी[3] घोडा होता. तो तानाजी खराडे[4] याणी घेऊन निशाणाकडे आले. तों निशाणापासी लोक बहुत करून झोंबत होते. ते समईं निशाणाजवळ दोन-चार सरदार होते. त्यांस तानाजी खराडे यानें जाबसाल केला कीं, "यार हो, आतां निशाण* काढावें. नाहींतर[5] निशाण निघत नाही." लोकानीं जाबसाल केला कीं, "निशाण येथें आहे म्हणोन दम पडला आहे. निशाण निघालियावर कोणी कोणाचे द्रष्टीस पडणार नाही." असें ऐकोन तानाजी खराडे[6] याणीं साफ सांगितलें कीं, "तुम्ही कोणाचे भिस्तीवर झुंजता! दताजी सिंदे तों रणीं पडले!! जनकोजी सिंदेहि पडले म्हणोन ऐकतों; मग त्यांची गत काय जाहाली असेल ती असो. प्रस्तुत दताजी सिंदे यांजखालील घोडा लालमणी, हा आम्हीं आणिला" म्हणोन प्रत्यक्ष दाखवितांच लोकांनी अवसानें सोडिलीं; आणि दम खातखात निशाण§ आडचणींत झील उतरून मइदानांत आले;[7] तों जनकोजी सिंदे यांसी घायाळच घोडीवर घातले. तों झाडून फौज झुरेमुग्रेनें[8] बाहेर मइदानांत आली[9]. दुराणी व रोहिला पाठीवरच आला. पांच हती व सडे बुणगे‡ खासे, वरकड[10] लोकांकडील हती अठरा[10], वरकड सारे बुणगे तळावर[11] उभे होते. त्यांत सदी [प] बेग याची मुलें बुणगियासमागमें होतीं; परंतु त्याचा दिवाण लक्ष्मीनारायण व पांच हजार फौज तळावर[11] उभी होती. त्यांजवर चहोंकडून दुराणी याची व रोहिले याची मिठी बसली[12]. मग भले[13] लोकानी एकदांच घोड्यांस चाबूक लाविले.[14] तीस हजार फौज आर्धकोसपर्यंत ताफाच्या ताफा[15] एकदांच आरडाओरडा जाहला. कोणी कोणास पुसेनासे जाहालें.

---

१. हा शब्द भाइसं. मध्यें नाहीं.

२. हा शब्द सा. १९२२ मध्यें नाहीं.

३. 'घोडी पंचकल्याणी पुठचावर डागिली होती. तिचें नांव कलमणी' सा १९२२. कल्याणीचें चुकीचें वाचन कलमणी, लालमणी.

४. खंडेराव भाइसं. प्र. [निशाण

*शेषचिन्हांकित जरीपटका. सिंदे—

५. मग शें. प्रत.

६. सिंदे भाइसं. प्रत.

§ लहान खणखणीत, चर्मवाद्य.

७. आणिले शें.

८. झुरूनमुरून मं.; झुरमरून भा. झुरेमुरें सा. झुमरून शें. = सरासरी जीव धरून, झुरतपडत. मोठ्या कष्टानें.

९. येथे तों पाईचे लोक' हे तीन शब्द भाइसंमध्ये असून 'रोहिला' हा शब्द सा. व सगजो. प्रतीत आहे. सा. १९२२ मध्यें 'पाईचे लोक' हे नाहीं. = पायदळ.

‡सैन्यांतील गैरलढाऊ लोक.

१०. हे चार शब्द सा. १९२२ मध्यें नाहीत; भाइसं. मध्यें आहेत.

११. तटावर भाइसं.

१२. बसली सा. १९२२

१३. पथक-प्रमुख; सरदार.

१४. केले सा. १९२२.

१५. तोफामुळें भाइसं.

बाप लेक भाऊ एकमेकास उभे राहिनात. दे माय* धरणी ठाय, असा प्रकार गिलच्यानें केला. ते समयीं येसाजी भोइटे व जानराव वांबले याणी निकड[१६] करून जनकोजी सिंदे यांस घोडचावर बसवून दोन्ही बाजूस[१७] धरून फौज तडक पळू लागली. घायाळ याणी 'पाणी' म्हटल्यास पाणी द्यावयास दम निघेना. एवढा तालेवार याचा दवयोग या रीतीनें! असो. गिलच्या पाठीवर चढोन[१८] डोचकी कापीत चालिला. भला मनुष्य याची कोणी कुमक[१९] करीनात.

**७९. लक्ष्मीनारायण–लाहोरचे सुभे–यांची फौज लढून गारद; जव्हारगज–हत्तीचा पराक्रम; पण तोहि कैद.**

इतकियांत इकडे तळावर बुणगे व लक्ष्मीनारायण व हत्ती होते. त्यांजवर मिठी येऊन पडली. ते समयी हतीवरोल माहात आबरूचे होते. त्याणी क्षणभर फौजेंत रणखंदल[२०] करून मारामार केली. तों महात यास मानेस गोळा लागोन खाली येताच हत्ती मोकळा जाहाला. तों ते त्यांजकडे सहजच हस्तगत जाहाले. त्यात येक बडेखान महात याणे जव्हारगज म्हणोन बरा नामी हती जलद व मर्द होता, तो दोन कोसपर्यंत काढिला.[२१] तळावर सडे बुणगे व हती व अंबारी व खजिना निघू पावला नाही. ती तळावरच लुटली. बहुतकरून मनुष्य व खिसमतगार व पालखीचे भोई याचा सिरछेद जाहला[२२]. कोणी[२३] दैवयोगेंकरून थोडके वांचले असतील[२३]. लक्ष्मीनारायण लाहूरचा सुभा[२४] तळावर होता त्याणीं गलिमाची कीर्ति ऐकत होतें. गनिमांनी पलावें, मागती उलटून[२५] घोडे घालावें, म्हणोन ऐकत होते. त्याजवरून लक्ष्मीनारायण आपले लोकांस[२६] सांगत की, "यार हो भागो मत; मराठियाचें गलिमी काम आहे[२७]; सारे जमले म्हणजे माघारे उलटतात; ते आता येतील; मारू, मारू;[२७] म्हणोन त्यांणी क्षणभर तट घालून मारामार केली. त्याची जमा[२८] थोडी. मराठे यांणीं पुरताच[२९] कावा केला असे.[३०] लक्ष्मीनारायण[३१] याची फौज तलावर मारामार करून खतल जाहाले. पांचशे[३२] फौज

---

*साने १९२२ मध्यें हें नाही.

१६. कडनिकड सा. १९२२ प्रतीत.

१७. येथे 'सावरून' हा शब्द भाइसं. मध्यें आहे; सा. २२ मध्यें नाहीं.

१८. हा शब्द भाइसं. मध्यें आहे.—चढ करून, चालून जाऊन.

१९. हुकूम मानीनात क. प्रत.

२०. रणखुंदल सा. १९२२.

२१. 'होता' असा शब्द सा. २२ मध्यें अधिक आहे.

२२. केले असा पाठ सा. २२मध्यें आहे.

२३. हें वाक्य भाइसं. मध्यें नाहीं.

२४. सूभा हा शब्द भाइसं. मध्यें नाहीं.

२५. उठून भाइसं.

२६. वरचेवर सांगत कीं, हे शब्द सा. १९२२ मध्यें आहेत.

२७. 'अब सायतमें उलट आन पोचतात. मारो मारो. अब सायतमें उलटे' हें वरील ऐवजीं सा. १९२२ प्रतींत आहे. साजत-सायत म्हणजे तास, घटका.

२८. 'जमा थोडी' बदल 'जड काय' सा. १९२२ प्रत.

२९. गनिमी हा शब्द सा. १९२२ प्रतींत अधिक आहे.

३०. असो. शें. प्र.; असे भाइसं.

३१. 'दंगा होऊन,' असें लक्ष्मीनारायण ह्या जागीं सा. २२ प्रतींत आहे.

३२. मग लक्ष्मीनारायण पांचशें खाशांनिशीं सा. १९२२.

पांच हजारांत याची उरली. तों गनिमांचा धुरळा द्रष्टीस पडेनासा जाहाला. पांचशें खाशांनिसी दोन कोसांवर जव्हरगज[३३] हती निवाला होता. दुराणीची मिठी भारी बसली होती. मराठे हती सोडून चालिले. बडेखान महात बोलिला की, "यार हो, तुम्ही दम खात निघावें. या वेळपर्यंत येथवर आणिले आतां निभावून नेणें." म्हणोन बहुतप्रकारें सांगितलें. परंतु मराठे मनुष्य पळूं लागलियावर कोणाची इरा* कोणास नाहींशी जाहाली.[३४] जें रांडेनें[३५]§ सावलें हुसकलें तरी बारा गांव पळणार.[३६] तेथें हतीची गत काय? खासा जनकोजी सिंदे येवढा सरदार घायाल 'पाणी पाणी' म्हणोन बोलत; प तु वाटेनें कोणी दम धरून पाणी पाजीनात. तेथें हती कोण जिनस! मग बडेखान माहात याणें जाबसाल केला की, 'यार हो, तुम्ही तों दम खात नाही. परंतु क्षणभर उभे राहून माझा तरी तमाशा पहावा." म्हणोन मागें फौज दुराणीची होती. त्यांत हती चालवून क्षणभर मारामार केली.[३७] मग त्यांणीं भाले लावून हती व माहात पाडाव करून चालविला.

**८०. जनकोजीबरोबर गाजुदीखान वजिराचाहि पळ**

इकडे सिंदे याची गत ही[३८] जाली; तों दिलीचे किल्यांत गाजुदीखान वजीर होता; त्याणी किला टाकून कालिका भवानीकडून तडक पळून पाच सात कोसांवर जनकोजी सिंदे यांची फौज गांठिली. तोहि त्याचे समागमें पळूं लागला. असो. दुराणीची[३९] तीस हजार फौज गनिमाचे पाठीलागास गेली. लहानथोर सात-आठ हजार मनुष्याचीं सिरें कापून नेलीं.

**८१. नजीबखानाकडून दत्ताजी सिंदे यांचें शिर अबदलीस नजर**

इकडे दताजी सिंदे यांचे तळावर दुराणी व रोहिला व सुजायतदौला व अहमदखान लंगडा पठाण व कुतुबशाहा आसे येऊन उभे राहिले. तों नजिबखान याणें दताजी सिंदे याचें सीर अंबारीत[४०] घालून अबदुलअली दुराणी याजकडे आला. अंबारीस अंबारी तटली. अंबारींतूनच नजीबखान याणे कुरनिस करून हातावर रुमाल घेऊन वर डोचकें ठेऊन[४१] पुढें केलें. आणि अर्ज केला कीं, "पादशाहा अलमपन्हा साहेब, सदाकत नजर असो" म्हणोन शीर पुढें ठेविलें.[४२] ते समयीं पातशाहाचा आनंद आति उत्कृष्ट जाहाला.[४३] शाहाजणें वाजवून 'शहाका बोलबाला'

---

३३. हती सा. प्रत १९२२.

*(ईर्षा) आस्था; पर्वा.

§ हलक्या प्रतीचें लुगडें. 'स्तेन भले, न स्त्रीचा नग्न करुनि हरुनि सावलें काय'। मोरोपंत. सोवलें. शें. पळतील सा.

३४. होते सा. २२

३५. हुसकटलें सा. १९२२.

३६. येथें 'असें हवालदिल जाहाले' हें वाक्य सा. १९२२ मध्यें आहे.

§ पराक्रम.

३७. शेंपन्नास दुराणी ठार पाडिले. सा.

३८. 'कसी' भाइसं. 'असी' शें.

३९. हा शब्द भाइसं. मध्यें नसून सा. मध्यें आहे.

४०. येथें 'रुमालांत' शब्द भाइसं. मध्यें व 'अंबारींत' शब्द सा. मध्यें नाहीं.

४१. ४२. 'पुढें आला' आणि 'शिर पुढें ठेविलें' हें सा. मध्यें अधिक आहे.

४३. 'जाहाला' हा शब्द सा. मध्य नाहीं.

म्हणोन येकच[४४] आरोळी आली. अबदुलअली दुराणी व नजीबखान परम खुशाल होऊन, रोहिला याचा बहुमान हती व घोडे दिल्हे. जवळ येऊन[४५] पाठ थोपटली या प्रकारें गौरव केला.

**८२. राजाराम चोपदार व उमरावगीर गोसावी यांच्या मध्यस्थीनें दत्ताजीचें यथाविधि दहन**

[तदनंतर राजाराम चोपदार, जिवानिशीं जगोन गेला होता, त्याणें नजीबखान यास अर्ज केला की, "दताजी सिंदे याचें शिर कापून आणिलें.[४६] जें जाहालें तें प्रारब्धानुसार जाहालें. तुम्ही आपला[४७] धर्म करावा तो केला. आतां, हिदु धर्म आहे. शीर ठेविलियांत नफा नाहीं. उमरावगीर गोसावी याजपासीं बहुत मराठे आहेत. धड सीर एकत्र करून त्यांचें सार्थक करतील"[४८] या प्रकारें बोलिला. तो नजीबखान मान्य करीना. मग राजाराम चोपदार, उमरावगीर गोसावी याजकडे जाऊन अर्ज केला कीं, "तुमचा हिंदुधर्म आहे. दक्षिणचा सुभा दताजी सिंदे यांचें सीर अविधांनीं[४९] नेलें तें उमरावगीर गोसावी[५०] याणीं सोडविलें एवढें भूषण ईश्वर तुम्हांस[५१] देईल;[५२] आणि सीरधड येकत्र करून आग्नप्रसाद दिल्हा तर दक्षण देशापर्यंत तुमची कीर्ति होईल. ईश्वरबलेंकरून घर पुसत येश आणिलें तरी[५३] पदरीं घेणें." तों उमरावगीर गोसावी याणें चितांत[५४] आणिलें की, 'सायास केल्यानें हें घडून येणार नाहीं' म्हणोन उमरावगीर गोसावी, सुजायतदौला याजकडे येऊन अर्ज केला कीं, "साहेब, आमचा हिंदुधर्म[५५] आहे. त्यास आम्ही साहेबाचे पदरीं आसतां दताजी सिंदे याचें देहेसार्थक न होय तरी आम्ही पदरी राहिल्याचें सार्थक नाहीं." असें ऐकतांच सुजातदवला नजीबखान याजकडे जाऊन दताजी सिंदे याचें सीर मागितलें. त्याणीं उतर केलें कीं, "आम्ही सीर आबदल आली पातशाहा यास नजर केलें. आम्हांस मागतां येत नाहीं. तुम्हीं परस्परें पादशहास अर्ज करून कलेल त्या रीतीनें सीर मागून घ्यावें." हें ऐकोन सुजातदवला यासहि संकटच जाहालें आणि नजीबखान यासी बोलिला कीं, 'माझा बाप मनसूर आली पूर्वीं गनिमाचे पेंचांत आला ते समयीं मनसूर आलीनें आपली दाढी राणोजी सिंदे याचे हातीं दिल्ही कीं, 'इची

---

४४. 'उल्हासाची' हा अधिक शब्द सा. मध्यें आहे. हारोली असाहि पाठ आहे.

४५. आणून सा. व सगजो. प्रतींत आहे.

४६. 'असा. त्यांचें' असे शब्द सा. व सगजो. प्र. मध्यें आहेत.

४७. 'जो वाघ-मान करावा तो करून घेतला.' पु. तुं. प्रत 'बोध,' 'धर्म' हे शब्द सां व धो. क. प्रतींत आहेत.

४८. 'मी करीन' भाइसं. प्र.

४९. 'कापून' सगजो प्र.

५०. 'येथें असतां त्याचा सद्विर्योग होऊं नये हें चांगलें नाहीं. तरी' ऐवढें अधिक वाक्य सा. मध्यें आहे.

५१. आम्हांस भाइसं. प्रत.

५२. देत आहे सा. प्रत.

५३. हे तीन शब्द सगजो. व सा. मधील, व त्याऐवजीं 'तसें होईल' हें भाइसं. मध्यें आहे.

५४. 'प्रत्ययास आलें' असें सा. व सगजो. प्रतींत आहे.

५५. स्वधर्म सा. प्रत.

शरम राखावी' असें बोलिलियावर राणोजी सिंदे याणीं आबरू रक्षून गंगापार करून दिल्हें. त्या तागाईत राज्य तिकडील[५६] खाऊन आम्ही सुखरूप आहों. त्या राणोजी सिंदे याचा पुत्र दताजी सिंदे. वरकड आवघी बेमानी आम्हाकडून घडली. परंतु[५७] एवढें[५८] तरी उत्तीर्ण व्हावें." म्हणोन आबदल आलीपासी जाऊन स्वत:[५९] रदबदली केली.[६०] तें समयीं पातशाहा याणीं दोन[६१] लक्ष रुपये मागितले. ते समयीं उमरावगीर गोसावी यांणीं दोन लक्ष रुपयांची निशा करून सीर आपलेपाशीं घेतलें. डेरियास येऊन दताजी सिंदे याचें धड आणिलें आणि आपणाकडील मराठे होते त्यांस आणून साहित्य उत्तम प्रकारें करून चंदन-काष्ठें व बेलकाष्ठें व तुळशीकाष्ठें मेळवून[६२] यथाविधियुक्त यमुनातीरीं दहन केलें. तीन[६३] हजार रुपये धर्म[६४] केला.[६५] असो.

## ८३. जनकोजी व चुलती भागीरथीबाई

इकडे दिलीचा किला सहजच खालीं होता. त्यांणीं[६६] घेऊन आलीकडे येऊन मुकाम केला. तों इकडे जनकोजी सिंदे घायाळ भग्न फौजेनिसी पळत असतां आठरा कोसपर्यंत गिलचे यांणी पाठिलाग केला. मग दुराणी मावारे फिरून गेले. जनकोजी सिंदे यांस घोडियावर बसावयास अवसान पुरेनासें जालें. मग[६७] खेडियांतील खाटलें काढून, खाटल्यावर निजऊन चालविलें. इतकियांत दुराणी याणें गडबड केली. खाटलें भुईस उतरावयास फुरसत पडली नाहीं. तेव्हां उभियानेंच खाटलें टाकिलें. जनकोजी सिंदे जखमी भारी. शरिरास परम दु:ख जाहालें. मागती घोड्यावर खाटलेंसुद्धां[६८] घालून तीनचार कोशपरियंत निघोन[६९] आले. सायंकाल जाहाला.[७०] दुराणी[७१] निघोन माघारे गेले. नजीबखान यानें मोठें यश मिळविलें. इकडे सिंदे यांचे बुणगे व कबिले चोवीस कोसांवर उतरले होते. त्यांत जनकोजी सिंदे तीन प्रहर रात्रीं दाखल जाले. तों बुणगे आधीच तयार होऊन निघाले होते. वाटेनें लोकांस जनकोजी सिंदे पुसत कीं, 'काकासाहेबांची गत काय जाहाली?' लोकांनीं दत्ताजी सिंदे पुढें गेले म्हणोन चाळवीत चाळवीत बुणगियांत आले. कचेरीचे डेऱ्यानजीक बाडापुढें खाटलें उतरलें. तों रामजीपंत दिवाण व रूपराम कटारी धांवत आले. त्यांजसमागमें पांचसात मशालीहि होत्या. जनकोजी सिंदे येईत तोंपावेतों बायकांस दताजी सिंदे यांची आवस्था कळली नव्हती. बाडांत वर्तमान कळतांच

५६. हा शब्द भाइसं. मधील.
५७. हा शब्द सा. प्रतींतील.
५८. उत्तीर्णता तुं. वरील पाठ पु. व भाइसं. व क. प्रतींतील आहे.
५९. 'सक्त' भाइसं. व तुं. प्रत.
६०. 'करून' शिर मागितलें सा.
६१. तीन पु. व सां. प्रत.
६२. आणून भाइसं.
६३. पांच हजार सां. प्र.
६४. दान सा. प्रत.
६५. 'खैरातहि वांटली' सा. 'अस्थी काशीस पाठविल्या' सां. प्र.
६६. येथें 'किला' शब्द अधिक सा.
६७. 'पालख्यांच्या जागीं पालख्या राहिल्या.' सा. प्रतींतील वाक्य.
६८. हा शब्द भाइसं. प्रतीमधील.
६९. 'निघाले' सा. प्रत.
७०. ह्या शब्दापुढें 'दुराणीचे काहीं हस्तगत जाले नाहींत.' क. प्रतींतील शब्द.
७१. 'हि झाडून' सा.

भागीरथीबाई व जनकोजी सिंदे यांची स्त्री कासीबाई अशीं उभयतां मराष्ट्र[७२] धर्म विसरून धांवत बाडाचे बाहेर आलो. तों जनकोजी सिंदे खाटल्यावर घायाळ पाहिलें. तोंड उघडून पाहिलें तों जनकोजी सिंदे याणी डोळ्यांम पाणी आणून चुलतीस विचारिलें कीं, 'बाई, काका कोठें आहेत?' ते समयी भागीरथीबाईस पुरते उमगलें कीं, पाटील निश्चयें रणात पडले! बाईस[७३] दुखाचा उभाडा आला. मागती विवेक केला कीं, 'जात्यांतील रडती, सुपांतील हसती.' त्यांची गत तों त्या रीतीची जाहाली. हा तो घायाल, जगावयाचा कठीण. दुराणीचा मागें पेंच भारी असतां मी शोक करित्यें तरी याची गति काय?[७४] म्हणून उभाडा आला तो विषासारखा घोटून[७५] जनकोजी सिंदे यासी बोलिली कीं, "बाबा,[७६] तूं रडतोस[७७] काय? जयाजी सिंदे याचे पोटी चौघी लेकी जाहाल्या, तसीच तू येक जाहाली असती तरी आणखी येक जावाई येता. पाटील काय घेऊन गेले? तुमची दौलत, महाल, मुलूक, खजिना, हाती, घोडे, सर्व तुम्हापासीं ठेऊन गेले. तुम्हीं हिंमत धरून त्याचे सार्थक करावें. आता रडून होणें काय." म्हणोन हिमत धरून गोष्ट बोलताच जनकोजी सिंदे स्वस्थ राहिले.

**८४. कासीबाई—जनकोजी-पत्नी—च्या सांगण्यावरून रेवाडीपर्यंतचा सिंद्यांचा पळ**

रामाजीपंत दिवाण व रूपराम कटारी यासी बाईनी आज्ञा केली की, "रात्रीचे रात्र लष्करचा[७८] मुक्काम करावा.[७९] प्रात:काली कूच करून जावें." असें ऐकोन नगारचीस सांगोन शाद्यादानें [मुकामाचीं] केलो.[८०] परंतु लष्कराचा धर सुटला. खावंदाची देखील कोणी आवस्था धरीनात.[८१] मग लष्कर तडक रेवाडीचे रोखें चालिलें. धरण फुटलेसारखें जाहालें. मग याणीहि हितून[८२] कूच करावें. म्हणोन इत्यर्थ करून[८३] निघावें, तों पोतनीस व जामदार याणी आर्ज केला कीं, "खजिना व कापड, नरमीना, उंटावर चालत होतें; वरकड सावे कापड छकडियावर चालत होतें, आता छकड्याचे जागां छकडे राहिले. ओझियाची आज्ञा काय?" असें म्हणतांच भागीरथीबाई यांणीं उतर केलें की, 'आम्ही कारभार कधी केला नाही. तुम्हीं रामाजीपंत यास विचारावें.' तों जवळ जनकोजी सिंदे याची स्त्री कासीबाई होती.

---

७२. मराठी धर्म सा. प्र.

७३. 'बाई समागमें उभयतास' हे शब्द भाइसं. मध्ये आहेत. सा. प्रतीत नाहीत.

७४. 'गत काय' ह्यापुढे ह्याविषयी दोहरा आहे. 'मेरे मन में कछु और। कर्ता के कछु और। उधो माधो कहे। झूटी मनकी दोर'।। हे कवन साने १९२२ मध्यें आहे. पण मंडळ प्रतीत तसेंच १८७९ च्या साने प्रतींत नाहीं.

७५. घोटून म्हणजे घोट गिळून, दु:खाचा आवडा आंवरून.

७६. हा शब्द भाइसं. मध्यें नाही.

७७. 'काय' शब्द सा २२ आहे. भाइसं. मध्यें नाही.

७८. लवकर भाइसं.

७९. 'करणें सा.

८०. 'करविली' शें.

८१. 'धरली नाहीं.' मं.

८२. तिथून सा. १९२२.

८३. केला. सा.

तिची उमर तों आठरा वर्षांची; परंतु बुद्धि[८४] मोठी पोक्ताप्रमाणें. मोठी हिमतीची बायको. तिणें जाबसाल केला कीं, "एवढाले जीव[८५] गेले, दौलतीची आस्था कोणास आहे? तुम्ही खजिना व नरमीना कापड असेल तें उंटावर घ्यावें. थोर[८६] साधीं कापडें यांसी आग्न लावून द्यावी." म्हणोन त्यास सांगितलें. मग तसेच जामदार व पोतनीस यांणीं सांगितल्याप्रमाणें वर्तणूक केली. जितकें आगत्य आगत्य[८७] ओझें होतें तितकें मात्र घेतलें. वरकड बाडे व कचेरीचे डेरे व सामान व खासे महालांतील डेरे व जामदारखान्याचे डेरे व साधी कापडें यांस आग्न लाऊन दिल्ही. मोठा प्रलय जाहला. जनकोजी सिंदे यास बाईचे पालखीत घातलें. दोन्ही बायांच्या पालखीचे भुई एके पालखीस लाविले.[८८] बायांस घोडा बसावयास पाहावयास गेला तों धुंदींत ज्याचे हातास जें घोडे आलें (तें) त्या बारगीर याणें नेलें. मग भलतीसी रोड[८९] दोन घोडीं होतीं, त्यांजवर बायका स्वार केल्या. तों भागीरथीबाई गरोदर, नऊ महिने पूर्ण भरले. घोड्यावर बसावयाचें संकट. उपाय नाहीं. एवढे तालेवार मेले; परंतु रडावयास फावलें नाहीं; घायाल जनकोजी सिंदे याच्या जखमा बांधावयास[९०] फावलें नाही. असो; या—रीतीनें कूच केलें. बहुतकरून तोफखाना तळावरच राहिला. अडीच प्रहर रात्रपावेतों तेथून दहाबारा कोस कच्चे गेले. जखमी यांजसमागमें येकदिल पांचसेंहि[९१] खारे नाहीत. जिकडील तिकडे रानोरान (होऊन) कोणी कोणास पुसेनासे जाहले तों रूपराम कटारी याणें पालखी उतरली. मनसुबा करिता जाला कीं,[९२] "दुराणीची दौड भारी. आतां दुराणी कांही या फौजेस निभाऊं देत नाही. उभयतां बायका व जनकोजी सिंदे व रामजीपंत यांस[९३] न कले तों नेऊन भरतपूर अथवा रामगड आथवा कुंभारींत कोणत्या तरी किल्यांत ठेवावी. इतक्यांत दुराणीची दौड आली तरी आम्ही कांहीं कोणासही हातीं देणार नाही. वरकड फौजेचें दैवी असेल तसें होईल." असें म्हणतांच जनकोजी सिदे यांणी उत्तर केलें की, 'बाईस[९४] विच्यारावें.[९५] बाईनीं सांगितलें कीं, 'मनसोबा मला कांहीं सुचत नाहीं, तुमचे चित्तास येईल तसें

---

८४. हे वाक्य भाइस. मध्ये नाही.

८५. भरतार मं.

८६. 'डेरे' सा. येथे—आहे ते, अशा सारखे (भा.) जे उचललें जाईल ओझ्या-सारखें भाइसं. असेहि पाठ आहेत

८७. आगत्याचें सा.

८८. ह्यापुढे क. प्रतींत असा मजकूर आहे.—"कारण की समय आहे. यास्तव जनकोजीस पालखीत घालोन जलदीनें निभावून गेलें पाहिजे. एका पालखीच्या भोयांनीं निभावणी होणार नाहीं. यास्तव लाविले. जनकोजी जखमी भारी आणि दुराणीचें भय. मजल काटून जावयाचें. बत्तीस असले म्हणजे हां हां म्हणतां निभावून नेतील. या प्रसगी दुसरे कोठून मिळणार?"

८९. वळगी तु. रोड क. व सा.

९०. 'दुराणीच्या दहशतीमुळें' अधिक शब्द सा. प्रतीत.

९१. पाचशेहि लोक नाहीत. एवढी फौजेची दुर्दशा होऊन गेली क. प्रत.

९२. दुराणीची दौड भारी. हें वाक्य १८७९ व—८६ त नाहीं.

९३. कोणास न कळतां शें., सा. व मंडळ.

९४. काकुबाईस सां. प्र.

९५. ह्यापुढें 'त्याचप्रमाणें बाईस विचारलें.' हें वाक्य अधिक मं. प्रत.

करावें.' असें म्हणतांच कासीबाई यांणीं भीडमर्यादा सोडून बोलिली की, "तुम्ही हा मनसोबा काय करतां? जाट आमचे बापभाऊ व्यंकटराव[९६] नव्हे; किंवा मावळा भापकर नव्हे. यांणींच जर बंदीस घातलें तरी पेशवे यांस आमचें अगत्य काय? दुसरें, लोक दक्षण देशाचे. आमचे जिवासाठी या रानांत आले; त्यास मोकलून आम्हीं आपले जीव जगवून काय करावें? सोक्षमोक्ष चवघात होईल तें होऊं. परंतु हा मनसुबा उत्तम नाहीं." आसे म्हणताच भागीरथीबाई यांनीं आज्ञा केली कीं, 'पालखी चालू देणें.' असें म्हणताच तडका लष्कर चालों लागलें. दिवस उगवावयास रेवाडीनजीक आलें. दिवस उगवला.

**८५. जनकोजी सिंदे ह्यांचा बायांसह कोटपुतळीस पळ**

तों गांवकरी खेड्यापाड्याचे लोक उंटे तटें घोडी ओढू लागले. आणि 'गिलचा आला' म्हणोन[९७] मागती गडबड जाहली. ते समयीं मोठा प्रलय जाहला. पळतीयाणीं[९८] बायकामुलें टाकून[९८] दिल्ही तेथे वरकड काय पाहावे! आंगावरील वस्त्रें कोणी ठेवीनात. असे पळूं लागले. तों पालखीजवळ दोघी बायका होत्या. पालखीत जखमी जनकोजी सिंदे होते. भोई घाबरे होऊन पालखी टाकावयाचे विचारांत आले. ते समयीं जनकोजी सिंदे यास नेटें पालखी चालली तर[९९] सोसेना. ते वेळेस भागीरथीबाई यांणीं भोई यांस प्रार्थना केली की, "बत्तीस आसामी तुम्ही आहां. तुम्हांवर घाव[१००] पडे तोंवर पालखी न टाकावी; तर मी दर आसामीस शेर शेर सोन्याचें कडें देईन;" या प्रकारें हिंमत दिल्ही. तों पळावयाची गडबड फार जाहाली. जिवाचे धास्तीने बावन बिरदाचें धनी देखील दीन जाहाले. भले भले सरदार घोडे सोडून[१०१] पाहाडांत सिरले. जीव द्यावा त्यापेक्षां जितरब[१०२] गेलें तरी उत्तम" म्हणोन घोडीं सोडलो. खेड्याचों रांडापोरें घोडीं धरूं लागलीं. ते समयी भागीरथीबाई यांणीं जनकोजी सिंदे यास सांगितलें की, "बाबा, मजला आतां घोडियावर बसून पळावयाची निभावणी पडत नाही. तुम्हीं झाडून पुढें चालावें. माझे समागमें कोणीतरी जिव्हाळियाचा मनुष्य असेल तें द्यावें. गिलच्या द्रिष्टीस पडे वोंपावेतों मजला रक्षावें. निदान दृष्टीस[१०३] पडून निभावणी दिसेनासी जाहाली म्हणज म्हणोन बरा मर्दाना व जिव्हाळियाचा होता त्यास जनकोजी सिंदे यांणीं सांगितलें माझे दोन तुकडे करावे." असें बोलिल्यावर त्याप्रमाणेंच मालाजी[१०४] आरणराव

९६. 'बाप' भाइसं. प्रतींतील हें नांव मं. प्रतींत नाहीं. मागें पृ. ३५ परि. ४२ पहा.

९७. म्हणोनच्या पुढें 'आवाई घालून लुटूं लागले' हें वाक्य सा. १९२२ प्रतींत अधिक.

९८. 'टाकून'च्या पुढें 'तडाका पळों लागलीं. अंगावर वस्त्र आहे की नाहीं याची शुद्ध राहिली नाहीं.' हा मजकूर सा. व क. प्रतींत अधिक आहे.

९९. तर—च्या पुढें यातना हा शब्द सा. प्रतींतील.

१००. 'व गाठ' सगजो.

१०१. सोडूनच्या पुढें 'जीव जगविण्याकरितां' हे शब्द सा. १९२२ त आहे.

१०२. (जनावर = घोडें इ.), हा शब्द भाइसं.

१०३. हे दोन शब्द सा. प्रतींतील.

१०४. आवजी आनंदराव—सा. मालजी आनंदराव—सगजो. वरील पाठ भाइसं. प्रत.

कीं, 'बाईसमागमें दम खात यावें. निदान दुराणी द्रष्टोस पडल्यावर बाईचे दोन तुकडे करावे. आशा न धरावी. यांस जिवें मारावें; मग तुमचें दैवी आसेल तें पाहावें." याप्रमाणें सांगोन त्यास भागीरथीबाई समागमें दिल्हें. तसेंच कासीबाई याजपासी कुसाजी सिदे यांणीं आसावें.[१०५] म्हणोन नेमून त्यास दिल्हें. परंतु भागीरथीबाई पोटशो; नऊ महिने पूर्णतेस आले. त्यास पळावयाचें संकट. कासीबाई सडी होती. तिणें पालखो सोडली नाहीं. याप्रमाणें पालखो घेऊन भोई तीन कोस पळाले. जखमी आंत परम कष्टी. प्राण गेला तरी पुरवला परंतु दुःख सोसवेना. म्हणोन भोई यांस शिव्यागाळी करीत. परंतु कोणी ऐकेनात. मग पळतां पळतां एक गाव मातबर होता, तेथील हजार दोड हजार मुलें बायका पुरुष दांडगे लष्करास, ओढाओढी करूं लागले; तों पालखीजवळ दिवस उगवलियावर पांचसातशें खांसा जमला होता. ते वक्ती कासीबाई यांनी जाबसाल केला की, "तुम्ही एवढे मनुष्य आणि दुराणी तों द्रष्टीस पडेनात. राडापोरें घोडी ओढितात. तुमच्या पोटांत हरणाची काळजी[१०६] शिरली आहे!" असे ऐकोन जनकोजी सिंदे भोई यांजवर रागास आले की, "पालखी थोपावी घोडें बसावयास द्यावें." असें म्हणतांच लोकांस विरे पडून दांडगियावर घोडे घातले. पांच-सात मनुष्य कापून काढिली. मग हुल्लड शांत जाहाली. सायंकाळ जाहाला. लस्कर जिकडे तिकडे पळोन गेलें; येके ठिकाणीं जमा जाहालें[१०७] नाही. जातीनिशी जनकोजी सिंदे खासा दहा हजार एकोकडे व नारो शंकर दहा[१०८] हजार एकोकडे. साबाजी सिंदे एकीकडे. कोणी कोणास पुसेनात, सर्व[१०९] लस्करात जनकोजी सिदे असतां हरोळी[११०] जाहाली की, "जनकोजी सिंदे कुंभारीस जाटांनी नेले. आम्हास रानांत मोकलिले." म्हणून लोक दिलगीर जाहाले. आसो. तेवढी रात्र घोडियावर जीन, उंटावर ओझी तसींच (ठेऊन) लस्कर जिकडील तिकडे उभे राहिलें. दुसरे दिवसी दिल्लीहून कचे ऐसी कोस *कोटपुतळी येथें जनकोजी सिदे राहिले. तमाम डोंगरात सांडणी स्वार पाठवून लस्कर जमा केलें.

### ८६. मल्हारराव होळकर व गौतमाबाई ह्यांचा संवाद : बाईंचे खोचक उद्गार

तो तेच दिवशी मल्हारराव होळकर यासी निकडीची पत्रें गेली होती त्याचीं[१११] उत्तरें आली. मल्हारराव याणी जयनगरचा शह टाकोन मजल दर मजल मोठ्या मजली करून मिळावयास येत होते. तों इकडील याची अवस्था अशी जाली हें मल्हारराव यांस माहीत नव्हतें. त्यास तेहि मुकामास कोटपुतळीपासून दोन कोसांवर आले. बुणगियाचा पुढे मुकाम जाहाला. मागून मल्हारराव सडी स्वारी अस्तमानास

१०५. असावे—शे. सागावें—भाइसं.
१०६. काळजें सा. १९२२.
१०७. जिकडील, पलों लागले होते, जमा जाहाले. भाइसं. नाहीं सगजो व म.
१०८. दहा पांच हजार सगजो.
१०९. तमाम सा., मोकल सगजो.
११०. आरोळी सा.
*रेवाडीचे वायव्येस २४ कोस.
१११. यांची सा. मागें परि ६६ शेवट पहा.

मजलीस शाहाजणें वाजवीत आलो. तों सिंदे याच्या लस्कराचे पलावे राऊत जाऊन तेथें पोंचले. मल्हारराव यांणी जवळ बोलावून वर्तमान विचारिलें. सारे वर्तमान स्वारानीं सांगितले की, 'दत्ताजी सिंदे याचा सिरछेद जाहाला.'[११२] जनकोजी सिंदे जखमी व बायकामुलें लुटल्या व लस्करचा येथून[११३] तीन कोसावर कोटपुतळीवर मुकाम राहिला.[११४] हे वर्तमान मल्हारराव याणी ऐकता क्षणीच अंबारीतच[११५] घालून घेतले व गगाधरतात्यानी शाहजणें वाजवीत होते ते मना केलें; असे डेरियास आले. डेरियांत जाऊन शोक करिते जाले. ते समयी त्याची स्त्री गौतमाबाई[११६] होती. तिणें निषेध केला की, 'सुभेदार, तुमचे वृधपण जाहले. सिदे याम मूल म्हणोन.[११७] अधिक काय? त्याचा तोंडचा जार वाळला नाही, तों त्यानी एवढा पराक्रम करून[११८] मारतां मारता मेले. एऱ्हवी मृत्युलोकास आला प्राणी वांचत नाही परतु इहलोकीं कीर्ति करून परलोकीं साधन करणें हेंच दुर्लभ.[११९] हें मूल जनकोजी सिदे, याणीं एवढा पराक्रम केला. [१२०]तुमचे दिवस समीप[१२०] आले; तरी हिमत धरून मारतां मारता[१२१] मरावें. हा प्रलाप[१२१] स्त्री जातीने करावा; असे पुरुषास बोललें[१२२] नाही. प्रस्तुत जवळ जखमी व मुले[१२३] बायका आली आहेत. तरी आता[१२४] जाऊन भेटून त्याचें समाधान करावें." म्हणोन बोलताच[१२५] मल्हारराव[१२६] यांसी विषाद आला. आणि गौतमाबाईस बोलिला कीं, "[१२७]तुझे चितात आम्ही मरावें असे आहे." त्याजवर बाईनें उत्तर केलें कीं. "पती असता कोणी वैधव्याची आशा धरील असो कोणीहि[१२८] नाहीं. अहेवपणें हळदकुंकुमडित असावें[१२९] हीच सर्वाची[१३०] इच्छा. परंतु जैसें पूर्वाचरण असतें तसेंच घ्यावें लागते.[१३१] आपले पदरी लौकिक भारी. तुम्ही

---

११२. केला–भाइसं. जहाला–सगजो.

११३. तेथून–भाइसं.

११४. जाहाला मं. प्रत.

११५. मल्हारराव बसले होते तेथेंच सगजो.

११६. गौतुमाबाई तु. गोदूबाई असाहि पाठ आढळतो.

११७. याची मुलें म्हणजे काय–सगजो.

११८. केला. आपण तरी आज पावेतों बहुत लढाया केल्या व आपली हिंमतहि मोठी असून असा शोक करतां! हा स्त्री जातीने करावा सा. प्रत

११९. चागलें. भाइसं.; मुख्य शें.

१२०. आणि तुमचे डेऱ्या समीप(!).

१२१. भा. खेद शें. टीप १४२ पहा

१२२. साजत भाइसं.

१२३. बाळे सा., शे.

१२४. ऐसेंच सा.

१२५. बोलली तुं. प्रत. येविशी दोहरा आहे :—
'उजले उजले सब भले, उजले भले न केस।
नारी न नवे, न रिपु डरे, न आदर करे नरेस ॥'
(इतर सर्व वस्तु उजळ म्ह. पांढऱ्या झालेल्या चालतील. पण केस पांढरे न व्हावे; कारण ते म्हातारपण होय. व त्यास शत्रु भीत नाहींत, बायकाहि मान देत नाहीत आणि राजाहि त्याचा आदर करीत नाही.) तुं

१२६. वृद्धास सा.

१२७. तुमचे शें.

१२८. चांडाळीण सगजो.

१२९ मरावें सा

१३०. स्त्रियाची सा.

१३१. असेल तसे घडेल सा. व सगजो.

*घोंगडी सा.

आपले *विणावयाचें स्वकर्म करीत आसता तरी सहजच वाचावयाची आस्था धरावी. वांटा तरी शूराचा[१३२] उचलिला आहे; वाग[१३३] सतीचे घेतले आहे हें साभाळावें; असेंच धर्मशास्त्र." याप्रमाणें बाईचे बोलणें ऐकोन रागास येऊन तसेच घोडियावर स्वार जाहले. हत्ती[१३४] व फौज तयार होऊन जनकोजी सिदे याजकडे चालले. 'जसी दैवाची उजरी तसी बुद्धि उपजे शरीरी' बरोबरीला तमाम फौजेची छबी[१३५] पळाली. एकमेकास बोलों लागले की, 'सिदे याची एवढी लढती फौज; तिची हो गत जाहली, आमची कोण दशा! खानदेशी फौजेची बहुतकरून तीच गत होईल असें दिसतें.' असो.

८७. मल्हारराव-जनकोजी भेट, जनकोजी मल्हाररावास हिंमत देतो.

या प्रकारे बोलत सिदे याच्या लस्करास मल्हारराव आले. तो भागिरथी-बाईहि फौजेत येऊन मिळाली. दीड प्रहर रात जाहाली भागीरथीबाई व काशीबाई यांस राहुटी देखील नाही[१३६] तेथे गौतमाबाई आली ते समयी उभयता बायांच्या[१३७] भेटी जाहाल्या. तेव्हा त्याचे भाषणाचा शोकाचा येकच कोल्हाळ जाहाला तीन दिवस दम खादला होता तितक्याचा उभाडा[१३८] जाहाला. तो आकात पत्री काय ल्याहावा! "भगवंतें आम्हावर येवढा गजप [गहजब] केला. आम्ही देवाचे वरी काय चोरी केली! तेव्हा आम्हावर येवढें निर्वाण दाखविले! आमचा वियोग केला! आता पाटील कोठें पाहूं!" म्हणोन धाय मोकलून ऊर बडवून, तोंडी माती घालून घेऊं लागली ते समयी गौतमाबाई यांणी बहुत प्रकारे शातवन केलें. मायाजाळ, स्मशानवैराग्य दुसरेयास सागावें. परंतु ज्याचा उभाड[१३९] तोच जाणत आहे. हा आनभव मनुष्यदेहीं सर्वत्रास[१४०] आहेच.[१४१] तसेंच मल्हारराव व जनकोजी या उभयतास दुःख, आई मुलाविसी विलाप[१४२] करते तसी गत जाहाली. उफराटे जनकोजी सिदे यांणीच मल्हारराव याचें समाधान केले की, "सुभेदार, हा मृत्युलोक आहे. यात

---

१३२. तुम्ही क्षत्रिय कर्म आरंभिलें आहे. सगजो. जसे सोहळे भोगावे तैसेच धर्मशिलेस पाय द्यावा तु.

१३३. मग जीवित्वाची आस्ता धरूं नये. असा शास्त्रीय धर्म आहे. म.

१३४. हत्तीवर निशाणें सगजो.

१३५. छबी तेज, पाणी 'फौजेची तोंडे काळी खापरासारखी दिसो लागली.' भाइसं.

१३६. 'झाडावर माळा घालून वर शेल्याचें पाल करून दीनासारखी बसली होती.' भाइसं. मधील वाक्य. यापुढें 'झाडास वस्त्र गुंडाळून बसली होती.' शा; सगजो.

१३७. व मानसिणी (=दासी, कुणबिणी) भासणी तु. भेटी जाहल्या हे सा. १९२२ त आहे.

१३८. उमाळा आला. शे. उभडा सा.

१३९. उभाड भाइसं, अनुभव तु.

१४०. प्राणिमात्रास सा.

१४१. असेल सा. व शे.

१४२. हेंच वाक्य क. प्रतीत 'मल्हारराव व जनकोजी बाबा या उभयतास दुःख-मातेचें अपत्य मृत्य पावतें आणि माता रुदन करून विलाप करते, तशी गत उभयतास जाहली' असें आहे. मा प्रतीमध्ये हेंच वाक्य मल्हारराव याची जनकोजी सिंदे यांस माय० इत्यादि ह्या फरकानें आहे. प्रलाप हाहि पाठ आहे.

केव्हांहि मरण खरें. वडील कीर्ति करूनच गेले.[१४३] आपणहि किती दिवस जगणें आहे. त्यांत अवकाशहि नाहीं. 'सुपांतील हंसती व जात्यांतील रडती' दृष्टीस आणावें.[१४४] प्रस्तुत आमचे हातात घास आहे जातच आहे" म्हणोन शांतवन केलें. मल्हारराव यांणी आपलें सामान देखील डेरा व बाडाच्या कनाथा व बिचोवे व खाजगीचे डेरे आणोन देऊन जखमास तबीब आणोन शेकावयास लाविलें आणि आपण तेथेंच राहिले दोन्ही सैन्यें येक जागां राहिलीं.[१४५] तेव्हां लोकांस आसें जाहालें की, शरीरातून प्राण[१४६] जाता जातां माघारा राहातो आसें जाहालें. मल्हारराव आले म्हणोन ते दिवशी सैन्य स्वस्त राहिलें.[१४७] तों मल्हारराव याचे लष्करात तीन वेळां "दुराणी आले आले" म्हणोन गडबड जाहाली.

**८८. जनकोजी व गौतमाबाई मल्हाररावास पुनः हिंमत देतात. भागीरथीबाईस पुत्रापत्य.**

दुसरे दिवशी जाटाची बातमी आली की, 'दुराणीची फौज तुम्हावर सडी होऊन येणार, तुम्ही स्वस्थ कसे राहिला ?' म्हणोन पत्रे आलियावर मल्हारराव व जनकोजी सिंदे व गंगाधरपंततात्या व रामजीपंत दिवाण असे येकत्र होऊन जनकोजी सिंदे यास विचार सांगते जाहाले कीं, "बाबा, तुम्ही जखमी आहां; दुराणीची दौड भारी; सहज चालणें कचे चाळीस कोस. यात तुमची निभावणी पडणार नाही. यास्तव बुणगे व बायका व तुम्ही आम्ही चमेलीपार जाऊन माघे सडी फौज रामजीपंत व आमचे गंगाधरपंत बराबर येतील.[१४८]" याप्रमाणे मल्हारराव याचे वचन ऐकोन जनकोजी सिंदे याणी उतर केले की, "सुभेदार, तुम्ही वडील आहा. मुलेमाणसें व बुणगे घेऊन जावें. माझा नेम[१४९] आहे की, जेथें पाटील मृत्य पावले त्या स्थानी आपला देह टाकावा, असा माझा नेम आहे. आपणांस राहाणे नाही." असें ऐकोन मल्हारराव याणी वडीलपणें बहुत धिःकार करून सांगितलें; परंतु जनकोजीराव सिंदे यांचे युक्तीस पडेना.[१५०] मग रागाने मल्हारराव आपले डेऱ्यास आले आणि गौतमाबाई[१५१] यांसी वर्तमान सांगितलें की, "जनकोजी सिंदे आम्हांस सर्वत्रांस घेऊन बसतात. ऐकत नाहीत." तेव्हां गौतमाबाई बहुत हिमतीची बायको. तिणे मागती मल्हारराव यासी बोलिली[१५२] की, 'सुभेदार तुमची साठ वर्षाची उमर जाली. यामुळें बुधीस चळ जाहला आसा विच्यार दिसतो. या पृथ्वीवर[१५३] कीर्त[१५४] मिळवून किती पंनाशा जगणें आहे! बहुत रोज गुदरले; थोडे दिवस राहिले आहेत.

---

१४३. गेले शें सा ; मेले भाइसं.

१४४. हा दृष्टान्त जाणावा. सा. १९२२.

१४५. जाली सा १९२२.

१४६. कुडीतील प्राण व्याकुळ जाला असतां परततो तसें घडलें सा १९२२.

१४७. सैन्यात स्वस्त राहिले भाइसं.

१४८. सडे, फौजेत (सा.) बराबर भाइसं. राहतील सा.; शें., सगजो. व मं.

१४९. हाच शें. प्रत व सा सगजो.

१५०. बुद्धीस उतार पडेना. सा. १९२२

१५१. वगैरे तमाम मंडळी शे.

१५२. विचार करून सागितले स १९२२.

१५३. कोणी चिरंजीव राहिला नाहीं मं.

१५४. अपकीर्ति. सा.

जनकोजी सिंदे मूल होत्साता त्याची एवढी हिमत आणि तुम्ही हा विच्यार[१५५] काय म्हणोन ध्यानास आणिता ?[१५५]' आसें ऐकून मल्हारराव यास बहुतच विषाद येऊन दांतानें ओठ चावून ?[१५६] बोलता जाहाला की, "तुझें चित पाहिलें.' आसें बोलोन तसेंच जनकोजी सिंदे यांजकडे[१५७] येऊन खचित जाबसाल केला कीं, तुम्ही आम्ही सडचा[१५८] फौजेंत राहून बायका मुलें व बुणगे झाडून माळव्यांत लाऊन द्यावीं आणि तुम्ही आम्ही सडे होऊन गलिमी काव्यानें दुराणीभंवताले राहून गिलच्या हारीस[१५९] आणावा." म्हणोन बोलून बुणगे ते समई कूच करविले. सिंदे इमानाचे शाबूत; अशाहि आकातात[१६१] फौजेस रोजमुरे[१६१] दिल्हे. बुणगियाचा बंदोबस्त करून वाटेस लाविले. केरोलिचे जाटाचा व मल्हारराव याचा स्नेह म्हणोन + केरोलीचे घाटे बुणगे वाटेस लाविले. केरोलीकडून[१६२] सिंदे यांचे बुणगे दाहावे दिवसी चमेलीस पोहोंचले. होळकर यांचीहि मुलेंमाणसे बरोबरच होती. कोसभऱ्याच्या छाटयानें गोतमाबाईचा तळ होता. तेथें उत्तरक्रिया करून कूच करून कुवारी नदीवर मुकाम केला. तेथें तेरावा दिवस करून राहिले. तों तेच रात्रीं भागिरथीबाई प्रसूत[१६३] जाहाली. पुत्र जाहाला. ते समयी तोफा वगैरे[१६४] यत्रे सुटली. दताजी सिंदे यांचें दुख येकीकडे ठेऊन बहुतच खुशाली केली. सूर्योदय जाहल्यावर मल्हारराव यांची स्त्री गोतमाबाई व तिची सून खंडेराव याची स्त्री आहिल्याबाई आशा उभयतां डेरियास आल्या. त्यांणी खुशाली करून हतीवरून साखरा पाठविल्या. मोठ्या संकटानें पांच दिवस तेथेंच मुकाम करून साहावे दिवसी कूच केलें. ते मालव्यांत येऊन पोहोंचले. सिदे यांची मुलें व बायका बणगे उजनीस राहिले. मल्हारराव यांचीं भारधुडी[१६५] इदुरास राहिली.

---

१५५ हा विचार तुम्ही ध्यानांत आणोन काय बोलणें तें बोलावें. म.

१५६. चावून कोपरानें लोड फाडिले. तुं. प्रत.

१५७. यांचे डेरियास सा. सगजो.

१५८. सर्वत्र सा. १९२२

१५९. जेरीस भाइसं.

१६०. सावध हा शब्द सा. १९२२त अधिक आहे.

१६१. आठ शें. आठवडा सगजो.

१६२. वरून १८७९ व १८८६ मा. १९२२.

१६३. तेरावा दिवस करावा तों तेच रात्री–भाइसं. 'करून राहिले' सा २२ आणि ३२.

१६४. वरकड व सुटलीं सा. १९२२.

१६५. धारधडी सगजो. स्त्री शें. मुलें माणसे भारघडी सा. सर्व मंडळी, मं.

प्रकरण नववें

# मल्हारराव होळकरांचें अहमदशहा अबदालीशीं गनिमी युद्ध

**८९. अबदली दुराणी व सिंदे-होळकर हुलकावणीचा पळ; मराठी सैन्य शिकंदरा लूट-अंतर्वेद; गंगोबातात्यांस सैन्याबरोबर ठेवून मल्हारराव व जनकोजी आग्रा येथें**

इकडे मल्हारराव व जनकोजी सिंदे याणी कूच करून मारवाड प्रातांत गेले. तों दुराणीनें पाठलाग केला. गिलच्या तिकडे येतांक्षणीच गनीम पाणपत-कर्नालिकडे गेले. दुराणी[१] तिकडे जाताच गनीम दिलीस पोहोंचले.[२] पाठिलागास अबदलीस दुराणी दिल्लीस येतांच सिदे-होळकर आगऱ्यास आले. आविध आग्र्यास येताच गनीम[३] जयनगर प्रातात गेले. तिकडे दुराणीची[२] दौड जाऊन पोचतांच गनीम उदेपूरचे सुमारास आले गिलच्या तिकडे गेला तों गनीम तिकडे नाहींत.[३] या प्रकारें हे गनीमी कावा करूं लागले. गिलच्या हारीस आणावा म्हणोन उपाय केला; परंतु दुराणीची सलाबत आणि हिकमत[४] भारी. फौज कुबल्यामुळें[५] गनीमच पिटूनच[६] दमास आणिले. या[६] पिटविण्यांत गनिमांनीं अन्नाविणें मरावे.[६] परंतु रानांत सुबत्ता. हरभरे व गहूं पुष्कळ. याजकरिता अन्नाची परवा नव्हती.[७] या प्रकारें फाल्गुन शुद्ध १४ दिल्लीस येऊन गनीम पोंचले. पौर्णिमेचे दिवशी थोर मजल करून शिकंदरा[८] म्हणोन शहर आंतर्वेद प्रांतीं होतें तेथें यमुना उतरून पोहोंचले. शिकंदरियास खबर नव्हती. येकायेकींच

१. मोगल भाइसं. (अबदली, नजीबखान दुराणी ह्या प्रतिपक्षीयास उद्देशून. मोगल ही संज्ञा पेद २.१२० मध्यें आहे.)

२. यापुढें 'गाजुदीखान वजीर जंगलांत होता तो सुरजमल जाट याचे आश्रयानें कुंभारीस राहिला' हें अधिक वाक्य सां व क. प्रतीत आहे.

३. यापुढें 'गनीम केवळ सडे, नादार.' हें वाक्य सा. मध्यें आहे. (नादार = बिनसंग्रही) नज्ञुर सगजो.

४. 'हिमत' व 'याजहून' असे शब्द सा.

५. तुबल्यामुळें शें. भा.

६. पळूनच भाइसं.; पिटवून मं.; चंदीवांचून भा. पिटून शब्द हिंद. २.४२ पृ. ३९ वर आहे. 'या० मरावें.' हें वाक्य १८७९–८६ त नाहीं.

७. यापुढें 'अवांतर मुलूख असता तर अन्नाविणें मरती आणि दमहि न पुरता. हे वाक्य सगजो. व सा. मध्यें अधिक आहे; आणि ह्याहि वाक्यापुढें 'माहाल मुलूक ठाणी झाडून नर्मदेपर्यंत दुराणीची जाहाली.' भाइसं व 'दुराणीनें घातली.' सां. व क. प्रतीत अधिक मजकूर आहे.

८. सिदपूर, सिवंदर, सिखरापूर, सिवदरापूर व सिकंदराबाद शें., भा., मं. व भाइसं. प्रतींत नामातर आढळतें. सा. प्रतीत शहरच्यापुढे 'मोठें' हें विशेषण आहे. ह्या शहराजवळ येणें व शहराची लूट करणें ह्या हालचालीचा बखरींत दिलेला काल पेद. २.१२०, २१.१८६ ह्यावरून बरोबर आहे.

गनीम येऊन[९] घाला घातला. शहर लुटून सत्यानास केला. ते समयीं लूट भांडीं वस्त्रें, मैदा, तूप, तांदुळ साखर कोणी घेईनात[१०] असें जाहालें. लष्कर केवल सडें, आधिक येक तांब्या घ्यावयास आनकूल पडेना. तेथे थोर हाडे बासनें कोण घेतो ?§ आसो. ते दिवसी पोर्णिमा होती. सर्वत्र अन्नास[११] मिळाले. हुताशनी पूजन

९. यांणी जाऊन सा. १९२२.

१०. वस्तुयादीत 'कणीक' मं. प्रतीत खाईनात भाइसं. प्रत.

११. सर्वत्रांनी ते दिवशी अन्नपाणी केलें. सा. १९२२

§ टीप :––एथपासून तों पुढे पृष्ठ ९० ओळ ६ पर्यंत सातारा प्रतीचा पाठ निराळा आहे. तो असा :—असो, "ते दिवशी येथे मुकाम करून दिल्लीवर आले. दुसरे दिवशीं तेथून कूच करून दिल्लीवर आले. तों दुराणीची दौड याजवर येण्याची बातमी येतांच दिल्लीवर अवसान न खाता तेथून मागतो ग्वाल्हेर, कुंभेर, ढीग, भरतपूर या रोखे चालिले. दुराणीची दौड याचे पिछाडीस येत चालली. पळतां पळता खराब जाले. घोडे मनुष्य थकले. दर मुक्कामास शेंपन्नास घोडीं व उंटे थकून राहात. कोणी मनुष्य थकले असता दुराणीनें ने(ये)ऊन शिरच्छेद करावा असा अनर्थ जाला. गनिमांचा हर्ष उडून गेला. बहुत फिकिरीत पडले. हमेषा हिंदुस्थानांत गनिमांनीं दिग्विजय करून संतोषात कालहरण करून होते. प्रस्तुत काळी काळ फिरला. यांची गत होऊन फार जेरीस आले. फोजेत कोणावर होष राहिला नाहीं. शह सोडून दक्षिणेस येतां न ये. शिदे अभिमानास पोचले. तेव्हा होळकर यासहि शहास गुतून पडणें प्राप्त जाले. एरव्ही होळकर मतलबी, ते इतके खराब न होते. अशा संकटानें रोज कूच करून वीस-पंचवीस कोसांचा चाटा पाडावा. पुन: दुराणीनें येऊन गांठावें असें होत चालिलें. देशी श्रीमंतास वर्तमान वरचेवर लिहून पाठवीतच होते; परंतु इकडून कुमक गेली नाहीं कारण श्रीमंतांचा व बंदेखान निजामअल्ली यांचा बिघाड होऊन श्रीमंत फौजेसुद्धा त्याजवर चढाई करून गेले होते. यामुळें हिंदुस्थानांत फौज पाठवावयाची तर्तूद जाली नाहीं व श्रीमंतांचे चित्तांत शिंदे-होळकर उभयतां त्या प्रांतीं आहेत ते मसलतीस धक्का बसू देणार नाहींत; या खातरीवर (श्रीमंत) स्वस्थ होते. इकडे शिंदे व होळकर पराकाष्ठा करीतच होते. तत्रापि दुराणी गिलच्याचा शह भारी, उपाय चालेना. गनिमांची फौज जेरीस आली. सन्मुख साम्ना होऊन लढाई करण्याची हिमत गनिमाची राहिली नाहीं. गनिमाचे फौजेंत महागाई फार जाली. हिदुस्थान प्रांतीचे राजेरजवाडे कोणी यांची कुमक करीनात. कुंभेरीकर जाट मात्र गनिमांचे संधान राखून होता; परंतु त्यासहि उघड कुमक करण्याची हिंमत नव्हती; गिलच्याची जरब होती. असे काही दिवस लोटले. इतक्यांत गनिमानी आपणांत विचारणा केली "असें किती दिवस पळावें? एक वेळ साम्ना करून मारावे किंवा मरावें." ऐशी योजना करून फौजेंतील निवडक फौज वेगळी करून एके तोंडावर शिदे व एकीकडे होळकर उभे राहिले. इतक्यात दुराणीची दौड येऊन पोंचली. त्यांचा याचा मुकाबला होऊन लढाई सुरू जाली. ते दिवशी गनिमानी मोठी शिकस्त करून गिलच्याचें तोंड मागें हटविलें. परन्तु गिलच्यांची फौज भारी व अविचारी लोक; बेलाशक मारामार करून गनिमाचे फौजेंत मिसळले. सिदे यांनीं जागा सोडली नाहीं. होळकर यांची फौज खानदेशी ,पाठ देऊन पळो लागली. गिलच्यांनी मिसळोन जो सांपडेल त्याचा शिरच्छेद केला. असें करितां पंधरा कोस पाठलाग केला. मल्हारराव यांजकडील महिपतराव होता त्याचें शीर कापून नेलें." इत्यादि.

केलें. तों येकायेकींच सुरजमल जाट याचा सांडणी स्वार धावत सिंदे यांजकडे येऊन बातमी पोंचविली कीं, "दुराणीची फौज दिल्लीनजीक यमुना उतरून आंतर्वेद प्रांतें तुम्हांवर आली, तुम्ही देखत सांडणी[१२] पुढें कूच जलदी करणें" म्हणोन कळविलें. जाट यांणीं सिंदे यांचा उपकार ध्यानांत आणोन बातमी वगैरे खर्चास सर्व प्रकारें वरचेवर साहित्य करीत होते. जनकोजी सिंदे याणी मल्हारराव[१३] यांसी सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां मल्हारराव[१४] जनकोजीस बोलले 'या दिवसपर्यंत' आम्ही तुमचे[१५] आवाईवरच पळत होतों.[१५] दुराणी केवळ आकाश[१६] फाडून आला नाही. आम्ही उगेंच व्यर्थ पळत आहों. अद्यापि दुराणीचें तोंड आम्ही पाहिलें नाही. आमचे तोंड त्यांनीं पाहिलें नाहीं. कोठवर[१७] पळावें ? या प्रकारची सिंदे याचे फौजेची हेटाळणी होळकराचे लोक करीत होते.[१८] हें कर्णोपकर्णीं सिंदे यांनी वर्तमान ऐकिलेंच होतें. त्यांत होळकर यांनी बळ बांधोन गोष्टी सांगितल्यावरून जनकोजी यानी साफच उत्तर केलें कीं, "सुभेदार,[१९] आमचे लोकांनी धास्त खादली आहे. दुराणी आलियावर झाडास बांधले तरी झाडच घेऊन जातील. वरकड गोष्टी काय सांगावयाच्या आहेत ? आमचा हवाल[२०] या रीतीचा आहे. आमची फौज तुमचे फौजेत राहिली तरी तुमचे फौजेंत अपाय होईल. येक पळालियावर दुसरियाची हिंमत कमी होते. यास्तव आपण या स्थलीं राहून येक वेल दुराणी याचा मोकाबला घ्यावा." असें बोलून सिंदे यांणीं नगारा करून कूच केलें. तों मल्हारराव यांजकडील लोकास हुटहूट होती कीं, येक वेल झुज करावें. दुसरियाची आवई ऐकून कोठवर पळावें ? मग मल्हारराव यांणीं गंगोबा तात्या यांस आज्ञा केली की, "फौजेंत तुम्ही राहून युद्ध करावें. जखमी मूल आहे. त्या[२१] जखमा पळणीमुळें अद्यापी सेंजेस आल्या नाहीत. त्यापेक्षां तुम्ही राहून[२२] बहुत युक्तीनें युद्ध करावें. म्हणून चार मोठमोठे अध्वर्यु[२३] होते त्यांसहि सांगितलें. आणि आपण निघोन जनकोजी सिंदे यांसी गांठिलें. ती तेवढी रात्र [व] दुसरे दिवशीं तिसरा प्रहरपर्यंत आगरिया नजीक येऊन पोंचले. तों यमुनेस उतार सांपडेना. घोडे घालून पाहिलें तों ठाव लागेना. तेव्हां मल्हारराव

१२. 'देखत चिठी झुरतीं करणें' व 'म्हणोन आली' सा. १९२२.

१३. चिठी घेऊन मल्हारराव याजकडे आले सा. २२

१४. हे तीन शब्द १८७९,–८६ सा. मध्यें नाहीत.

१५. 'आमचे' व 'आहों' भाइसं.

१६. अस्मानाची गांड फाडून सा. १८७९. गाठ भाइसं.

१७. हें वाक्य भाइसं. मध्यें नाहीं.

१८. 'भागाडे म्हणोन' हें भाइसं. मध्यें नाही.

१९. 'सुभेदार, तुम्ही एक वेळ युद्ध करणें. आम्हांस आज्ञा देणें. आम्ही तुमचे फौजेंत राहिल्यास उत्तम नाही. मल्हारराव यांनी 'तुम्ही आम्ही राहून युद्ध करावें म्हणून बहुतसा दुराग्रह केला.' हीं चार वाक्यें सा. २२ मध्यें अधिक आहेत.

२०. आस्था साने २२

२१. हे सात शब्द भाइसं. व क. मध्यें आहेत.

२२. यापुढें 'कोणी आल्यास' हे शब्द सा. २२ मध्यें अधिक. हे १८७९,–८६ मध्यें नाहींत.

२३. मोठे मोठे गृहस्थ भाइसं.

बहुत घाबरे जाहले. आणि जाटाकडील वकील रूपराम कटारी यांस बोलावून पुसिलें कीं, 'बाबा जखमी आहेत. त्यांस पार करून द्यावें.' म्हणोन अजीज होऊन गोष्ट सांगितली कीं, 'कठीण समय वैरियास न यावा.' मल्हारराव या प्रकारें बोलतांच रूपराम कटारी याणें मर्यादा सोडून उत्तर केलें कीं, 'डोखरे,[२४] रोता हे क्यों? तुम्हारा जान खाली आम्हारा जान उपर है, फिकीर न करावी' असें निष्ठुर बोलताच कठिण शब्द प्रसंगोपात्त साहाणें पडलें.[२५] असें रूपराम कटारी यानें बोलोन दोन नांवा[२६] आणून दोन राहुटियानजोक खुंटविल्या.[२७] 'निदान दोन तास खासे यांस पार करून आगरियाचे किल्ल्यास पोंत्रते करून देणें' म्हणोन सांगितलें. ते समयीं तमाम फौजेस गैर इतबार जाहला कीं, निदानी हे दोघे आम्हास मोकलून यमुनापार जातील. म्हणोन रात्रीचा रात्र शोध करून दोन कोसांवर पेंढारी[२८] याणी पुढें छातीबरोबर पाणी उतारास ठिकाण लाविला. लष्करांत खबर कळतांच कोणी खावंदाची देखील वाट पाहिली नाही. रात्रीस फौज नदी उतरावयास लागली. मग मल्हारराव होळकर व जनकोजी सिंदे त्याच[२९] घाटें नदी उतरून दिवस उगवावयास आगरे येथे येऊन शहरात[३०] राहिले.

**९०. दुराणीच्या सैन्यानें होळकर-सैन्याची पोळजत्रा केली**

इकडे मागें गंगाधरपंती, शेटियाजी खराडे व संताजी वाघळे[३१] पांच हजार फौजेनिसी पुढें बातमीस पाठविले. आपण जीनसामान बांधून सिद्ध होऊन बसले. तों उजाडावयास जाहलें. तोंडास तोंड दिसों लागलें. ते समयी गिलचाची फौज येऊन पोहोंचली. बातमीचे लोक सावधच होते. तयार होऊन घोड्यावर बसतांच तों गिलचे सरमिसळ होऊन फौजेत मिळाले.[३२] ते समयीं गंगाधरपंत कडनिकड करून पुढें सरळ आले होते त्यांजवर घोडी घालून एकवेळ घाव केला. आणि दुराणीचे लोक सारे माघारे घातले. तों रोहिले व दुराणी दुसरे झाडून येऊन पोंचले. क्षणभर[३३] बरीच मारामारी जाहली. घाया (वा) म हजार पाचशें मनुष्य ठार पडतांच मल्हारराव यांची फौज तडक आगरियाचे रोखें पळू लागली. गिलच्यांचा कावा[३४] गनिमाहून अधिक (अधिकोत्तर). झुंझास इकडे आरंभ होतांच दहा-पांच हजार फौजेनें[३५] पळावयाची वाट धरावी आणि गनीम पळू लागतांच मागून डोकी कापीत पाठी लागावें. (तेव्हां) पुढें वाट धरून उभे होते ते सहजच मध्यें शिरून मारामारी

२४. ठाकूर हा भाइसं. मध्ये अधिक शब्द.

२५. 'डोखरा म्हणोन हिंदुस्थानी भाषेंत म्हाताऱ्यास म्हणतात.' भाइसं. व सा. मध्यें अधिक वाक्य.

२६. जाट भाइसं.

२७. गाठल्या सा. गाडल्या भाइसं.

२८. मडरी भाइसं.

२९. उदन भाइसं. उपन क. उदल म. हें घाटाचें नाव.

३०. सराईत सा. २२.

३१. सावळ सा. व क.

३२ पोचले सा. २२.

३३. होळकर यांचे लोकांनीं हे शब्द सा. २२ मध्ये ज्यास्त. सा. १८७९, ब–८६ मध्यें नाहींत.

३४. काट भाइसं.

३५. फौजेनिसी भाइसं.

करूं लागले. होळकर यांचे फौजेंत मोठा[३६] प्रलय जाहाला. 'दे माय धरणी ठाय' तैशी गत जाहली. कितीएक लोक जिवाची आस्था धरून दांतीं तृण धरून उभे राहिले.[३७] दुराणी केवळ कठोर, निर्दय, 'गौ घास खाती; बेजान[३८] करो. अल्लाका डेरा दिखलाव.' म्हणोन सिरच्छेद करावा. असे करीत पंधरा कोसपर्यंत पाठलाग केला. मल्हारराव यांजकडील महिपतराव म्हणोन दिवाण होता. तो घायाळ होतांच त्याचें शीर कापून नेले. तैसेच शेटियाजी[३९] खराडा म्हणोन मातबर सरदार होता. त्यासहि जखमा भारी लागतांच तो घोडियाखाली आला. ते समयी त्याचा शिवाजी खराडा केवळ सत्पुत्र होय; त्याणें पित्याकरिता जिवास[४०] उदार होऊन घोड्यावरून उडी टाकून पित्याच्या डोक्यास मांडी देऊन बसला. तशांमध्यें दैवयोगेंकरून एक पठाण नेकजात थोर माणूस होता त्याची गांठ पडली.[४१] तो जवळ येऊन उभा राहिला. तो शेटियाजी खराडे यास[४२] जीव होता. पठाण यास उत्तर केलें कीं, "तू थोर भला मनुष्य दिसतोस. मी शेटियाजी खराडा आहें. हा माझा पुत्र आहे. घरी संपत्तीहि थोडीबहुत आहे; परंतु वंशीं संतान पुरुष एवढाच. माझी तों आयुष्याची मर्यादा जाहली. परंतु एवढा कृतोपकार करावा कीं, माझा पुत्र वांचवावा. निदान पार पाडून गनिमाचे फौजेंत पोचतें कराल तरी तुम्हास लाखपन्नास हजार रुपये पावते करूं.[४३]" हें ऐकोन पठाणासहि करुणा आली. [४४]त्याणें आपले दहा पठाण राखणीस जवळ ठेविले. (आणि) त्यांस[४५] ताकीद केली की, 'हलाली–हरामीची गांठ पडली तर यास मारूं देऊं नये.' असें सागोन पुढें गेला. वीस कोसपावेतों पाठीस लागले. पांच-सात हजार मनुष्यांची शिरें कापून नेलीं. ते समयी खानदेशी लोक म्हणों लागले की,[४६] 'तिकडे गंगोबा तात्या पळाले.[४७] अजुनी तरी काय पाहातां.' असें बोल्तांच, शिदे यांचे फौजेस हांसत होते त्यांची मोडशी उतरली; उभयतां

३६. मोठासा सा.

३७ राहतात सा.

३८. बेकार भाइसं 'करो' भाइसं. मध्यें नाही. जबा करो शे प्र.

३९. सटवाजी भाइसं.

४०. जिवास जीव देणेंस भा. जिवित्वास सा. २२.

४१. ह्यापुढे क प्रतींत 'खराडे याचे मनांत की, आम्हास मारील आणि पुत्रासहि मारील आणि सीर घेऊन जाईल हें भय हृदयी. पठाण याणे पाहिलें कीं रणात घायालास मांडी देऊन बसला आहे?' हा मजकूर अधिक आहे. आणि 'तो पळत येऊन' त्या ऐवजी 'तेथें' क प्रतींत आहे.

४२. हा मजकूर भाइसं. मध्यें नाहीं सा. २२ मध्यें आहे.

४३. होतील सा. २२

४४ त्याची अबदुल अली पावेतों भीड भारीच होती, हें अधिक वाक्य सा. २२ मध्यें आहे.

४५. हें वाक्य भाइसं. मधील. सा. मध्यें नाही.

४६ 'की' पुढें 'माय जि भाऊ हिसाय नय' (माझे बाबा हिसू नकोस. असें म्हणताच दुसरें म्हणों लागले' हा मजकूर सा. मध्यें व 'माये जि', भाव सोनें न जालब धोडूं' हे तु. प्रतींत आहे. 'माये जि–नि–भाऊ साशेन' स्व. १८७९ प्रतींत आहे.

४७. या धाडले पु., धाडले सा. २२, पडल क. प्र.

समदु:खी जाहले. आसो. याप्रकारें मल्हारराव होळकर यांचे फौजेची पोळजत्रा जाहली. त्यांत[४८] वांचले ते[४९] दाहांनी पांचांनी आगरियास पोंचले. जो पुढें येई त्यास[५०] वाटे की आपण जगून आलों. आन आवघे[५१] कतल जाहाले. इकडे शेटियाजी खराडा घायाळ होता त्याचा प्राण निघोन गेला. पठाण याणें शिवाजी[५२] खराडे यास आपले लष्करांत घेऊन गेले. दुराणीनी थोर यश पावोन सिकंदरियावर मुकाम केला. इकडे मल्हारराव यांणीं आग्र्याहून[५३] जयनगरचे रोखें निघोन गेले. गंगाधर-तात्या[५४] याचें वृषण घागरीएवढें जाले. घोडियावर बसतां न येई असें जालें. कोठवर पळतील? गिलचियांनी शिकंदरियाहून[५५] कूच करून आगरियाचे नजीक यमुना उतरून मागती गनिमाचे पाठलागास गेले.



४८. लष्करात भाइसं. प्रत.

४९. त्याचा पळ सा. २२.

५०. त्यास 'विस्मय' व 'आहों' भा. आपणच सा. २२.

५१. वरकड मं. प्रत.

५२. सिवजी भाइसं. जिवाजी मं.

५३. 'कूच करून' हे सा. २२ मध्यें अधिक.

५४. गंगाधर तात्या ह्यांचे आंगांत अंतर्गळाचा विकार होता. घोड्यावर बसोन पळतां पळतां तो रोग फार वाढला. सां. प्रत.

५५. हा शब्द भाइसं. मध्यें नाहीं.



### प्रकरण दहावें

# उत्तर हिंदुस्थानांत जाण्यासंबंधीं वाटाघाट आणि भाऊंचा जाण्याचा निश्चय

**९१. दत्ताजींचें वर्तमान कळतांच सदाशिवरावभाऊ अबदालीचे पारिपत्यार्थ जाण्याचें योजतात**

इकडे पूर्वील वर्तमान दताजी सिदे पडल्यावर जनकोजी सिदे याचो पत्रें नानासाहेब भाऊसाहेब यास पाठविलीं होती. त्यांत सविस्तर जाहाले वर्तमान साद्यंत[१] लिहिलें होतें. तों भाऊसाहेब याणी तादुळज्याच्या मुक्कामी नबाब निजामअली यांसी लढाई केली होती. तेथें तुबळ युद्ध करून यश सपादिले होते कीं असे गनिमांनीं कधी मोंगलासी युद्ध करून मोगल सिकस्त केला नव्हता. केवल मोगल जेरीस आणून त्याजपासून मुलूख व किले देवगिरी व अशेरी आणखी अवांतर किले यांच्या सनदा करून घेतल्या. ते समयी भाऊसाहेब यांसी गर्व[२] बहुत जाहाला. त्या येशानें फंदांत[३] निमग्न जाहाले होते. तों गर्वाचें घर खाली. ईश्वरास असह्य.' अशा[४] आनंदात असतां अकस्मात सिदे यांचीं पत्रे येऊन पोचली.[५] ते समयी पत्र वाचून पाहिलें आणि भाऊसाहेब ह्यांचा आनंद होता तो नाशातें पावून दुःखी निमग्न पडते जाहाले. दुधाचे राजणीत कांज्याचे शितोडे [पडतात] किवा धनलोभियाचें धन जातें आथवा राजा दशरथास कैकयेचे शब्दबाण किवा जानकीहरणें रामचंद्र; किवा रुक्मिणीसैवराचे ठायीं राजा शिशुपाल[७] तैशी[८] गत भाऊंची जाली. विजयी जालियाचे अति उत्कर्षे समाधान मानून होते, तों येकायेकीच दताजी सिदे याजकडील मेल्याचें[९] वर्तमान आले. पत्र वाचून पाहिलें; आपले जागां मुहूर्तमात्र दंग होऊन बसले. जसा टाक्यानीं दगड[१०] फोडावा किवा निर्जीव काष्ठाचा पुतळा तैसी देह-अवस्था[११] होऊन तटस्थ बैसले. ते समयीं जवळ बळवंतराव गणपत[१२] व गोविदराव

---

१. साकल्यें सा.

२. 'परम आनंद होऊन' हे शब्द सा. प्रतीत अधिक.

३. वाउदात तुं. आनंदांत सां. फुंदांत.

४. साहेना सा., असाह्य शें., आसाध्य भाइसं.'

५. ईश्वरास साहीनातशा तुं. प्र.

६. 'आली कीं दत्ताजी शिदे लढाईंत पडले. ईश्वरें मोठा गहजब आम्हावर केला.' क.

७. रुक्मि याचा अपमान जाला. पु. प्रत.

८. ह्या शब्दापूर्वीं 'जैशी गत अपमान झाला.' हे शब्द सा. २२ मध्यें अधिक आहेत.

९. पराजयाचें सा.

१०. 'टाकियांनीं' 'पाषाण' जेवविले पु. लवविजे तु. काष्ठांगाचे पु. प्रत.

११. देवभाव तटस्थता जाली. सा.

१२. मेहेंदळे

शिवराम[१३] व गोपाळराव गोविंद[१४] व आणखी जिव्हाळियाचे दहापांच मुत्सद्दी[१५] बसले होते. त्यांत बळवंतराव याणी जाबसाल केला कीं, 'भाऊसाहेब, गोमिस[१६] पाय बहुत. त्यांत एक पाय मोडला तर उणें पडत नाही.' आधीच मोगल[१७]–पराभवाचें वारें होतें. त्या फंदांतच बळवंतराव याणीं अग्नीवर घृत टाकावें तैसा जाबसाल[१८] केला. की, "दुराणी म्हणजे काय जिन्नस ? साहेबी खासा स्वारी हिंदुस्थानांत करावी. सिंदे–होळकर याणी त्या रानांत बहुत दिवस सुख अनुभविलें आहे. एकमेकांत कलह करून स्वामिकार्याची नुकसानी केली. आतां ऐशीच फोज घेऊन हिंदुस्थान काबीज करावें. दुराणी बहुतकरून त्या रानांत येतो. त्याची येक वेळ खोड मोडून द्यावी की, पुन: अटक उतरूं[१९] नये." असें बोलतांच तेच क्षणी मिशीस पीळ घालून अति उत्कर्षें बोलते जाहाले की, "आम्ही हमेशा देशी[२०] मोगलांशीं लढाई करतों; परंतु नर्मदा पार जाऊन[२१] कोठें दिग्विजय केला नाही. येक वेळ हिदुस्थानांत जाऊन अबदुल अलीचे पारिपत्य करावें; म्हणजे सिदे होळकर ह्यांचा गर्वपरिहार होईल आणि आमचाहि पुरुषार्थ होईल. नाहीतर आपकीर्ति लोकिकात होईल; की, ज्याचा सेवक गाजिला त्याचे जालेपणाची[२२] निर्फलता. यास्तव लक्ष मसलती[२३] येकीकडे ठेऊन हिंदुस्थानाचे मसलतीस जावें."

**९२. भाऊसाहेबांच्या आग्रहामुळें नानासाहेब व गोपिकाबाई यांनीं दादासाहेबांस उत्तरेंत पाठविण्याचें योजिलें.**

हाव[२४] निश्चय करून नानासाहेब याजकडे गेले. तों तेहि सिदे यांचें वर्तमान ऐकोन दुःखात[२५] होते. तों भाऊसाहेब याणी जाऊन विनंती केली कीं, "हिंदुस्थानांतील वर्तमान तो या रीतीने जाले. आवघें हिदुस्थान येकत्र जाले आहे. 'पाण्या आधी वळण बाधितां उतम;' नाहीतर शेणामेणाचे, लोखंडाचे जालियावर पुढें भारी पडेल. यास्तव दादासाहेब यांची रवानगी साठ हजार फोजेनिसीं करावी; तें पुढे जातील. जडभारी पडल्यासारखें जाहल्यास आणखी साहित्य करावयास येईल." असें ऐकोन नानासाहेब याणी उत्तर केलें कीं, 'तिघां खाशियांनी ठिकाणी राहून झाडून देशीच्या फोजा पाठवून द्याव्या हें उत्तम; परंतु खासा स्वारी गेली असतां आब जाईल[२६].' असें बोलिल्यावर भाऊसाहेब मर्यादा सोडून बोलिले की, "नाना-

---

१३. खाजगीवाले लिमये.

१४. पटवर्धन. हें नांव मडळप्रतींत नाही.

१५. गर्वहि. हा शब्द भाइसं. मध्यें अधिक.

१६. इंगळीस तु. प्रत.

१७. ताम्र–पराभवाचें सा.

१८. चढाचा हा शब्द सा. २२ मध्यें जास्त.

१९. उतरून येऊन न पावे सा.–२२ न पावेत सगजो.

२० हा शब्द सा. व सगजो मधील.

२१ अद्याप हा शब्द सा. मध्यें जास्त.

२२. भलेपणाचें सा. १८७९ व ८६.

२३. मनसुबे सा. २२ प्रत व सगजो.

२४. ऐसा चित्तांत सा. २४.

२५. प्रलापांतच सा. व सगजो प्रत; दुःखसागरांत क. प्रत.

२६. यश किवा अपेश कोणाचे स्वाधीन नाहीं. यास्तव याप्रमाणें करावें.' क. प्रत

साहेब, येवढें कर्म एक कीर्तीसाठीं करावे. दुराणीचा शह भारी. फौजेनें कार्य होणार नाही. या कार्यास खामा स्वारी[२७] गेली पाहिजे. मग दैवी असेल तसें घडेल. मृत्यु[२८] स्वदेशीं परदेशीं सुटत नाही. अथवा मेले तरी वाळवून ठेवीत नाही." असे वर्मभेद ऐकतांच नानासाहेब आपले जागा कुंठित[२९] जाहाले. चित्तांत पुरता भाव समजला कीं, भाऊसाहेब दुराग्रहास पडले. हे कोणाचें ऐकत नाहीत. म्हणोन क्षणभर भाऊसाहेबांस शांत करून सांगितले की, "दादासाहेब याची रवानगी करतों." याप्रमाणें सांगोन भाऊसाहेबास लाऊन दिल्हें. जवळ स्त्री गोपिकाबाई होती तीस बोलिले की, 'भाऊ-साहेब यांचा दुराग्रह की, दुराणीचे पारिपत्य करावयास दादाम रवाना करावें. अबदुल अली व नजीबखान रोहिला व सुजायनदौला व अहमदखान लगडा पठाण व माधवसिंग जयनगरकर व विजेसिंग मारवाडी व दुदेखान रोहिला समग्र हिंदुस्थान एकत्र जाहाले आहे. येवढी सिंदे याची लढती फौज तिचो कोण गत जालो ! मुलास आपले हातें वोपून द्यावे असे जालें आहे.' ऐकोन गोपिकाबाईनी उत्तर केले को, "दादासाहेब यास रवाना करावें.[३०] दैवी असेल तसें होईल." असे ऐकताच नानासाहेब यास विषाद आला आणि म्हणाले की, "स्त्रीबुद्धिः प्रलयंगता[३१]......स्त्रीजातीस मनसुबा पुसावा याहून अश्लाघ्यता दुसरी नाही." म्हणोन बोलोन निवान्त राहिले.

### ९३. दादासाहेब ८० ह. फौज व कोट रु. बरोबर द्याल तर जातों असें म्हणतात

दुसरे[३२] दिवशी भाऊसाहेब व नानासाहेब येकत्र होऊन दादासाहेब यास पाठवावें असा भाऊचा दुराग्रह पाहून दादासाहेब यांस बोलिले कीं, "हिंदुस्थानात सिंदे याची फौज बुडाली. तुम्ही फौज घेऊन हिंदुस्थानांत जावे आणि ताम्राचा पराभव करावा." असें ऐकोन दादासाहेब यानी उत्तर केले की, 'हिंदुस्थानांत जाणेची मला आज्ञा करावी तरी ऐंसी हजार फौजेस भर नालबंदी देऊन समागमें क्रोड रुपये खजिना द्यावा; म्हणजे आम्ही हिंदुस्थानांत जातों. मग दुराणी व आम्ही पाहून घेऊं. हें तुम्हास आनकूल पडत नाहीं तर आम्हाला साफ जावयासी पुरवत नाहीं." म्हणोन बोलोन उठोन गेले. आसें एक-दोन दिवस मनसुब्याची गडबड जाहाली. तों रघुनाथराव ह्यांचा पुरता दुराग्रह[३३] दिसोन आला.

---

२७. ह्या शब्दापुढें 'कोणीतरी' हे शब्द १८७९, ८६ सा. मध्यें नाहीत. २२ आहेत.

२८. मृत्यु शब्दापूर्वी आशा-न-ज-शी हीं अक्षरें १८७९-८६ सा. प्रतीत व सगजो प्रतींत आहेत (शी-सी) निशी पु. प्रत.

२९. खिन्न क. प्रत.

३०. ह्यापुढें 'यात हित आहे' सा. २२ व सगजो. प्रत.

३१. आत्मबुद्धिहितार्थाय गुरुबुद्धिर्विशेषतः । परबुद्धिविनाशाय स्त्रीबुद्धिः प्रलयंगता ।। हा संबंध श्लोक सगजो व तुं. प्रतींत आहे.

३२. उपरातिक सा. व सगजो. प्रतींत आहे.

३३. दुराग्रहसा सा. २२.

**९४. शेवटीं सदाशिवरावभाऊंचा स्वतः जाण्याचा निश्चय**

मग भाऊसाहेब व बळवंतराव गणपत[३४] येकान्ती बसोन मनसबा केला कीं, "दादासाहेब समागमें खजिना मागतात. दुसरे, नानासाहेब याचे चित्तात निखालस दादासाहेबांस पाठवावे असे नाही, नानासाहेब जावें न जावें या जुलमांत. त्यात रडत-राऊत घोडियावर बसविलीया पुढे जय कशास इच्छावा ?" नानासाहेब व गोपिकाबाई यांचें बोलणे येकान्ती जाहाले तेहि कर्णोपकर्णी भाऊस कळलें होतें. भाऊसाहेब याचें वचन ऐकोन बळवंतराव गणपत यानी हितशत्रुपणें निरोत्तर केलें की, 'बाहेर पैसा मिळवून घरास खजिना आणावा; तों घरचा खजिना नेइलियावर बाहेर याणी काय मिळवावें? आयत्या पिठावर रेघा कोणीहि ओढील. यदा[३५] दादासाहेब खातरजमेनें जात नाहीत.' आसे[३६] ऐकोन भाऊसाहेब बोलिले कीं, 'आता आवघा मनसबा एकीकडे ठेवावा आणि आम्हीच जाणेचे करावें. नानासाहेब याचा दादासाहेब सखा भाऊ आणि आम्ही चुलतभाऊ, आमचे मनात असे आणि त्याचे मनांत तसे यासी महत् अंतर आहे. पुढील भवितव्य असेल तसें घडो. त्यास किलाफ बुद्धि निर्माण जाहली धैर्यसमुद्र ढवळला. भाऊसाहेबांनी आपणच जावें असा पुर्तेपणी निश्चय केला

**९५. नानासाहेबांस भाऊंचा वियोग असह्य; तरी भाऊंचा जाण्याचा आग्रह**

मग भाऊसाहेब, नानासाहेब याजकडे जाऊन बोलते जाहले की, "दादासाहेब यांस जावयास आनकूल पडत नाही, त्यास[३७] खजिना पाहिजे; आतां आम्हांस जावयास आज्ञा व्हावी. आम्ही[३८] हिंदुस्थानांत जातों." म्हणोन निक्षून जाबसाल केला. नंतर नानासाहेब आपले जागी मुहूर्तमात्र, उगेच[३९] राहून भाऊंस बोलिले की,[४०] "आम्ही आपले जागां म्हणतो की, राम-लक्ष्मणाचा जोडा तुमचा[४१] आमचा भाऊपणा. तुम्ही आजपर्यंत जितकें पाणी पाजिले तितकें प्यालों. कधी तुमचा शब्द उल्लंघन केला नाहीं. आम्हांस मोकलून जाऊं म्हणता. तेव्हां आम्हास दशरथाची गत जाहली. तुमच्या वियोगानें आम्हास कांहीच सुचणार नाही." असें बोलोन डोळ्यास पाणी आणिलें. ज्या ज्या काली जे जें होणार तें चुकत नाही. नानासाहेबानीं माया-जालांत बहुत गोविलें; परंतु भाऊचें चित्त चलेनासें जालें. पुरता जाण्याचा द्रढ निश्चय जाहला.

---

३४. 'गणेश' भाइसं. व १८७९ व ८६ सा. मध्यें आहे.

३५. 'एवंच' सा.

३६. 'बळवतराव याचे बोलणे' हे शब्द आसे—च्या पुढें सा. २२ मध्ये पण ते १८७९–८६ सा. मध्यें नाहीत.

३७. हा शब्द सा. त नाहीं. भाइसं. मधील.

३८. मी सा. १८७९,–८६.

३९. निवान्त सा. प्रत.

४०. तुम्ही १८७९–८६ भाऊसाहेब सा. २२ 'हें चित्तांत काय आणले' हें वाक्य सा. मध्ये अधिक आहे.

४१. हे तिन्ही शब्द (तुमचा आमचा भाऊपणा) सा. मध्ये नाहीत. तुम्ही-च्या पूर्वी भाऊ हे संबोधन सा. मध्यें आहे.

## ९६. गोपिकाबाईंची विनवणी; तरी भाऊंचा निश्चयच; म्हणून विश्वासरावास पाठविण्याची योजना

नानासाहेब गोपिकाबाईकडे जाऊन बोलिले की, " भाऊंनी जावयाचें चितांत निश्चयरूप आणिलें. बहुत ग्लानि[४२] केली; परंतु निष्ठुरच * बोलतात. तस्मात् तुम्हांस आम्हीं सहजीं उत्तर केलें होतें तें त्याचे कानावर गेलें कीं काय हें न कळे. आमचा सागावयाचा यत्न राहिला. तुम्ही त्यांस बोलावून कळेल त्या रीतीनें शांतवन करावें;" म्हणून[४३] सूचना केली. यावर बाईंनीं भाऊंस बोलावून आणिलें आणि बोलती जाहली जे "भाऊसाहेब, आम्ही तुमचे जिवावर सुखरूप आहों. आणि तुम्ही हिंदुस्थानांत जावयाचें काय म्हणोन मनांत आणिलें? आपण शाबूद तो दुनिया शाबूद. तुम्हांस जाणें तरी आमचें देहसार्थक करून जाणें." असें ऐकतांच भाऊसाहेब यांस सतीची गत जाहली. सतीनें जावयाचा निश्चय केल्यावर मग पुढें मुलेंबाळें व संपत्ति जरी आणिली तरी वमनप्राय दिसतें तसें जाहलें. उत्तर केलें की, "बाई, तुम्ही व नानासाहेब व दादासोब शाबूद असल्यावर आम्हांसारिखे शतशा कारभारी होतील. आजपावेतों बरेवाईट जें करणें तें केलें. आता येक वेळ आम्ही हिदुस्थानांत जाऊन येतों. तुम्हीं लक्ष गोष्टी सांगितल्या तरी आम्ही जाण्याचें राहत नाही." असे ऐकतांच बाईस असें जाहालें कीं, काळजांत घाव पडतो तशी अवस्था जाहली. क्षणभर आक्रोश करून अंगावरील शालजोडी पुढें टाकली आणि उभी राहिली की "भाऊ, आम्हांस सोडून* न जावें." असे बोलतांच भाऊ विषादास येऊन निरुत्तर केलें की, "तुम्ही जातीच्या स्त्रिया. तुम्हास हा मनसबा कशास पाहिजे ? तुम्ही आपले घरातील कामधाम करून राहावें." असें बोलून अव्हेर करून रागे रागे उठोन गेले. तेव्हां गोपिकाबाईस पुर्तें कळोन आले की, भाऊ[४४] दिल्लीस निश्चयें जातात. मग गोपिकाबाईनीं नानासाहेब यांस सांगितलें कीं, भाऊसाहेब राहात नाहींत, जावयाचा निश्चय केला. आतां मिथ्या वाचा शिणविण्यांत सार्थक नाही. आतां एकच मनसबा आहे कीं, समागमें बाईस[४५] घेऊन जाणार. तेव्हां मागें त्यांचें काय आहे? दिल्लीस गेले आणि तिकडेसच राहिले तरी यत्न राहिला. यास्तव समागमें पायगुंता विश्वासराव यास द्यावें, असा दोघांचा संकेत जाहला. एवंच[४६] भाऊंचा जावयाचा पुर्ता एकान्तीं घरांतच मनसबा ठरला. तोंपावेतों बाहेर कोणास कळों दिल्हें नाहीं.

---

४२. ग्लानी = विनवणी.

*निक्षून सगजो.

४३. 'म्हणून' च्या पुढें 'गोपिकाबाईस' सा. २२.

४४. 'भाऊ'—शब्दापुढें 'आमची गोष्ट ऐकत नाहींत' मं. प्रत.

४५. 'सौ.' 'बाई' भाइसं. प्रतींत नाहीं. सा. मध्यें आहे.

४६. एवंच सा.

**९७. रंगपंचमीचा खेळ व भाऊ आपला निश्चय सांगतात**

तों फाल्गुनमास आला होता. म्हणोन हुताशनी करून रंगपंचमीचे दिवशीं तमाम मराठे व ब्राह्मण अवघे सरदार लहान थोर सर्व रंग खेळावयास आणिले. तमाम डेरे बिछाने देऊन जागोजाग आरास केली. रंग खेळावयास आरंभ केला. नृत्य, गाणें दोहींची गांठ पडली. रंगराग[४७] एकत्र जाहालें. सायंकाळ मर्यादा जो रंग होणें तो रंग जाहला. उपरांतिक हिंदुस्थानांतील वर्तमान श्रुत केले आणि सर्वस्वें भाऊंनीं आपला हिंदुस्थानचे मोहिमेस जाण्याचा निश्चय सागितला.[४८]

**९८. भाऊसाहेब विश्वासरावांस घेऊन दिल्लीकडे व नानासाहेब पुण्याकडे निघतात**

भाऊसाहेबानी मुहूर्त निकडीचा पाहिला. तों जवळ मुहूर्त निघेना. मग सिवालिखिताचे मुहूर्तानें रात्रीस बाहेर निघाले. समागमें सरदार दमाजी गायकवाड व यशवंतराव पवार व समशेर बहादूर व इभ्रामखान गाडदी व हरि दामोदर व सोनाजी भापकर, राणोजी सिंदे यांचे राखेचे पुत्र तुकोजी सिंदे व महादजी[४९] सिंदे आणखी लहान थोर सरदार शिवाय हुजरातीची पन्नास हजार फौज नेमली. भाऊसाहेबी सरदार लोकांचे चित्तांत किलाफ होता त्याचा संशय दूर केला.[५०] दमाजी गायकवाड डावे* हातीं श्रीमंतास मुजरा करीत होते. जाते समयी त्याचे गळां पडोन त्यास वचन दिल्हें की, "हिंदुस्थानातून फिरोन आल्यावर तुमचा गुता संपूर्ण उकलून देतों" म्हणोन त्याचें समाधान करोन त्यास उजवे हाते 'रामराम' करावयास सागितले.[५१] तसेंच यशवंतराव पवार यांचाहि गौरव केला आणि कित्येक थोर सरदार याचे वृत्तीचे उच्छेद केले होते; कोणाचे सरंजाम जहागिरीस खलील[५२] केल्या होत्या, त्यास वचन दिलें की, 'तेथून आलियावर तुमचे तुम्हास मोकळचा करून देऊं' म्हणोन समाधान केलें. इभ्रामखान गाडदी भाऊसाहेबांस बोलिला की, "तुम्ही गलीम लोक, दाखवाल आणि पळाल. आम्ही गाडदी लोक केवळ पायउतार.[५३] आम्हांस पळावयास पाय

---

४७. 'रागरंग' 'जाहले'च्या पुढें 'पण्यांगनांनी केवळ अप्सरांप्रमाणें गायनकला मांडिली' हे वाक्य सा. २२ मध्यें आहे व १८७९-८६ सा. मध्यें व सगजो. मध्यें पण्यांगनांनी हा शब्द वगळून इतर चार शब्द आहेत.

४८. केला भा. प्रत.

४९. विठोजी पु. क. सां. शें. प्रत. महादजी सगजो. व तुं. प्रत.

५०. 'करून' इ. १८७९ व १८८६ सा.

*छत्र० शाहु मृत्यु पावल्यानंतर कोल्हापूरकर ताराबाईंनी पेशव्यांचे विरुद्ध चालविलेल्या खटपटीत दमाजी गायकवाड यांचा हात होता. दमाजीचा बंदोबस्त नाना पुरंदरे यांच्याकरवी झाला; पण ह्या वेळेपासून दमाजी पेशवे मंडळीना 'डावे' हाताने रामराम करूं लागला होता.

५१. 'लाविलें' सा. व सगजो. प्रत 'करावा म्हणोन सांगितलें' मं. प्रत.

५२. खालसा तु. व सगजो. खाली इ. १८७९ व ८६ प्रत. जप्त सा. १९२२सा.

५३. हा शब्द भा. प्रतीमध्यें नाही.

नाहींत. आणि गांठ तों दुराणी रोहिल्यांची पडणार. याची आज्ञा काय?" ते समयीं भाऊसाहेब यांनीं इमान दिली कीं, "निदान प्रसंग पडला तरी तुम्हांस सोडून निघणार नाहीं. जेथें तुम्ही गाडून उभे राहाल तेथें मी राहीन. यास अंतर करणार नाहीं." म्हणोन त्यास बेल-भंडार दिल्हा. त्याजपासून सानकरोटी आपण घेतली आणि कूच केलें. ते समयी गोपिकाबाईनी बळे करून विश्वासराव हातीं दिल्हा. त्याजला समागमें घेऊन निघोन चालिले. ते समयी नानासाहेब व गोपिकाबाईस असें जाहलें कीं, भाऊसाहेब व मूल आजच आपणास अंतरलें. सर्वत्राचें मायाजाल सारखेंच. पुढे होणार भवितव्य विचित्र होतें. यास्तव तमाम लष्करास निरवानिरव करून येकमेकाचे गळां पडोन निघाले. अस्तु. (भाऊसाहेबांनी) फौज व चांगली घोडी, चांगले मर्द व उंच वस्त्रें व उष्टरखाना व तोफखाना व कांहीं खजिना घेऊन कूच केलें. इकडे नानासाहेब तेथून[५४] कूच करून पुण्यास आले.



५४. तेथून = आंबेपडदुराहून. तेथून हा शब्द सा. २२ प्रतींत आहे.



## प्रकरण अकरावें

# भाऊसाहेब दिल्ली घेऊन तेथील कचेरी छताचे रुपये पाडतात

### ९९. भाऊ बळवंतरावांचें ऐकून दिल्लीकडे निघतात.

भाऊसाहेब मजल दरमजल करून ब-हाणपुरास गेले. अशेरी किल्ल्यावर पांच हजार फौज भोंवताली ठेवून आपण पुढें विध्याद्रिपर्वत ओलांडून नर्मदापार जाहाले. विध्याद्रिसच सातपुडा प्राकृत अभिधान आहे. संपूर्णपणें देश खानदेश बागलाण, नेमाड ओलाडून माळवियाच्या घाटास गेले. घाट वोडसे याचे नजीक चढून माळवे प्रांती सुरज-भेलशियानजीक मुक्काम केला. तेथून जनकोजी सिंदे व मल्हारराव यासी पत्रें लिहिली की, "आम्ही मजल दरमजल यावें किंवा दम खात यावें?" म्हणोन. त्याजवरून[1] मल्हारराव यास विषाद आला की, "हे थोर खावद असतां यांणी ठिकाणी राहून फौजेचा पुरावा करावयाचा होता. त्यात[2] भाऊसाहेब कर्ते मनुष्य. ते निघोन आले. तेव्हां सान्या गोष्टी यांत आटपल्या. पुढें नानासाहेब यांस कांहीं उपराला करावयाची हिमत[3] होणार नाही. असो. खावंद आल्यास त्यास उपाय नाही." म्हणोन पत्राचें उत्तर लिहिले की[4], "आधीं येण्याचें करूं नये. मनसुबा[5] पुढें थोर आहे. रोहिला व सुज्यातदौला, आमदखान लंगडा पठाण व दुराणी व हे कांही सामान्य नाहीत. यास्तव मोहरा इरेस पडावा[6] असा अर्थ नाही. याजकरिता साहेबी माळवे प्रांती राहून[7] छावणी करावी. आणि सडी फौज पुढें रवाना करावी. आम्ही साहेबांचे दबावावरच काम उरकून घेतो" म्हणोन उत्तरे आली. ती भाऊसाहेब याणीं वाचून पाहिलीं. आणि आपले लहानथोर मुत्सद्दी बोलावून त्यांस विचार पुसला. ते समयी बळवंतराव गणेश याणी जाबसाल केला की, "भाऊसाहेब, सिंदे-होळकर या रानात बहुत दिवस श्रमून राजे जाहाले. त्यांस आम्ही आलियाचें सुख काय आहे? आम्हास दमावणी मात्र देतात. भाऊसाहेब, आपली सलाबत कांहीं सामान्य नाहीं. आपला पुण्यप्रताप या प्रकारचा आहे कीं, गिलचा स्वामींनी कानी मात्र ऐकिले; परतु द्रष्टीस पडणार नाहीं. ही खातरजमा असों द्यावी. ते निवारण होऊन जातील असा निश्चय करून कूच करून दिल्लीस पोंचावें."

---

१ 'मल्हारराव यांणी पत्र पाहून त्यास' असा बदल सा. २२ मध्यें आहे

२. 'त्याम' सा प्रत, 'त्यात' भाइसं

३. 'गदत' (?) भाइम प्रत

४. ह्या वाक्यावद्दल 'हा संदर्भ पत्री सुचवोन पत्राची उत्तरे पाठविली की येत येण्याचा करावयाचा नव्हता. पुढे प्रकरणें आहेत.' हा मजकूर क. प्रतीत आहे.

५ 'ज्यानी मनसुबा दिला ते थोर आहेत' सा प्रतीत

६ 'पाडावा' सा. प्रत.

७ 'जाऊन' भाइस प्रत.

**१००. दुराणी सैन्य यमुनापार अंतर्वेदींत आणि मराठे यमुने अलीकडे व चमेलीपार**

इकडे दुराणी गनिमांचे पाठीस लागून हैराण जाहाले. गनीम[८] यांणीं कावे देत देत अंतरवेद प्रांतीं गेले. तों दुराणीहि अंतरवेद प्रांती गेला. मागतीं यमुना उतरोन आलीकडे आले. दुराणी नदीपारच राहिला. तों ज्येष्ठ मास संपूर्ण होत आला. यमुनेस पाणी आलें. मग महजच दुराणी काळजळेश्वराजवळ राहिले. इकडे मल्हारराव व जनकोजी सिंदे केरोलीचे सुमारें चमेलीपार राहिले.

**१०१. मल्हाररावांच्या सांगण्याची हेटाळणी करून भाऊसाहेब दिल्लीकडे जातात**

इकडे भाऊसाहेब खंडण्या करीत करीत नरवर वोलाडून ग्वालेरीचे सुमारें आले. तेथून ढऊळपूर[९] चमेली घाट धाकटचा तीन मजली राहिला. निदान कुवारी नदीवर मुकाम केला. तेथून मागती सिंदे होळकर यास पत्रें लिहिली कीं, "ढऊळपूरचे घाटें उतरावे किंवा अचेरीकडून[१०] यावें याचा निश्चय करून पाठविणें." म्हणोन पत्रें सिंदे-होळकर यास येतांच पत्रे वाचून पाहिली. पत्रांतील भावगर्भ ध्यानांत आणिला. तों भाऊसाहेब क्षेपनिक्षेप आले. तेव्हा मल्हारराव याची तळव्याची आग्न मस्तकास जाऊन भाऊसाहेब यास पत्र लिहिले कीं, तुम्हास माळवे प्रांती छावणीस राहावे म्हणून लिहिलें असता येथपर्यंत यावयाचें कारण काय? तस्मात् सर्व भंवताले नूतन नव्या उमरीचे मिळाले, ते तुमच्या हिताचे आणि आम्ही वृद्ध, आमची साठीमुळें बुद्धी नाठी झाली. आम्ही आजपावेतों जितकें केलें तितकें साहेबांचे अनहितच केले आतां त्या सर्वांनी मिळोन स्वहित करावें." याप्रमाणें मल्हारराव याणी पत्र लिहून भाऊसाहेब यांस पाठविली. त्यात लिहिले "अत:पर तरी चमेलीचे पार ग्वालेरीनजीक छावणी करावी[११]. त्याजवरून भाऊसाहेब आपले जागच्या चार कारभारी यास बोलावून त्यांस विचार पुसला की, "कसे करावें ?" त्याजवरून बळवंतराव यांणी मसलत दिली की, "मजल दर मजल दिल्लीस जाऊन पोचावे." असे ऐकोन विठ्ठलराव शिवदेव यांणी जाबसाल केला की 'समागमे मुलें, माणसें आहेत. तुमचें निर्भय राज्य, म्हणोन तमाम कुटुंबें समागमे घेतली. जनार्दनपंत फडणीस यांची स्त्री काशीस जाण्याचे उद्देशें आली. तसेच धायगुडे[१२] यांचें कुटुब व आणखी कित्येक लहानथोर[१३] याचें कुटुब समागमें; आणि शत्रूची फौज[१४] भारी यास्तव मल्हारराव यांणीं लिहिलें तें मान्य करून या स्थली छावणी करून राहावे." असे ऐकोन सर्वत्र मिळोन त्यानी हास्यवदन करून विनोदे जाबसाल उडवून दिला कीं, सिदे-होळकर व अंताजी

---

८. ह्या ठिकाणी तुं. व सगजो प्रतीत पुढील वाक्य अधिक आहे. 'गलीम यांणीं धुरोला दृष्टीस पडो देईनासे जाहले.'

९. 'ढवळपूरचे मळीचा घाट' शें. प्रत. वाचनाची चूक. ढोलपूर १८७९,–८६; घाटें १८८६ सा. प्रतीत. धवलपूर ?

१०. 'अटेरी' तुं. व सगजो. प्रतींत. 'आशेरी' भाइसं. प्रत अचेरी सा. २२ प्रत.

११. ह्यापुढे 'इकडे येण्याचे करूं नये' हें वाक्य मं. प्रतीत जास्त आहे.

१२. 'पायगुडे' सा. व सगजो प्रत. इतर प्रतींत धायगुडे आहे.

१३. 'सरदार' हा शब्द सा. २२ मध्यें जास्त आहे. [१४ पुढील पान पहा.]

माणकेश्वर व विठल शिवदेव व गोविदपंत बुदेले व नारो शंकर असे सर्वत्र या रानांत सुख पावले. त्यांस आम्ही आल्याचें सुख नाहीं" म्हणोन हेटाळणी करून कूच केलें.

**१०२. मुचकुंदतीर्थाचें माहात्म्य : भाऊंचा गंभीरा नदीवर मुक्काम**

ढवळपूरचे घाटें चमेलीपार जाले. ढवळपुरानजीक मुचकुंद म्हणोन तीर्थ आहे. जे समयी देवसाह्यार्थ कालयवन दैत्यासी बहुत काल रात्रंदिवस युद्ध करून [मुचकुंदानें] दैत्य पराभविले,** त्यांत कालयवन दैत्य मात्र चुकोन राहिला होता.** त्यासि बहुत रात्रीं झोप नाही. दिवसां उसंत[१४] नाही. याप्रकारें मुचकुंद युद्धें करून श्रमला होता. यास्तव ब्रह्मा, विष्णु, महेश्वर याणी मुचकुंदास वर देते जाहाले कीं, " तूं आमचे कारणीं बहुत श्रमलास. यास्तव पाहिजे तो पदार्थ इच्छित मागावा." असे म्हणतांच मुचकुंद देवापाशीं वर मागता जाला कीं, "मी युद्ध करून फार श्रमलों आहें. यास्तव बहुत काल इच्छा पुरे तों पावेतों मजला झोंप द्यावी." असें ऐकोन ब्रह्मदेवानें हस्त मस्तकी ठेविला कीं, " सख्या,[१५] तुजला निद्रा दिल्ही. तू निजला असतां कोणी उठवील त्याजवर तुझी दृष्टी पडताच त्याणें जळोन भस्म व्हावें." म्हणोन वर देऊन त्यास ढवळपुरापासून कोसावर लहानसा पहाड आहे तेथे गुहा आहे त्यात निद्रा करविली होती. असे बहुत दिवस जाहाले होते. तों कोणें कालेंकरून विष्णूचें व कालयवन याचें युध्य जाहालें. ते समयीं ब्रह्मराक्षस कालयवनाचे बळ भारी. ते समयी बळ भारी म्हणोन विष्णूस बहुत संकट प्राप्त जाहालें कीं, ' कालयवन आपणास आटपत नाही. त्यास यत्न काय करावा" म्हणोन ध्यानांत आणिलें. विष्णु नाटकी मूर्ति. कौशल्य केले. कालयवन याच्या भयें मुचकुंद याणें निद्रा केली होती तेथें, पळत येऊन आपला पितांबर होता तो मुचकुंदावर पांघरूण घालून आपण[१६] गुप्त जाहले. तो कालयवन मागें धावत गुहेंत आला. तों निद्रागत पितांबर पांघरून विष्णूच निजला, असें भासलें. मग कालयवन दैत्य याणें रागानें लाथ हाणोन त्यास जागा केला. आणि बोलिला कीं, "चोरा, पळून येऊन दडला आहेस. आतां तुजला वांचों कसा देतों?" म्हणोन लत्ताप्रहारें ताडण केलें. मुचकुंद याणें डोळे उघडोन पाहिलें तों दैत्य भस्म जाहाला. मुचकुंद आपले जाग्यास सचिंत होऊन बसला. तों विष्णूचा धांवा केला की, "मजला ब्रह्महत्या घडली. यास यत्न काय ?" ते समयीं प्रत्यक्ष विष्णु प्रकट होऊन त्याचें समाधान केलें की, " आमचें महत्कार्य केलें. आतां तुजला ब्रह्महत्येचा दोष घडला म्हणोन चितातुर होऊं नको. तुजला यत्न सांगतों. येथून अर्धकोस दक्षणेस तीर्थ आहे. त्या तीर्थी स्नान केल्यास ब्रह्महत्येचें पातक जातें." या प्रकारचें सागोन त्याजकडून स्नान करून ब्रह्महत्येपासून मुक्त केला. त्या तीर्थास मुचकुंदतीर्थ असें म्हणों लागले. त्या तीर्थी स्नानें दानें भाऊंनीं करून कूच करून आगरियाचे रोखें गंभीरा नदीवर मुकाम केला.

---

१४. 'प्रबलता' सा. २२ व सगजो. वरील पाठ पुणें व भाइसं. प्रतींत आहे.

१५. 'संख्यारहित' (वर्षें) सा. २२ 'शंकारहित' तु. व भा. सगजो. प्रतीत.

१६. 'तेथेंच' सा. २२ प्रतींत आहे. व १८७९–८६ सा. प्रतींत नाहीं.

**१०३. मल्हाररावांचें भाऊसाहेबांविरुद्ध स्पष्ट बोलणें · आग्रा किल्लेदाराशीं करार व भाऊ दिल्लीस**

त्या मुकामी मल्हारराव होळकर व जनकोजीराव सिंदे व नारो शंकर असे खावंदास भेटावयास आले. भेटी जाहल्या. जनकोजी सिंदे याचे बहुत प्रकारें समाधान करून त्यांस हत्ती व घोडे व वस्त्रे दिली. ते समयी मल्हारराव[१७] यांणी भाऊंची मर्यादा कांही धरिली नाही. भरले कचेरीत गर्जो लागले की, "भाऊसाहेब, तुम्हास चमेली नदीपार राहणें म्हणोन लिहिलें असतां, पुढें यावयास कारण काय? चार भोंवते लोक मिळाले ते केवळ बेवकूब. मोहरा इरेस आणून घातला. परंतु आपणास काढण्याचा यत्न कोणाचे हातून होणार नाही." म्हणोन गालिप्रदानें बहुत केली. परंतु कोणी मुखांतून शब्द काढीनात. या प्रकारें होळकर बोलिले. परन्तु गोष्ट गुदरली. उपाय नाही. मग तेथून आगरियावर येऊन मुकाम केला. दुराणी, सुज्याउद्दवला, रोहिले वगैरे यांच्या फौजेचा भरणा भारी. असे ऐकोन, मुलेमाणसे समागमे आहेत, यांसी कांही आश्रय करावा म्हणोन, आगरियाचा किलेदार होता त्यासी स्नेह करोन दाहा हजार रुपये दारूगोळीस दिल्हे, आणि त्याजपासून इमानप्रमाण घेतलें की, "निदान संकट प्राप्त जाले तरी बायका आहेत. त्यास या किल्यात स्थळ द्यावे." याप्रमाणें बंदोबस्त करून गोघाटावर मुकाम केला, तों गिलज्या पलीकडे यमुनेचे[१८] तीरी नदीपार कोळजळेश्वराजवळ मुकाम होता. त्याणे कूच करून यमुनापार याच्या बरोबरीस राहिला. परंतु यमुनेस पाणी भारी. यास्तव त्याचा यत्न याजवर चालेना. यांचें[१९] कूच जाले म्हणजे त्याणेंहि कूच करून बरोबरीस उतरावे.[२०] याप्रमाणें हे आलीकडून व गिलच्या पलीकडून येतच होते. भाऊसाहेब तेथोन निघोन यमुनेचे व व वृंदावनाचे मध्यें मुकाम करून राहिले. तेथे तीर्थविधी करून छायाती सराईवरून होडा[२१] पलवलावरून दिलीस पोंचले.

**१०४. भाऊसाहेबांनीं आलिगोहरास पातशहा करून नारोशंकरास वजिरी दिल्यामुळे सुरजमल जाट निघून जाण्याच्या विचारांत**

तों दिलीचे किल्यांत रोहिले व गारदी, नजीबखान याजकडील चार हजार लोक किल्यांत होते. ते समई शहरचें वस्त्रहरण करून किल्यास मोर्चे लाविले. आणि जनकोजीराव व मल्हारराव होळकर यांणी इमान-प्रमाण देऊन सुरजमल जाठ यास[२२] भेटीस घेऊन आले.[२३] भाऊसाहेबीं यांस[२४] आडवें जाऊन सन्मान करून घेऊन

---

१७. 'मल्हारराव यांणी' हें शब्द भाइसं. मध्ये नाहींत. आणि शें. सा. २२ भा. प्रतींत आहेत.

१८. 'गंगेचे' भाइसं. तुं. प्रत व १८७९ व ८६ सा. मध्येहि आहे.

१९. 'या प्रकाराचे' याचें सा. २२ प्रतींत.

२० 'राहावें' सगजो व सा. २२ मध्यें.

२१. 'होडल' सा. २२ प्रत.

२२. 'पाचसात हजार फोजेनिशी सा. २२ प्रत.

२३ या वाक्याबद्दल 'आणि सिंदे यांस सांगितले होळकर याचें व सुरजमल जाट यांचें सौरहस्य नाहीं त्यास व सुरजमल जाट यांचें सख्यत्व करून देऊन होळकर याजपासून त्याजविशी इमान घेऊन सुरजमल जाट यास भेटीस आणविला.' हें वाक्य सां. व क. प्रतींत आहे. [२४ पुढील पानावर]

आले. तों दिलीचा किल्ला अपेशी. पांचसात दिवसांत हला करून मोर्चे लावून हस्तगत केला. त्यांत सामान व लोक होते त्यांस जीवदान देऊन सोडिलें. आणि किल्यातील अलमशहा पादशहा होता तो गाजुदीखान यानें मारून [ तो ] सिंदे याजकडे गेला होता. त्या तागाईत कोणी पातशहा तख्ती बैसविला नव्हता. मग भाऊसाहेब यांणी अलीगौर चकते याचा पुत्र चोदा वर्षाचा शहाजादा[२५] होता त्यास तख्ती बसवून त्याचे नांवें शिक्के व मोहरा व रुपये केले. सुरजमल जाट याजपासी गाजुदीखान होता.[२६] त्यास वजारत द्यावी असा सुरजमल जाट याचा आग्रह भारी पडला. तसाच सिंदे व होळकर यांचाहि पडला. परतु बळवंतराव कोणाचें चालू देईनात. नारोशंकर यांस 'राजेबहाद्दरपणा'चा किताब देऊन वजिरी त्यास सागून किल्यांतील व शहरातील कुल[२७] पारिपत्य त्याचे स्वाधीन केले. त्याजपासी पांच हजार फौज ठेविली. ते समई सिदे व होळकर यांचे चित्तात संशय आला की, "भाऊ-साहेबीं आमचें मानिलें नाही. तेव्हां सुरजमल जाट याणें काय चित्तांत आणिले असेल ते असो. या प्रकारें या हिदुस्थानात आमची अप्रतिष्ठा जाहाली. यावर पुढे आपला परिणाम काय ! म्हणोन मल्हारराव याणी जनकोजी सिदे यास विचारिलें. मग जनकोजी सिदे याणीं जाबसाल केला की, "आपले चालेनासे दिसोन आले तेव्हा हरएक मसलत आपण सागों नये. आपले जागा प्रतिष्ठेनें राहावे." म्हणोन बोलिले तैसेच सुरजमल जाट यांणी[२८] रुपराम चोधरी यांसीं बोलिला की, "गाजुदी-खान याचे वजीरीविसीं आम्ही रूबरू भाऊसाहेब यास विनंती केली. तसाच सिंदे व होळकर यांणीं आर्ज केला; परतु त्यासहि[२९] मानले नाहीं. तेव्हां या स्थळीं राहिलों[३०] मग, याणें स्वरूपनाश; अपाय होईल. यास्तव येथून हरयत्न करून निघता उत्तम

---

२४. यांस—च्यापुढे 'पांच-सात हजार फौजेनिशी' हे शब्द सा. प्रतीत आहेत. त्यांतील फरक हा कीं, 'सुरजमल जाट यास त्याच्या ५, ७ हजार फौजेसह सिदे होळकर यानी भाऊसाहेबांच्या भेटीस आणिले' आणि दुसऱ्या यास—च्या पुढील मजकुरानें फरक हा की, भाऊसाहेब ५ ७ हजार फौजेसह सुरजमल जाट यास सामोरे गेले.' वस्तुतः मुळांत वर लिहिलें तें व तसें असावें.

२५ शहाअलम २ रा ऊर्फ अलीगोहर इ. स. १७५९–१८०६ मागें पृ. २० पहा

२६. क. प्रतीत—शिंदे यांजवर—दत्ताजी शिंदे पडल्यामुळे—वख्त गुदरला; तेव्हा जाट याचा आश्रय करून जाटाजवळ होता.' असें वाक्य आहे.

२७. 'कुल मुकत्यारी' क. प्रत.

२८. 'आपला वकील' हे शब्द भाइसं. मध्यें नाहींत; सा. २२ मध्यें आहेत. 'रूप-राम कटारी' सा. व 'रूपराम चौधरी, भाइस.

२९. 'मग त्यासहि' सा. प्रत. 'परतु त्याणी' हे शब्द सा. २२ मध्यें आहेत.

३०. 'राहिल्याचे स्वरूप नाहीं.' सा. २२. राहणें नीट दिसत नाहीं, हें मं. प्रत; 'राहिल्यानें' शें. प्रत.

आहे." म्हणोन मनसबा केला. परंतु सिंदे व होळकर यांचे नजीक राहणें.[३१] जावयाचा उपाय नाहीं. म्हणोन[३२] चिंतातुरच होते.

**१०५. भाऊसाहेब तख्त कचेरीचें छत काढून त्याचे रुपये पाडतात**

तों 'विनाशकालीं विपरीत बद्धि' तैसा विचार घडला. गोविदपन्त बुदेले यांसी तगादा करून पंनास लक्ष रुपये भाऊसाहेबानीं मागितले. त्याणीं समय जाणून आणावयास जातों म्हणून पाराजीपन्त वाघ व आपण बुदेलखंडांत गेले. यांहीं खर्चाची तंगचाई, म्हणोन पादशहाचे तख्तावर[३३] रुप्याचें छत होतें, त्याजवर सोनेरी वर्खी मुलामी काम होतें, त्याजवर भाऊंची नजर होती. मनात विचार केला की, हें छत आहे, हें काढून फौजेस रोजमुरा द्यावा म्हणौन मसलत ठीक केली. छताचे जाग्यास उगाच फळचा द्याव्या; म्हणोन सिदे, होळकर यास व सुरजमल जाटास विचारणा केली. ते समयीं सुरजमल जाट याणें अर्ज केला की, "भाऊसाहेब, पादशहा तख्ताची जागा मर्यादेची आहे. पूर्वी नादरशाई जाहाली होती ते वेळेस तख्तावर कवच[३४] सोनेचें होतें तें नेलें. परंतु छतास हात लावला नाही त्याजवर खंदारचा पादशहा आबदल आली दोन[३५] वेळां चालोन आला. त्याणें तोफा देखील[३६] नेल्या परंतु याची मर्यादा राखिली. प्रस्तुत पादशाही उमराव तुम्हापासीं आहे. आम्हा देखत ह्या गोष्टी होऊं नयेत. ह्या गोष्टीने आम्हास येश येणार नाहीं आणि स्वामिद्रोहो पदरीं पडेल. यास्तव आजीचे[३७] प्रसंगी एवढी जोड मजला द्यावी. तुम्हांस खर्चास टंचाई जाहाली[३८] तरी मजला आज्ञा करावी मी पांच लक्ष रुपये साहेबांस देतों." असें ऐकताच भाव जाहला की, पाच लक्ष रुपये देतो तेव्हां कांहीं अधिक असेल. म्हणोन त्याचा अव्हेर करून कचेरीचें संपूर्ण छत काढिलें.[३९] झाडून रुपये वजन केले. तों तीन लक्ष रुपये भरले. ते समयी भूमिकंप जाहाला. जन वाईट शब्द बोलूं लागले. आणि उल्कापात जाहाला म्हणतात. ते समयी बहुतांस वाईट वाटलें. सुरजमल जाट याणें हुजूर जाऊन विनंती केली की, "भाऊसाहेब, आम्ही जवळ आसतां तुम्ही

---

३१. 'राहणें' या पुढें क. प्रतीत 'तेव्हां निघोन जाण्याचा योग कसा घडेल ? तें उभयतां एकाच खावंदाचे चाकर. आपला स्नेह उभयतांचा खरा. परतु न कळे. त्यांस विचारल्याशिवाय आपण जाण्याचा योग केला आणि त्यास समजलें असतां आपले पदरीं बेमानी येईल. आणि ते फौजबंद. एखादे त्याणी पिच्छा आपला केल्यास जड जाईल. परिणाम लागणार नाहीं.' असें आहे.

३२. मं. प्रतींत 'या प्रकारें' हा शब्द आहे.

३३. 'वरचे कचेरीस तळहाताइतका [पत्रा] मोठा होता' सा. 'झाडून छत्र रुप्याचें होतें. तळहाताइतका मोठा [थर] होता' सगजो.

३४. कळस तुं. व १८७९ व ८६ सा. प्रतींत आहे.

३५. हे दोन शब्द भाइसं. मध्यें नाहींत.

३६. काढून सगजो. गाळून पु. प्रत.

३७. अर्ज करतों कीं सगजो. आर्जाचे भाइसं. आजचे शें. व सा.

३८. टंकशाही जाहाली. सगजो. तंग-चाई सा. 'जाहाली असली' सा. २२ व 'असली' शब्द १८७९ व १८८६ सा. मध्यें नाहीं.

३९. 'कचेरीचा छत काढिला' असा पुल्लिंगी प्रयोग तुं. प्रतीचा सर्वत्र आहे.

तख्त विध्वंस केलें, तेणें[४०] आम्हांस दूषण. ज्या गोष्टीचा तो आर्ज आम्ही साहेबास करावा ते समयीं आपण अव्हेर करावा. आमचे चित्तांत हिंदुधर्म[४१] आहे. राज्य स्वस्थ राहावें. तुमचें आमचें इमान राहावें. यमुनेंचे पाणी हातांत घातलें त्याचें सार्थक हेंच कीं काय ?"

**१०६. सुरजमल व भाऊसाहेब संभाषण : भाऊंचें निष्ठुर बोलणें**

ते समयीं ती गोष्ट भाऊसाहेबानी[४२] टाकून सिंदे-होळकर समस्त बोलावून मनसुबा केला कीं, " यमुनेस पाणी भारी; दुराणी नदीपार[४४] राहिला. सध्या कुंज-पुऱ्यांत कुतुबशहा व आमदखान[४५] कतलबाज असे पंधरा हजार फौजेनिसीं बलाऊन राहिले आहेत. प्रस्तुत त्यांचें पारिपत्य काय करावयाची तजवीज काय ?" असें म्हणतांच मागती सुरजमल जाट याणें प्रत्योत्तर केलें कीं, "आमचें ऐकाल तरि छताचें रुपे काढिलें तरी तें मागती छत स्थापित करावें, तेणें करून आपला जय होईल. दुसरें, गाजुदीखान याची वजिरी त्याची त्यास द्यावी. ये विसीं सिंदे व होळकर याचें व आमचें इमान-प्रमाण गुतलें आहे. पुढें आणखी छोटा-मोठा आर्ज ऐकत जावा. म्हणजे मी सर्वस्वीं तुमचे पदरी आहें. लागेल तो दाणा व साहित्य[४६] पुरवीन. दिली[तू]न जाऊं नये. येथूनच सर्व मा़ार मसलती कराव्या. कदाचित् कुंजपूरचे पारिपत्य करणें तरी करावें[४७] परंतु[४८] तेथें शहास गुंतू नये." या प्रो मसलत दिली. पुढील होणार बलवोत्तर.[४९] भाऊसाहेब याणी उतर[५०] केलें की, आम्ही कांही दक्षण सोडून तुमचे बलावर आलों नाहीं. आमचे चित्तास येईल तें करू. तुम्हीं राहाल तरी राहावें. नाही तर आपले ठिकाणास जावें. गिलच्याचे पारिपत्य केल्यावर तुम्ही आम्ही पाहून[५१] घेऊं." आसा निष्ठुर जाबसाल होताच सिंदे होळकर यांस वाईट वाटले. आणि आपले जागां स्तब्ध राहिले. उपरान्तिक सुरजमल आपले जागा अजुरदा होऊन आपल्या डेऱ्यास गेला. चितांत विवंचना[५२] करिता झाला कीं, " मी आलों हेंच मूर्खपण केलें, आतां जाण्याची तजवीज कोणत्या अर्थें होईल ?" म्हणोन महासंकटीं पडला.

---

४०. तेणे करून शें. येणें करून सा. २२ तेणें भाइसं.

४१ ह्या ऐवजी 'की हिंदुधर्म राज्याधिकारी आहेत ते स्वस्थ असावे हें आमचे चित्तीं' क. प्रत

४२. 'जाट यास उत्तर कांहींच केलें नाहीं. तसेंच ठेविलें' क. प्रत.

४३. समग्र सा. १९२२.

४४. यमुनेपार सा. १९२२.

४५. सैयद महमद क. प्रत. सलाबतखान शें. प्रत. महमदखान. सा. १९२२, अहमदखान सा. १८७९ व ८६

४६. तोफासुद्धां भा.

४७. कदाचित तुम्हांस कुंजपुरियाचें पारिपत्य करणें तरी लक्ष प्रकारें करावें' सा. १९२२ 'तुम्हांस'च्या जागी 'आम्हांस' पुणे प्रत.

४८. खांसा स्वारी खुद्द सां. व क. प्रतीत. 'आपण'च्या जागी 'परंतु' हा शब्द असून 'शहास' हा सा. १९२२ त नाहीं.

४९. या शब्दापुढें 'तदनुसार' हा शब्द शें. प्रतींत आहे.

५०. जाबसाल सा. १९२२.

५१. समजून घेऊं सा. २२०.

५२. विवंचना सा. १९२२.

### १०७. मल्हारराव व जनकोजी सुरजमल जाटास निघून जाण्यास सुचवितात

इकडे भाऊसाहेब यांणी कुंजपुरावर जाण्याचा निश्चय केला. मल्हारराव व जनकोजी सिंदे डेऱ्यास आले. ते येकत्र येकान्ती बसून मनसबा केला कीं, जाटास आम्ही इमान देऊन आणिलें. भाऊंची मर्जी तो अति[५३] कठीण बळवंतराव व भाऊसाहेब याणीं पुरता मनसबा केला की, सुरजमल जाट यांस कैद करून त्याचा गोट लुटून टाकावा. हा मार[५४] खचित जाहला. आतां हरतऱ्हे यत्न करून सुरजमल जाट यासी काढून द्यावा. मग या निमित्ये आम्हांसच काय करितील तें करोत. असें बोलून रूपराम कटारी, सुरजमल जाट यांजकडील वकील, यांस बोलावून आणोन सांगितलें की[५५] "तुम्ही आज रात्रौ हर तरा करून कूच करून निघोन जावें. भाऊसाहेब याचा गोट लांब आहे. त्यांस कळों न देता निघोन जावें. इतक्यावर तुमचें आमचें इमान उगवलें. इतःपर आम्हावर शब्द नाही." म्हणोन कानांवर हात ठेविले.

### १०८. सुरजमल निघून जाणें : सिंदे-होळकरांची त्यास अनुमती : भाऊसाहेब अस्वस्थ

याप्रमाणें बोलणे ऐकून रूपराम कटारी आपले गोटास गेला. सविस्तर अर्थ सुरजमल जाट यास सागितला. त्यानें उत्तर केलें की, "दोहींकडून अवघड आहे. आजचे प्रसंगी दैवयोग करून निभाऊन गेलो तरी सर्वस्वें भाऊसाहेब याचे द्रोही जाहलो. गिलच्यांचें पारिपत्य दैवयोगें जाहले तरी आम्हास पुरताच क्षय आला. आधीच भाऊसाहेब बहुतच[५६] आग्रही; मग आम्हांस आश्रयहि कोणाचा नाही. या गोष्टीचें भय धरून राहावे, तरी सध्यांच बंदी पडावें. या दोन्ही संकटाचा अर्थ काय करावा ?" रूपराम कटारी यानें उत्तर केलें की, "येक आणी चुकी तो बारा बरसकी हयात" असा पूर्वीपार बोल[५७] प्रसिद्ध आहे. प्रस्तुत बचाऊन जावें. पुढे इकडे भाऊसाहेब आणि तिकडे आबदुलअली दुराणी दोनीहि बलिष्ठ[५८] आणि दोघाची सुकृतेंहि ताजव्यात घातली आहेत थोडेच दिवसांत याचा निवाडा दिसोन येईल. तों पावेतों आम्ही आपले जागां दम बांधोन स्वस्थ राहावें. पुढे जयरामजीचे चितास येईल तें सुखरूप होऊं. उद्याची फिकीर आज कशाला ? सध्या निभावणी होईल अशी निघण्याची मात्र सवलत फते करावी[५९] तेव्हा[६०] आज रात्रीस निघावे" म्हणोन निश्चय केला. मग प्रहर रात्र गुदरलियावर गुप्तरूपे हतीच्या घाटा काढून, डेरे दांडे[६१] पाडून

---

५३. केवळ सा. १९२२ व शे.

५४. या शब्दापुढें "याचे मनातील" हे शब्द सा १९२२ त अधिक आहेत; सा. १८७९ व १८८६ त नाहींत.

५५. यापुढें क. प्रत. म्हणजे "येथील दरबारचा रागरंग पाहतां ठीक दिसत नाही. तुम्हास तरी आम्ही इमान प्रमाण देऊन आणिले. तुम्हीं देखली वाट पहावी."

५६. पुरतेंच सा. २२.

५७. 'आहाणा' सा. 'बोल' क व भाइसं

५८. सबळ अनुष्ठानी सा. १९२२.

५९. यापुढें 'जे होईल तें सुखे होऊं' हें वाक्य सा २२ त अधिक आहे.

६०. 'परंतु' सा. २२.

६१. 'तडे पासून' भाइसं. 'तली पाडून. भा. प्रत.

निघाले. जवळ सिंदे-होळकर होते,[६२] त्यांणी काना डोळा करून चार कोस गेलियावर मग होळकर यांजकडील दिवाण गंगोबा तात्या कचेरीस जाऊन वर्तमान सांगितलें कीं, "सुरजमल जाट गुप्तरूपे कोणास न कळतां पळून गेले. आम्हांकडील[६३] फौज पाठलागास गेली.[६३] आपणहि फौज रवाना करावी." असें ऐकतांच भाऊंनी फौज सिध केली. फौज तयार होईतो[६४] आणखी चार-सहा घटिका लागल्या. इकडे सिंदे-होळकर यांची फोज निघोन गेली तो सुरजमल जाट सडा झाडून रामगडास पोंचला. मागें थोडेंबहुत हजार पांचशे बुणगे सांपडले ते लुटून आणिले. असो. या प्रकारे जाट तो निभाऊन गेला. इकडे भाऊंसहि पुरतें समजलें की, "सिंदे-होळकर याचे अनुमता-शिवाय जाट गेला नाही. असो. आता गोष्ट आपले चितातच राखावी." म्हणोन आपले जागां राग शात[६५] करून राहिले कचेरीस मात्र बोलिले की, "ईश्वरसतेकरून दुराणीचें पारिपत्य जाहालियावर जाटाचें[६६] अधिकोत्तर काय आहे ?[६७]

---

६२. 'होते' यापुढे 'परंतु' हा शब्द सा. २२ त अधिक आहे.

६३ या वाक्याबद्दल "आम्हाकडील' छबिनेवाले यांणी आम्हासहि न कळविता जाट याचे पाठलगास दौड करून गेले आहेत" हे वाक्य सा. व क. प्रतीत आहे.

६४. 'ताकीद करावयासि व फौज तयार होऊन निघावयासि' सा. २२

६५. 'शांतवन' भाइसं.

६६. 'अधिक पदार्थ' सगजो.

६७. येथून तुगार प्रतीचा पाठ निराळा आहे तो असा :—

"खामाखाय जाट होता की नाहींसा करीन तरीच जातीचा ब्राह्मण" म्हणोन प्रतिज्ञा केली. याप्रकारे सध्यां निधान हातीचें गमावले. उपरान्तिक भाऊसाहेबी नारो शकर किल्ल्यात ठेविले. त्याजपाशी किल्ल्यांत दोन हजार फौज, प्यादे व हजार गाडदी व शहरचे गिर्दनबाजीस पांच हजार फौज ठेवून मजल दरमजल कूच करून कुजपुरियास जाऊन पोंचले. तों दुराणीची फौज पलीकडे यमुनातीरीच होती. कुंजपुरियास पोहोंचलियावर दुराणी (यांणी) नदी उतरावयासि बहुत तल्लास केला. परतु भाऊसाहेब यास तेव्हा यश घ्यावयाचे होते; यास्तव त्यास यमुनेने वाट दिली नाही. मग रोहिले दुराणी यांनी मनसबा करून कमाऊच्या पहाडानजीक यमुना उतरावी म्हणोन दोन दिवसांत ऐंशी कोस कच्चे पहाडाच्या सुमारास गेले. तों तिकडेहि उतार सापडेना ! म्हणून तों निवान्त दोन रोज तिकडेच राहिले. इकडे कुंजपुरियाभोवताल्या फौजा उभ्या राहिल्या. तो कुतुबशाहा व समंदखान कत्तलबाज आंत होता. त्याणी काही गांवांत सामान टाकून बाहेर निघावे. तें न करिता झाडून सामान बाहेर काढून युद्धास तोंड लाविलें. बाहेरील गनिमाच्या तोफाचा व हस्तनाला व सुतरनाला व जेजाला व बरखंदाज बाणाचा मार अतिशयेकरून जाला तो ते थोडके आणि गनिमांच्या फौजा भारी शिंदे-होळकर यांजकडील त्यांणी कत्तल फार केली होती; यास्तव केवळ हे दातनिकसीस आले. इभ्रामखान गाडदी निजाम अली पाशील रहवाई त्याणें एकीकडून चालोन घेतले. मोठीशी दोन घटकापर्यंत मारामारी झाली.

## प्रकरण बारावें

# मराठ्यांचा कुंजपुऱ्यावर हल्ला व पाणिपतावर तळ

### १०९. भाऊंचा कुंजपुऱ्यावर यशस्वी हल्ला

(मग) खासा भाऊसाहेब व बलवंत गणेश व जनकोजी सिंदे व मल्हारराव होलकर व दमाजी गायकवाड व यशवंतराव पवार[1] व विट्‌ठल[1] सिवदेव व समसेर बहादर व इभ्रामखान गारदी व आणखी सरदार सर्वत्र मिलोन मनसबा केला कीं, "कुतुबशाहा व सैंदखान[2] कतलबाज कुंजपुरीत आहेत. त्यांचेकडे जाऊन त्यांचें पारिपत्य करावें व कुंजपूरचा किल्ला खणून टाकावा." असी मसलत करून मुहूर्त पाहून कूच दर कूच मजल दरमजल करून कुंजपुरानजिक गेले. त्यांची बातमी होती. ते सावधच होते. तयार होऊन शहर सोडून फौजेसुद्धा बाहेर आले. त्यांची याची गांठ पडली. त्यांजकडील[3] व यांजकडील तोफांचा व बाणाचा मार जाहाला. गर्दी होऊन गेली. कोणीकडूनहि घोड्याचें तोंड आत सिरकेनासे[1] जाहले. माणसास माणूस दिसेनासे झाले. मोठी खणाखणी जाहाली. येक प्रहर युद्ध जाहाले. ते समयी भाऊसाहेब यांणी बलवंतराव यासी आज्ञा केली कीं, "तीन टोळ्या करून हल्ला करावा." त्याजवरून तीन[4]

---

१. 'पवार व विट्‌ठल' हे तीन शब्द भा इ. सं. मध्यें नसून सा. १९२२ मधील आहेत.

२. सैमदखान—सा १९२२ संमदखान—तु. प्र. अहमदखान—पु. प्रत.

३. 'उभयतां लष्करांतील' हे शब्द 'त्यांजकडील व यांजकडील' या शब्दाबद्दल—मडळ प्रतीत आहेत.

| ४. | १ | २ | ३ |
|---|---|---|---|
| भा. इ. सं. | दमाजी गायकवाड | इभ्रामखान गाडदी व समशेर आली | खाजगी फौजेनिसीं बलवतराव |
| सा. १९२२ | समशेर बहादर दमाजी गायकवाड व नारो शंकर | यशवंत पवार व इभ्रामखान गाडदी | ० |
| कल्याण प्रत— | दमाजी गायकवाड | समशेर बहादर | खाजगी हुजुरातीनिसीं बळवंतराव गणेश व इभ्रामखान गाडदी |
| तुगार प्रत— | इभ्रामखान गाडदी | ० | ० |

याप्रमाणें चार प्रतींतील तिन्ही टोळ्यांतील विभागणी होते, सा. १९२२ मध्यें तिसरी टोळीच दर्शित होत नाहीं. आणि नारो शंकर जो दिल्लीस ठेविला तो पहिल्या टोळीत व यशवंतराव पवार हा जो इतर कोणतीच प्रत देत नाहीं तो दुसऱ्या टोळीत दाखविला आहे. कल्याण प्रतींत तीन टोळ्या आहेत, पण व्यक्तींची थोडी अदलाबदल दिसते; म्हणजे इभ्रामखान जो दुसऱ्या टोळींत आहे तो या प्रतींत तिसऱ्या टोळींत दाखविला आहे, आणि तुंगार प्रतींत दुसऱ्या व तिसऱ्या टोळींचा उल्लेखच नाहीं.

टोळ्या केल्या. येक बाजूस दमाजी गायकवाड व येक बाजूस इभ्रामखान गारदी व समशेर आली व खाजगी फौजेनिसीं बलवंतराव असें तिहींकडून चालून घेतलें. दोन घटिकांपर्यंत मोठी मारामारी होऊन कुतुबशहाकडील[5] चागले मनुष्य[5] तितकें सिकस्त जाहालें. मग गलिमांनी चहूंकडून 'हर हर' म्हणून घोडी घातली.[6] ते समयीं मोठी धुदी जाहाली. बाहेरील सामान गांवांत जाऊन पावलें नाही. तों चोहोंकडून हल्ला होऊं लागला. तें दिवसीं मराठे यांनीहि कांही चितात खंत[8] आणली नाही. जितके हाताखालीं सांपडले तितके ठार मारिले. त्या हल्यात[9] पांच-सात हजार मनुष्ये त्यांजकडील ठार जाहालीं. तैसेंच घायाल जाहाले. मुडदे व घायालांचा ढीग एकत्र जाहाला. शहरपन्हा खालीं होता तो हल्यासरसा चढोन गांवांत पोहोंचला. गांवांतील चिधीचोळा केला. कुंजपुऱ्यावर यांची वस्ती आबाद होती.[10] लूटहि मुब्रलक सांपडली. नजीबखान रोहिला याचे व्याही व जावई कुंजपुरीत होते, हस्तगत जाहाले. ते धरून आणिले. इकडे कुतुबशाहा, गायकवाड यांच्या फौजेत जिवत सापडला तैसाच सैद आमदखान कतलबाजहि सांपडला. भाऊसाहेब व जनकोजी सिंदे व मल्हारराव होलकर येक जागा होते. लुटीची गर्दी जाहाली. कोणी घोडी, कोणी उंट, कोणी हाती, कोणी बैल ज्याचे दैवी होतें तसे सांपडले. दताजी सिंदे पडले ते समयीं जवाहर गज हती कुतुबशहा याजकडे सापडला होता तो कुंजपुरीत होता. आनायासें करून जनकोजी सिंदे याजकडे सांपडला; ते दिवशीचा सिंदे याचा आनंद कोठवर वर्णावा ? आसो.

**११०. दत्ताजी सिंद्यांस मारणाऱ्या कुतुबशाहा इत्यादींचा वध.**

इकडे दमाजी गायकवाड यांणी कुतुबशाहा हतीवर बसवून भाऊसाहेब याजकडे लावून दिल्हा. पुढें दिवाण येऊन भाऊसाहेब यांसी सागितलें की, "कुतुबशाहा आम्हाकडे सापडला, तो आपणाकडे घ्यावा" म्हणोन सागितले. तोहि नजीक येऊन पोंचला. त्याजकडे पाहतांच भाऊसाहेब यास रागाचा आवेश येऊन सर्व अंगास रोमाच आले. आणि बोलते जाले की, "या मात्रागमनियास एवढे प्रतिष्ठेनें कशास आणिलें ?" असें गालिप्रदान करून "हतीवरून लोटून देणे." म्हणोन आज्ञा जाली. ते कुतुबशाहा याणे ऐकोन आपणच हतीवरून उडी टाकिली "धरून जवळ आणिला" ते समयी भाऊसाहेब यांणी त्यास विचारिलें की, "आतां खबर काय आहे ती बोलणें" असे म्हणतांच कुतुबशाहा याणें विचारणा केली कीं, "आतां आपण याच्या कबजेत

---

५. हे तीन शब्द सा. २२ मध्यें अधिक आहेत. भा. इ सं. मध्यें नाहीत.

६. यापुढें "एकच धोंशा केला" हें वाक्य सा. १९२२ मध्यें व "चालोन घेतलें." हें वाक्य शे. प्रतीत अधिक आहे.

७. यापुढें…तोंडें लागून लांडगेतोड झाली. "मग चोहोंकडून" हें शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

८. करुणा सा. १९२२ व सगजो.

९. 'त्या हल्ल्यांत' या शब्दांबद्दल 'ते समयी' हे शब्द सा. १९२२ त आहेत.

१०. 'अपूर्व'—सा. १९२२ 'चागली संपन्न' सा. प्रत.

११. 'गत' सगजो.

१२. 'अजीत' भा. इ. सं. 'आता आजिज' सा. १९२२.

सांपडलों आहें. अजीज होऊन बोलिलों तरी मजला कोणी वांचवीत नाहीं.[13] म्हणोन प्रत्योत्तर केलें की, "तुमचे चितांत काय मजकूर आहे? तुम्हीं सला करणें तरी मजला वांचवावें. म्हणजे मर्जीप्रमाणें दुराणी व रोहिला यांचा [व तुमचा] सला करून देईन. हें न होये तरी पन्नास लक्ष रुपये घेऊन मुक्त करावे. तुम्हांस युद्ध करावयाची हिमत असली तरी खंडणी करावी आणि घेऊन मजला सोडावे आज-पासून पंधरा दिवसांत पंचवीस हजार फौजेनिसी लढाईस तुम्हासी सिद्ध आहें." मागती भाऊंनी विचारिले कीं, "दत्ताजी सिंदे याचा शिरच्छेद तुम्हीच केला की काय?" हें ऐकोन कुतुबशाहानें चितात विचार केला की, "हें वर्म काढिलें, तेव्हा आपणास प्राणानिसी सोडीत नाहीत. अजीज होणें हा मूर्खपणा" जाणोन बोलता जाहला कीं, "आम्ही आपला स्वधर्म केला. आमचे कुराणात निश्चय आहे की, शत्रूचा शिरच्छेद करून भालग्रास सिर टोंचून मग शाहादाने वाजवावी याप्रमाणे वर्तणूक केली." असे ऐकून भाऊसाहेब यांची तलव्याची आग मस्तकास गेली. अंग रोमाच जाले. क्रोधाची सीमा जाहाली. क्रोध समुद्र ढवळला. आणि आज्ञा करिते जाहाले की, "ढालेपाशी नेऊन याचा शिरच्छेद करावा" हे ऐकोन मल्हारराव व जनकोजी सिंदे याणी अर्ज केला की, "यास वाचवून याचे हातून महत्कार्य सपादून घ्यावें यास मारलियाने दत्ताजी सिंदे उठत नाहीत." म्हणोन विवेक करून सांगितले. परंतु भाऊसाहेब यास विषादअग्नि शमेनासा जाहाला "सिरछेद करणे" म्हणोन आज्ञा एकदाच केली मग ढालेपासी नेला. कुतुबशाहानें पाणी प्यावयास मागितलें तेव्हां पाणी पाजावे हे विहित होय; परंतु दत्ताजी सिंदे याचें वर्तमान ऐकोन सर्वांस विषाद सारखा आला. कोणास करुणा आली नाहीं. निष्ठुरपणे बोलिलें की, "या मात्रागमनियास लघुशंका प्राशन करवणे." असे बोलून तात्काल सिरच्छेद केला. त्यास गोरकफण प्राप्त जाहालें नाहीं. ढालेपुढें काक जंबूक याणी खाला. तसाच सैदखान[14] कतलबाज सापडला तोहि याजप्रकारें मारिला. दोनी सरदार पंधरा हजार फौजेचे मारिले.

### १११. नजीबखानाच्या व्याह्यांकडील लूट : किल्यास खणती : दिल्लीस जाण्याच्या मल्हाररावांच्या सूचनेची अवज्ञा

उपरान्त कुंजीपूरियाचें वस्त्रहरण केलें. लूट मुबलक ज्याचे दैवी जशी तसी सांपडली. किल्यात नजीबखान याचा व्याही व जावई होता. तोहि हस्तगत करून त्याचीं मुलें माणसे द्रव्याचे आशेनें बोटास पलिते लाविलें कीं, 'नजीबखान याची ठेव काय असेल ती दाखविणें' म्हणोन फारच हाल केले. तेव्हां पंधरा लक्ष रुपयांची मालिस्त[15] दाखविली. मग त्यांस कैदेंत ठेवले. भाऊसाहेब याणीं मुक्काम करून तेथें राहिले कामाठी बेलदार लाऊन कुंजपुरीचा किल्ला व शहरपन्हा ढासळून टाकिले. ते समयी भाऊसाहेब व बळवंतराव याणीं येश-प्राप्तीचा संतोष मानून परस्परे बोलते

१३ यापुढें 'मग व्यंगोत्तर कां बोलावे' हें वाक्य ज्ञा. १९२२ त अधिक आहे.

१४ 'सैमनखान सा. १९२२.

१५. 'माया' तु. 'खजिना' सां. 'दोलत' क प्रत.

जाले कीं, "सिंदे-होळकर यांनीं आम्हांस दुराणीची सलाबत सांगितली,[१६] ते दुराणी काय जाले ?" बळवंतराव यांणीं उत्तर केलें कीं, "सुरंजेचे मुकामी साहेबांस बोलिलों होतों कीं, 'सिंदे-होळकर आम्हांस धुडावितात'[१७] परंतु गिलचे आम्ही कानी मात्र ऐकू. परंतु दृष्टीस पडणार नाहीं. साहेबाचा पुण्यप्रताप थोर.[१८] बोलून संतोष मानिला. मग सिंदे-होळकर डेरियास येऊन अर्ज केला की, "हे महत्कार्य साहेबी करून येश संपादिलें. आता कूच करून दिल्लीस जाऊन पोंचावें यात उत्तम आहे." असे ऐकून बळवतराव याणीं उत्तर केले कीं, "सुभेदार, तुमचे आगीं दुराणीचे भय शाहारे म्हणजे हीव आगात शिरले तें आद्यापि जाईना ! हें मल्हारराव याणीं येकोन विषाद येऊन, तो स्पष्टवक्ता, त्यास कोणाची परवा नाही आणि कृत्रिमीहि नव्हे.[१९] मग बोलिला की, "तुम्ही[२०] ब्राह्मण जात, निर्बल,[२०] कांही आकाश फोडून आलां नाही. पचाननाची गांठ पडली नाही तो[२१] हें बोलणें बोलतां." म्हणोन बोलोन रागेरागें डेऱ्यास गेले. भाऊंनीं बोलण्याचा विषाद मानून 'दुराणीशी फितूर' म्हणोन विकल्प चित्तांत आणिला. आसो. पुढील होणार बलवत्तर कोणाचाहि उपाय नाहीं. ते समयी दिलीस प्रविष्ट होते तरी अवघड[२३] न पडतें कुंजपुरीस[२४] खणत्या लावून तेथे स्वस्थ राहिले.

**११२. अबदली ससैन्य यमुनेअलीकडे येतो : भाऊसाहेबांचा दिल्लीस गोल बांधून जाण्याचा विचार**

इकडे नजीबखान व दुराणी यांणी कुंजपुरीचें वर्तमान कुतुबशाहा व सैदखान कतलबाज याचें सिरछेदाचें ऐकोन, दातांनी ओंठ चावून मनगटें तोडू लागले. "आतां[२५] जीव ठेवणें हे उचित नाही. म्हणोन सर्वत्रानी मसलत करून तेथून कूच करून, कच्चे साठ कोस भूमी एक वेळ एक रात्र चालोन, पाणिपत कर्णोल येथें यमुनेस गचक्या उतार होता, तेथें पुढें हत्तीवर हस्तनाले व उंटावर सुतरनाले व बाणाच्या कैच्या अशा पुढे घालून सडी फौज झाडून अलीकडे उतरली. मागोन तोफखाना व बुणगे झाडून उतरले. हें वर्तमान भाऊसाहेबांस कळले नाही. ऐसा प्रकार. अकस्मात् विघ्न उतरले. इतकियांत पाणीपत कर्णोल यात भाऊसाहेबाची ठाणी

१६. 'घातली' सा. १९२२.

१७. 'दुराणीची घालितात' क. प्रत.

१८. या प्रकारचा आहे' तुं. प्रत.

१९. 'अंगी कृत्रिमहि नव्हतें' साने १९२२.

२०. याबद्दल 'तुं ब्राह्मण, जातीनें निर्बल तु. प्र 'तुम्ही ब्राह्मण आधींच निर्बळ. तुम्ही वेद म्हणावयाचे उपयोगी. या गोष्टींची तुम्हास माहितीच नाही. तुम्हामी काय बोलावे ?" सा. प्रत

२१. 'तंवर जंबुक गर्जना करतो' सगजो. 'तोच वलगना करतां' सा. १८७९ त 'गांठ पडलियावर शुद्धहि निघून जाईल' हें वाक्य सा. १९२२ त अधिक आहे; पण १८७९ व १८८६ त नाही.

२२. या शब्दापूर्वी 'तेथे हा शब्द सा. १९२२ त व 'त्यास' सा. १८७९ व १८८६ त अधिक आहे.

२३. 'अवघडच होते' भा.

२४. 'सिदे होलकर याचा सागण्याचा अनादर करून' हे वाक्य क. प्रत.

२५. हा मजकूर म्हणजे जवळ जवळ २० ओळी भाइसं. मध्ये नाही. सा. १९२२ मधील हा घेतला आहे. आणि सगजो. मध्येहि हा असावा.

होतीं, तीं पळोन लष्करांत[२६] दाखल जाले. तेव्हां हें वर्तमान भाऊंस कळलें. ते समयीं भाऊंनीं तमाम उमराव मल्हारराव होळकर व जनकोजी सिंदे व दमाजी गायकवाड व यशवंतराव पवार, विठ्ठलराव सिवदेव व अंताजी माणकेश्वर व समशेर बहादूर व इभ्रामखान गाडदी व सोनाजी भापकर (व) या वितरिक्त आणखी लहान थोर सरदार बोलावून विचार केला कीं, "दुराणी एकाएकींच यमुना उतरून अलीकडे आला. तस्मात् त्याचा जोर भारी. तेव्हां. उमेदीनें आला. आतां यास यत्न काय करावा?" हे मल्हारराव यांणीं ऐकून उतर केलें की, "हा विचार बळवंतराव यास विचारावा. आम्हांस कांही मसलत सुचत नाही. आमची साठी बुद्धी नाठी जाली." म्हणोन बोलून कानांवर हात ठेविले. ते समयीं आणखीहि कित्येक शाहाणे तार्किक होते. त्यांणीं मसलत दिली की, "दिलीस जाऊन पोंचावें. म्हणजे बचाव होईल. परंतु निभावणी होऊन जाण्याची मसलत इभ्रामखान गाडदी यास विचारावी." त्याजवर इभ्रामखान यांस विचारलें. त्याणें मसलत दिली कीं, तुम्हीं देशाचा मोंगल बंदेखान अली याजप्रमाणें गोल बांधून चालिलां तरि तुमची निभावणी करून देईन. त्यानी गनिमी कावा केला तरी आमचा यत्न राहिला." असो. [२७]असे ऐकून तोच मनसुबा पेशवे यानी प्राधान्य करून कुंजपुरी सोडून, दिलीचे रोखे चालिले.

**११३. अबदली सैन्याकडून बातमी–पथकाची कत्तल**

पुढें बातमीस बाजी हरी[२८] व भगवंतराव कदम व सिदे यांजकडे येसाजी भोइटे असे पाच सात हजार लोक[२९] पाठविले. ते बातमीस निघाले. तेथून दुराणीची फौज पांच कोस होती. तेथें उभे राहिले. तों त्याणीहि[३०] मुख[३१] पाहिलें नव्हतें. अस्ताव्यस्त लोक गाशे टाकून झुरझुऱ्या लावून बसले. कोणी घोडीं बाजरीचे शेतात[३२] चारूं लागले. कोणी निजले. असें पाहून येसाजी भोइटे यांनीं जाबसाल केला की, "तुम्ही बातमीस आलां. येथून गिलचा पांच कोसांवर आहे. त्यास, हे कांही देशचे मोंगल नव्हत, हें ऐकून तुम्ही स्वस्थ राहिलां.[३३] दुराणीची दौड[३४] भारी. बेफिकीर राहूं नये." मग[३५] सर्वानीं त्याची हेटाळणी केली. आणि हातावर हात मारून

२६. 'मिसळ जाहाले' सगजो.

२७. पेशजी चा भा. इ. सं मं. सा. १९२२.

२८. सुभेदार निमकर.

२९. 'फौजेनिसीं' सगजो.

३०. सिंदे होळकरांच्या लोकांशिवाय इतरांनीं.

३१. 'दु:ख' सा. १९२२.

३२. 'सजगुरियांत' सा. १९२२

३३. यापुढें सां. प्रतींत असा पाठ आहे:—"आपले देशी मोंगल मिजासी. त्यांजला जेरीस आणिलें. त्याप्रमाणे हे लोक नाहींत. प्रसंग पडल्यावर समजेल. त्यांची दौड भारी. चाळीस कोसांची मजल करणारे. सावध राहावें." क. प्रतीतील पाठ असा:—"आपले तिकडील मोंगल लोकास दाहा कोसांची वळणीची मजल पडिली म्हणजे तोबा म्हणोन हयात सोडून देणार! त्याची अजगर वृत्ति, या साम्यतेचे हे नव्हत. हे परम कठिण."

३४. 'होड' तुं. प्रत.

३५. 'हें ऐकून' सा. १९२२.

विनोद करिते जाहाले कीं, "सिंदे होळकर यांचे फौजेनें धासत घेतली आहे." जी गोष्ट सागतात ती हिमत सोडून बोलतात. हे बोलणें येसाजी भोइटे यांनीं ऐकोन स्तब्ध राहिले. आणि एक आपला भला माणूस झाडावर टेहळ्या ठेविला. आणि आपण घोड्यावर स्वार होऊन, उभे राहिले. तों एकाएकी झाडावरून टेहेळ्या सागों लागला की, येथून दोन कोशावर फौजेची गर्दी आली.[36] धुराळा दृष्टीस पडों लागला." असें म्हणतांच सिंदे यांजकडील लोक हुशार होऊन गडबडून घोड्यावर स्वार जाहले. आणखी एक वेळ त्यांसी इशारत केली की, "घोडियावर[37] स्वार होणें." मागती त्यांची मस्करी करून दम बांधून तसेच राहिले. तों धुरळा दृष्टीस पडला. मग[38] येसाजी भोइटे यांणी जागा सोडून लष्कराचे रोखें पळों लागले. तों एकाएकीच फौज दृष्टीस पडली. मग गडबड करून घोडीं संभाळावयास गेले. तों ज्याचें घोडे जवळ व आणि (जो) सावध होता तो स्वार जाला. वरकड घोड्यांस स्वार प्राप्त होऊं दिल्हे नाहीत. तों इनकियात येऊन (गिलचे) सरमिसळ जाहले. त्याची प्रतिज्ञाच कीं, सांपडले मनुष्याचे सिर छेदन करून न्याहावें. ते समयीं बाजी हरीकडील स्वार घोड्यावरून बसून लष्कराकडे भरधाव पळों लागले तों आत गिलजे सरमिसळ जाहाले. लष्कराच्या ढाला दिसत तोंपर्यंत आले. ढाला पाहिल्यावर दुराणी फिरून गेले. ते समयीं बातमीचे स्वारांचीं डोचकी बाराशे लोकांची कापून नेली.

**११४. बातमीपथकवृत्त ऐकून भाऊसाहेबांचा दिल्लीस जाण्याचा बेत बदलून पानिपतनजीक मुकाम**

हें वर्तमान फौजेंत कळतांच फौजेची छबी मावळली. भाऊसाहेबाची हिंमत दिलीस जावयाची होती ती राहिली. पाणीपत नजीक राहिल्यास भोवताले लष्कर उतरून भोंवता खंदक खाणून सभोंवता आराबा पसरून राहिले. फौजेचे तोंडावर इभ्रामखान गाडदी राहिला. तेथून अबदल अली व सुजातदौला व नजीबखान रोहिला व अहमदखान लगडा पठाण, असे एक लक्ष वीस हजार फौज व तीनशें तोफा यमुनातीरी अडीच[39] कोसांवर उतरले. त्यांसहि धास्त होतीच. एकाएकीच कांहीं गळा पडले नाहींत. परंतु गनिमाचे फौजेनें धास्त खाऊन कूर्मवत् आकर्षून राहिले. दुराणी भंवता तलावे[40] देत फिरों लागला. दाणापाणी याची रसद पोंचेनाशी जाली. सुरजमल जाट हातांतील निधान गमाविले. त्याची पहिलीच प्रतिज्ञा होती की, "सरमाल तुम्ही व दुराणी युद्ध केलें तरी पैशास शेरभर पीठ व शेरभर हरभरेहि तसेच पुरवीन. तो आसता तर धान्यास अंतर न पडतें." असो. होणार[41] यास उपाय नाहीं. ज्या ज्या काळी जें होणें तें होतच असतें. त्या प्रो महिना पंधरा

---

३६. 'जाहाली' सा. १९२२ व शें.

३७. 'जलदी स्वार व्हावें' सा.

३८. 'जवळ आले असें [पाहून]' सा. १९२२.

३९. 'ती चौ' तु. प्रत.

४०. 'कावे' सा. १९२२ व सगजो. 'तलावे' क. प्रत.

४१. 'पहिली' भा. इ. सं. 'पहिलीच' सा. व शें. 'होणार बलोत्तर' सा. १९२२.

दिवस गुदरले. गोळागोळी करीत[४२] राहिले. दिवसेदिवस धान्य महाग होऊं लागलें. वैरण मिळेनासी जाहाली. घोडयाची शक्ति राहिली. ते समयीं भाऊसाहेब यांस परम कठिण भासलें कीं, आतां निभावणी होणें कठीण. आणि देशातून कुमक व्हावयाची नाही "आणि मी नानासाहेब यासी प्रतिज्ञा करून निघून आलों 'कुमक करा' हें म्हणावे तर उचित नाही," असे म्हणोन स्वस्थ राहिले.

**११५. जनकोजी–विश्वासरावांचें नानासाहेबांस पत्र : पण मानी भाऊसाहेब नाराज**

हें वर्तमान विश्वासराव यांस कळतांच त्यांणी जनकोजी सिंदे यासी एकांतीं बोलाऊन विचारपूर्वक पुसिलें की, "भाऊसाहेब तों अभिमानाने पेंचात आले. मनसबा तो भारी पडला. निभावणी[४३] व्हावयाचा प्रकार राहिला. आता नानासाहेब यास निदानचें पत्र ल्याहावे. हा मनसोबा करून पत्रात मजकूर लिहिला की, "भाऊसाहेब[४४] तो अभिमानी पुरुष यांत गर्द[४५] होतील; परंतु व्यगोक्त लिहिणार नाहीत. यास्तव सकट; तरी आणखी पन्नास हजार फौज व क्रोड रुपये खजिना पाठविला तरी तुमचें आमचे दर्शन होईल; नाहीतर पत्र लिहिलें हीच भेट समजावी. नानासाहेब, मजसारिखे पुत्र आपणास होतील; परतु भाऊसाहेबासारखे बंधु मिळणार नाहीत." म्हणून भाऊसाहेब यासी अगदी कलो न देता पत्रे लिहिलीं. तो भाऊसाहेबांनी ऐकून[४६] जनकोजी सिंदे व विश्वासराव यासी एकाती बोलावून• क्रोधें सतप्त होऊन बोलिले की, "तुम्हास जीव जगवणे असेल तरीं उत्तम आहे. अजून लाऊन द्यावयास फुरसत आहे. हर यत्न करून तुम्हास दिल्लीस पावते करतो. तेथून पाच हजार [फौज] घेऊन देशास जावें. आमची आस्था धराल तरी आमची शभर वर्षे[४७] पूर्ण भरली." याप्रमाणे निष्ठुर भाषण ऐकून विश्वासराव यासी असे जाहले की, अंगावर कडा कोसळला; की मस्तकी वीज पडली. असा प्रकार होऊन अधोवदन तटस्थ राहिले. मर्यादेची सीमा उल्लंघून गेली. ते समयी जनकोजी सिंदे याणी उत्तर केलें की, "भाऊसाहेब, तुम्हीं आपले चित्तात अंदेशा काय आणिला? अशा समयास वडिलास न लिहावे तर शत्रूस लिहावे की काय?" हे ऐकून मागती भाऊंनी उत्तर केले की, "दैव असेल तसे होईल. अतःपर तुम्ही पत्र लिहिण्याचे वाटेस न जावे." म्हणोन साफ साफ सागितले. यांणीहि मान्य केलें. पायांवर हात ठेविला कीं, "या उपर आम्ही पत्र लिहिणार नाहीं"

---

४२ 'करीत राहिले' भा. इ. सं. 'होतच होती' सा. १९२२.

४३ 'होण्याची नाही' भा यापुढे "भाऊसाहेब तो अभिमानी पुरुष" हे शब्द सा. १९२२त व सगजो. मध्ये अधिक आहेत.

४४. यापूर्वी 'गिलचे याचा पेंच भारी पडला. निभावणी व्हावयाचा प्रकार राहिला' ही वाक्यें सा. १९२२ त अधिक आहेत.

४५. 'गारद' भा.

४६. यापूर्वी 'कर्णोपकर्णी' हा शब्द सा. १९२२ त अधिक आहे.

४७. या शब्दापूर्वी 'आजच' हा शब्द भा. मध्यें अधिक.

## प्रकरण तेरावें

# बुंदेले व मेहेंदळे यांचा शेवट व मराठ्यांची हलाखी

### ११६. गोविंदपत बुंदेले लढाई व मृत्यु

दिवसेदिवस[1] गनीम जेरीस येत चालिला आणि शत्रू भर घेत चालिले. जामदारखान्यांत पैका अगदी नाहीसा जाला. गोविंदपंत बुंदेले पैका आणावयास गेले;[2] तेथे तिकडेच बुंदेलखडावर राहिले. सबब[3] त्यांजवर दहा हजार स्वार मसाला करून ढालाईत[4] रवाना केला. नतर गोविंदपंत बुंदेले वीस लक्ष रुपये घेऊन दिल्लीस आले. तो खजिना त्यांनी दिल्लीस ठेवला. लष्करात पैसा पोंचेना 'पाठविला नाही'[5] सर्व यत्न राहिला. लष्करांत[6] धारण पांच शेर जाहली. मग भाऊसाहेब याणी विचार केला की, "अंतरवेद प्राती फौज पाठवावी. भागीरथीचे पुलावरून दुराणी रसद आणील ती मना करावी. म्हणोन मनसुबा करून गोविदपंत बुंदेले व रामाजीपत (पाराजीपत) वाघ यासी हातरोखा वरचेवर पा अति आग्रहे अतरवेदींत घालविले. गोविदपत याची आयुष्याची सीमा जाहाली म्हणोन त्यास तैशीच बुद्धि निर्माण जाहाली. तारखी[7]–पारखीनें संभाळून आजपा होता तसें असावे तें न होता मुक्काम करीत खंडण्या घेत चालिल्यावर[8] जैता गुजर याणे इकडील[9] सूत्र ठीक करून गोविदपंत यासी खडणीचे नादी लावून गोंविले. तो नजीबखान रोहिला याचा सासरा[10] दुदेखान रोहिला व उमरावगीर गोसावी यास सुजातदौला याजकडील व व आमदखान लगडा[11] यासुधा पधरा हजार फौज निवड करून, गोविदपंत बुंदेले यांजवर पो. अविधानो मोगलाई मसलत* करून, होळकराची निशाणे लावून गेले. तों गोविदपत बुंदेले याणी दुरून पाहिले. फौजेची गडबड जाली. जीनबंदी लोकांनी केली. तों जात्या आपण उठेनात.[12] लोकास म्हणों लागले की, "नारो[13] शकर याची

---

१. 'असो, या प्रकारें' हे शब्द परिच्छेदाचे प्रारभी सा १९२२ त आहेत

२. 'पाठविले होतें' सा. १९२२.

३. याबद्दल "त्यांणी काही दिवसगत लाविली. म्हणोन त्याजवर कोपायमान होऊन" सा. १९२२.

४. 'डाकेंत' भाइसं

५. भाइसं.

६. याबद्दल 'रुपयांचा तोटा आणि' हे शब्द सा १९२२.

७. 'तार्कीकेनी' 'संधानानें' भाइसं.

८. 'चालिले' सा. १९२२. यापुढे "जयंता गुजर होता त्याजवरहि खंडणीची जिकीर चालविली. त्याणे रोहिले व दुराणी याजकडे सूत्र लावून बुंदेले खडणीचे नादीं गुतविले" सा. व क. प्रती.

९. 'तिकडील' सा १९२२.

१०. यापुढे 'व' हा शब्द सा १९२२.

* मागे परि. १७ पृष्ठ. १३ पहा.

११. यापुढें 'याचा भाऊ' हे शब्द सा. १९२२ त अधिक

१२. या शब्दापूर्वी 'ते' हा शब्द सा. १९२२ त अधिक.

१३. 'निसबत होळकर' क. व सा. प्रती.

फौज आली. निशाणें त्यांचीच आहेत." असें म्हणतात तों ते जवळ, बंध[14] बांधून येकायेकीच याजवर अविधांनी घोडी घातलीं. ते समयी गोविंदपंत यांणी गडबड करोन पळो लागले. तों ते सरमिसळ जाहाले. गोपिदपंत यांस घोड्यावर बसावयाचा अवकाश[15] थोडा होता. कोस अर्धकोस पळाले तों गोविदपंत घोड्यावरून खालीं आले त्यावेळेस काही मातबर माणसे होती त्यांणी[16] घोडियावरून उड्या टाकून गोविंदपतास घोड्यावर घातलें. तेथून पुढे आणखी कोसपर्यंत संभाळून नेले. तों त्याची दाटी भारी जाली. तमाम शीर कापीत सुटले. त्यावेळेस मागती गोविंदपंत घोड्यावरून खाली आले तेव्हा पाय मोडला.[17] उठावयाची हिमत राहिली.[18] लोकांस उडी टाकून काढावयाचे अवसान पुरेनासे जाहलें व त्याचा पुत्र होता तो टाकून गेला. तेथे दुसरियावर शब्द कशास ठेवावा ? त्या वेळेस त्यास गोविदपंत अजीज होऊन बहुत काकुळती येऊन "मजला प्राण-दान देणें; क्रोड रुपये देतो." म्हणोन बोलिला. तेव्हा ते काळ[19]–दैत्य त्यास करुणा कैची ? तात्काळ शिरच्छेद करून धड तेथेच ठेविले आणि शीर घेऊन गेले. ते समयीं दीड हजार फौजेचीं शिरें कापिली. 'मुरगी मारी बचडे दाणादाण' होतात तसे जिकडील तिकडे पळाले. मग त्याणीं गोविदपंताचे शीर घेऊन आपले फौजेंत आले. नजीबखान रोहिला याणें शीर पाहून परम संतोष पाऊन रुमालात शीर घेऊन आबदल अलीस नजर केले. याप्रमाणें गोविदपंत कामास आले.[20]

**११७. भाऊसाहेबांच्या सैन्यांत 'अन्नदुष्काळ व दामदुष्काळ'**

इकडे भाऊसाहेब याजकडील वर्तमान तर लष्करात[21] केवळ महागाई जाहाली. भोंवताले गिलचे फिरूं लागले. दाणापाणियाची रसद फौजेत पोचेनाशी जाहाली आणि जामदारखान्यांतील खजिना आटून उडाला. "अन दुष्काळ व दामदुष्काळ" दोन्ही एक जाले. मनुष्यास अन्नाचें खोबरें जालें; दिवसामध्यें अर्ध पाव अन्न मिळेनासें झालें.[22] तेथें हत्ती घोडे यांचा विचार काय पहावा ? लष्कर केवळ जेरीस आलें. घोडेमनुष्यांची हिमत हरली. तमाम फौजेंत निरवानिरव बोलूं लागले. कोणास जगून जाऊं अशा भरवसा नाहीसा जाहाला. ते समयी भाऊसाहेब यांणीं प्राणान्त समय जाणोन आपले जागी विस्मय करिते जाले कीं, "आम्ही गनीम, मोगलांचें अन्नपाणी बंद करावें, तें न करता आमचाच आटा बद जाहला. तेव्हां सर्व उपाय राहिला. देशीहून कोणी कुमक करावी ही आशा राहिली नाही. समागमे मुलें माणसें

१४. 'दम' सा. १९२२.

१५. सराव सा. १९२२.

१६. या शब्दापूर्वीं 'दम बाधोन' हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

१७. 'जाया जाला' सा. १९२२.

१८. 'हरली' सा. १९२२.

१९. 'केवळ दैत्य' सा. १९२२.

२०. 'मित्रत्व गोविदपंत यांचे कामास आले' सा १९२२. मित्रत्व शब्दावरील व्याजोक्ति मागें पृष्ठ ४४ व परिच्छेद ५२ टीप १८,१९ पहा.

२१. 'गिलच्याचे परिवेष्टनामुळें' असें येथें क. प्र. म्हणते.

२२. 'अर्धपोटी मिळेनाशी जाहाली' पु. 'दिवसापोटीं निमें अन्न' शें. प्र.

आणिलीं एवढें वाईट केलें. असो. 'आपण मेलों आणि जग बुडालें.' 'ज्याचे दैवीं असेल तसे घडेल" म्हणोन मनातच विचार करूं लागले. पण बाहेर व्यंगोक्ति[२३] शब्द बोलेनात. सोनियाचीं कडी व रुप्याची चीजवस्तु होती तितकी निवडून[२४] टांकसाळचापासून[२५] भाऊशाही व मल्हारशाही व जनकशाही तमाम मोहरा व रुपये केले. तरी पैसा पुरेना. महासंकट.[२६] लमाणाची[२७] खेप आ ी तरी पांच साहा[२८] शेर धारण; जो आधीं जाईल त्यास मात्र मिळत होती. नाहीं तरी पैसा पदरी असोन दाणा मिळेनासा जाला ते समयीं जाट समागमे असता तर अन्नपाण्याची कमती न पडती. दिल्लीत खजिना सरकारचा व सिदे-होळकर याचा चाळीस लक्ष रुपये रोकड व शिवाय कापड होतें[२९]; परंतु लष्करांत पोंचेना.

**११८. भाऊसाहेबांचा खजिना अबदलीच्या लष्करांत : व कत्तल**

ते समयीं गोविदपत बुदेले याचा पुत्र[३०] व पाराजी वाघ आसे भग्न फौज घेऊन दिल्लींत होते. त्यांस भाऊंनी रागास येऊन आसे पत्र लिहिलें की, "खजिना घेऊन येणें." त्यावरून पाराजीपंत[३१] दीड हजार घोड्यांवर खासी मनुष्य निवड करून घोड्यावर पाचशे[३२] रुपयाचे वोझे घालून सूर्यास्ताचे समयी निघाले ते कडनिकड करून कचे चालीस कोस भूमि चार घटका रात्र आहे तो लष्करापासोन दोन कोसांवर दाखल जाहाले. तेच दिवशीं दुराणीचे फौजेपैकी कांही फौज यमुनातीर सोडून दिल्लीचे रस्त्यावर येऊन राहिली होती. हे वर्तमान पाराजीपत यास ठाऊक नव्हतें. येण्याजाण्यास अनभ्यासी होते. यासी लष्करानजीक येताच आसे भासले कीं, लष्करानजीक पोंचलों. म्हणोन आपण दूर उभा राहून गोठ कोणाचा म्हणोन पुसाबयास पाठविले. तो गोठ सुजादौला याचा होता. कोणाचा गोठ' म्हणून विचारतांच त्यांणीं कृत्रिमपणें[३३] सांगितले की, "इभ्रामखान गाडदी याचा गोठ." असे ऐकताच लोक [ याचे ] केवळ थंडीने हातपाय आंखडले होते. हिमाचलानजीक हीव भारी. पाणी गोठतें तेथें वरकड गोष्टी काय सांगाव्या[३४] ! माळाचे नजीक.[३५] यास्तव भय

२३. 'येक ुक्ती' भाइस.

२४. 'मोडून' सा १९२२.

२५. 'एक टकशाळा घालून' सा. १९२२ 'साळ' तु. प्र.; 'मोडून आटणी घालून' सा. प्रत.

२६. हा शब्द सा. १९२२ त नाहीं. भाइसं. मध्यें आहे.

२७. यापूर्वी 'मोठ्या संकटें' हे शब्द सा. १९२२ त आहेत.

२८. 'सात' सा. १९२२.

२९. येथें कल्याण प्रत म्हणते "सरकारचे व सिदे होळकर याचे कोट्यावधि रुपये रोख होते; परंतु लष्करांत कसे पोंचतात ?

३०. हा शब्द शें. व सा. प्रतींतील.

३१. 'पाराजीपत वाघ' सगजो. व मंडळ'

३२. 'हजार' सां. प्रत.

३३. 'लबाडी करून' तु. व सगजो.

३४. यापुढें सा. १९२२ त व सगजोंत खालील वाक्ये अधिक आहेत :—त्यातहि सावध पुरुष होते त्यांनीं दम राखोन [ते] दूर उभे राहिले. गुडगुडीचे तलबी होते त्यांणी शेंपन्नास लोकांना घोड्यावरून उतरून हातांत गुडगुड्या घेऊन त्यांचे गोठांत शिरले. तो एकदांच 'लेव ! लेव !' म्हणून पुकार जाहला. जे घोडियावर सावध होते, ते निघोन गेले आणि तलब गुडगुडीचे होते ते त्यांजकडे तमाम हस्तगत जाहाले. त्यांत यांणीं एकास सोडिलें नाहीं."

३५. 'मालच' शें.

याचे चित्तो जरी होतें आणि रामाजीपंतास ( पाराजीपंतास ) बातमी सांगत आले कीं, इभ्रामखान गाडदी याचा गोठ ' असें म्हणतात तेव्हां निश्चयपणें आले. थंडीमुळें आगटीजवळ घोडो उभो केलो. परवानगीकरिता नांवनिसी व ठिकाण सागितला. त्यांणी परवानगी आणितो म्हणून नादी लावून उभें केले. पाराजीपंत व दोनतीनशे[36] स्वार मागे राहिले होते. बाराशे स्वार गेला होता. त्यांजपैकीं एकासहि सोडिले नाहो. तमाम घोडी व खजिना घेऊन सिरें कापिली. बातमी सांगावयास कोणी राहिला नाही. वरकड दोनतीनशें स्वार व पाराजीपंत रात्रीचे समयो रस्ता चुकून आडवाटेने गेले ते मात्र जाऊन आपले लश्करांत दाखल जाहले.

## ११९ बलवंतराव गणपत यांची कुरापत : जनकोजीचें लढाईनें उत्तर

नंतर तेच दिवसाचे कचेरीस सिंदे-होळकर व दमाजी गायकवाड व आणखीहि सरदार थोर थोर होते, तों बलवंतराव गणपत याणी सिंदे-होलकर यासी आरोप ठेऊन कुरापत[37] काढिला आणि बोलिले की, सिंदे-होलकर लढते[38] सरदार असता त्यांची केवळ हिमत हरलो [39] वोझें घेऊन वीस कोस मागून चालून थकून बसते ती गत होऊन बसले. कारण आम्ही हिंदुस्थानात आलों याअर्थी ध्यानांत आणिनात असें दिसोन आले " याप्रमाणे दुरोक्ति शब्द बोलिले ते मल्हारराव याणी हास्यविनोदावर टाकून[40] नेले. तो जनकोजी सिंदे यास गोष्ट साहिली नाही. "भाऊसाहेब जवळ असता तुम्ही आसा जाबसाल केला. बलवंतराव तुम्हीं काय पाहिले ? आमची हिमत हरली; परतु तुम्ही दिग्विजय कोठें केला ? असो. तुम्हाला आमचा तमाशा पाहाणें तरी आम्ही उदयीक युद्ध करितो." [असा] इरेचा[41] जाबसाल करून तेच समयीं रागाने मुजरे करून उठोन चालिले. भाऊसाहेब याणी स्नेहानें बोलून पाहिलें. "तों मुजरा जाहाला आता बसावयाचे नाही." म्हणोन गेले विचार करिता सिंदे यास विषाद येऊन डेऱ्यास गेले, हे समजले. सिंदे यांणी आपले फोजेतील तमाम सरदार बोलावून आणून सागितले की, "आतां[42] दत्ताजी सिंदे याचा मजकूर तोच आमचा. बलवंतराव गणपत कुरापतीनें बोलतो.[43] जितो(दी)चा मार आहे. मारता

---

३६. 'हजार-नऊशे' सा. १८७९ व १८८६ व पुणें प्रत.

याबद्दल सा. १९२२ त पुढील वाक्ये आहेत :—"आडवाटेनें लष्करात जाऊन पोहोचले बाराशे स्वारांचा ठिकाण पाडितात तों बातमी कळली की ते त्याचे कवेंत सांपडोन त्यांचें मुंडमोचन करून खजिना लुटून घेतला." पण हा भाग सा. १८७९ व १८८६ त नाहीं. क. प्रतीतील वाक्यें :—"पाराजीपंत तीनशेंहे स्वारानिसी होते ते रात्रींच्या ठायीं रस्ता चुकोन आडमार्गें गेले होते ते आपले लष्करांत जाऊन पोहोंचले."

३७. 'कुशब्द बोलने जाहले' सगजो.

३८. 'चढते' सा. १९२२ 'एवढे एवढे' पुणें प्रत.

३९. 'वेजीं उतरलियाची गत दिसोन आली' सा. १८७९,१८८६ व सा. १९२२.

४०. 'टाळून नेले' पु. प्रत.

४१. 'जिदेचा' ला. १९२२ 'ईरेचा' क. प्रत.

४२. यापुढें "यार हो" हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

४३. हीं वाक्यें १९२२ त नाहींत.

मारतां मरावें, हें उत्तम; परंतु वारंवार भग्न फौज घेऊन जाणें[४४] आणि ब्राह्मणानें बोलणे[४४] हें मूर्खपण ! " म्हणोन आपली फौज सावध करून पहाटे चार घटिका रात्र आहे तों नगारा करून[४५] जेवणे खाणें उरकून सिध होऊन दिवस उगवावयास खंदक सोडून बाहेर गेले आणि मल्हारराव यासी सागून पाठविले की, "तुम्ही फौज सिध करून बाहेर निघावें." तों मल्हारराव यासी भाऊसाहेबांनी ताकीद केली होती कीं, "जनकोजी सिदे मूल आहेत. त्याणी उतावळी केली तरी त्यास तुम्हीं माकुलपण सांगून पाहावें आणि तुम्हीं न जावें." असें सांगितले होते. त्याजवरून त्यास 'आड-विहीर' जाली. आपण जावें तरी भाऊसाहेब रागास येतील; न जावें तर पाढरे केंमास बोल लागतो." आसे मांगोन खासा आपण राहून, संताजी वाघ व बुदेले व भोजराव[४६] कदम बारगीर[४७] असे पाचसात हजार फौज तयार करून एका बाजूस उभे केले. हें वर्तमान भाऊसाहेब यांणी ऐकून बलवतराव यास आज्ञा केली की, "हुजरातीची फौज सिद्ध करून, जनकोजी सिदे याची कुमक करावी.[४८] सिदे यांचे वडील आमचे सेवेसीं कामास आले. तो वंश एवढाच राहिला आहे. तोहि तुम्ही वचनाने पोळून इरेस घातला. हे उत्तम केलें[४९] नाही. सत्वर कुमक करणे. " म्हणोन आज्ञा करून बलवंतराव गणपत यास तयार करून वाटेस लाविला.[५०]

### १२०. जनकोजी व दुराणी युद्ध : जनकोजी यशस्वी

इकडे हे वर्तमान मोगलांस कळताच नजीबखान रोहिला आमदखान लंगडा पठाण व सुजायतदौला याजकडील फौज व काही दुराणीकडील फौज निवड करून सिध होऊन समागमे दहा-पंधरा तोफा घेऊन आपली फौज सोडून एका अंगास जावें याप्रमाणें बाहेर आले. उभयता दलें सन्मुख द्रष्टीस पडों लागली दुरून तोफांचा व बाणांचा मार होऊं लागला. तिसरे प्रहरपर्यंत मार जाहला. तो सताजी वाघ वगैरे होलकराकडील यांणी गलिमी काव्याने त्याजवर तुटले. हुतुतूची एक घाई एक घटका जाहाली. तों त्याचे पाठीवर रोहिले व दुराणी एकदाच उठले. ते समयी संताजी वाघ याणी आपले बाजूस निघावें; परंतु त्यांस दम पुरला नाही. सिदे याच्या फौजेचे आश्रयास[५२] आले. तो दुराणी व रोहिला यांचे फौजेवर आदळले. तों जनकोजी सिंदे आधीच इरेस पडले होते. ते समयी त्याणीं आपला नेम फौजेआधी उठून हाणावें,

---

४४. 'घेऊन जाऊन ब्राह्मणाकडून बोलून घेणें' सा. व क. प्रती 'ब्राह्मणानें हा शब्द सगजोंत नाही.

४५. 'प्रातकाळीं' सा. १९२२.

४६. 'भानराव' सा. १८७९. 'भोपराव' सगजो. 'जानराव' मं.

४७. बारगल सा. १९२२.

४८. 'करावी' सा. १९२२ तु.

४९. 'झालें नाहीं' भाइसं.

५०. हे भाऊंचें बोलणें व करणें तुगार प्रतींत नाहीं.

५१. 'उठले' सा. १९२२. 'उठून हुडु-डीची' सगजो.

५२. हा शब्द सगजो. मं. सा. व भा. 'आसपास' भाइसं.

'उष्टें झुंज[५३] शवतुल्य,' आसा मारा होतो त्याचप्रमाणें[५४] तों सर्वत्रांचें अनुमत सोडून[५५] फौजेचे पाठीवर खासा आपण व तमाम लबेचे खिजमतगार व जासूद व चोपदार व भालेदार व कारकून हातात काठ्या घेऊन होलकरांची[५६] फौज हांकून लाविली. उभयतां दळें एकमेकांस आदळली. वरकड रिसालेयांचा मार राहिला, आणि तरवारीची खणाखणी जाहाली. ती सायंकाळचा एक प्रहर दिवसपर्यंत हातघाई सिंदे होलकर व दुराणीची होत होती. जैसे पूर्वी रामायणी राक्षस व वानर लढले किंवा भारती कौरव-पांडव लढले याप्रमाणें लढाई जाहाली. गनिमाचे फौजेंत कजाले[५७] लोकांनी तोंडें माघारी केली असता जासूद व भालदार काठ्या मारीत. लोकांस एकीकडे आड व एकीकडे विहीर असा प्रकार जाहाला. लोकास 'लेजे दे[५८] दान लेजे दे प्राण[५८]' आसें जालें. 'दोन्ही दळें हटेनात. उभयतां दोन्ही दळांमध्यें अंतर दहा-बारा[५९] हातांचें. त्यास ज्यास हिमत त्याणें हटकून उठोन हाणावे, असे परस्परें हटकून मारूं लागले. मोगलाकडील विशेषात्कार मानावा तरी त्याचा सहजच स्वभाव, ते असुरच; परंतु मराठे यांची ते दिवशीं शर्थ जाहली[६०]. ते समयी बलवतराव यांणी कुमक केली असती तरी दुराणीचा पराभव करून लुटूनच टाकिलें असतें; परंतु वलवंतराव याचे चित्तांत मनसुबा की, "सिंदे होलकर याचे फौजेने धास्ती खाली आहे, दुराणी पुढें दम निघणार नाही, हे माघारे पलोन गेले म्हणजे आपण उठावें". ही खातरजमा चितांत आणून आपले जाग्यावर तमाशा पाहात उभे राहिले होते[६१]. ते दिवशीं सिंदे केवळ इरेस पडोन रण सोडून माघारे हटेनात. सायंकाळ जाहाला. मशाला लागल्या. तेव्हां सिंदे याणी एकवेळ 'हरहर' म्हणून एकदांच उठावणी करून फौज गुरानें रेटावे[६२] तसा मार देत देत त्याचे गोटात नेऊन घातलें. त्याचे गोटाचा खंदक होता तेथपर्यंत घालवून तोफा देखील सोडविल्या. दोन-चार ओढून आणिल्या. तोफेचे बैल घेऊन गेले होते; तोफा भारी; माणसांस ओढेनात. माणसें पायचीं सिंदे यांची.

---

५३. 'झुंजास शिवू नये सा. १९२२ व सगजो.

५४. हा शब्द शें. प्रतींत.

५५. यापुढें सांगली प्रत म्हणते "होळकर यांचे व दुराणी यांचे फौजेमध्यें आपण खुद्द शिंदे हे जाऊन होळकर यांची फौज एकीकडे काढविली तेव्हा शिंदे यांची फौज व दुराणीची फौज एकमेकांवर आदळली."

५६. हा शब्द सगजो., पु. व तु. प्रतींत नाहीं.

५७. 'मेले' सा. १९२२. गनिमाचे फौजेंत कजाले हे शब्द भाइसं. मध्यें नसून सा. व सगजोमध्यें आहेत. कजाले—कजाक ?

५८. 'लजा' शें. 'लज्या' भाइसं. 'लजा प्राप्त होऊन' भा. हे सर्व शब्द सा. सगजो. व भा. मध्यें आहेत.

५९. 'पंचवीस' क. व सां. 'थोडें' सगजो.

६०. केली सा. १९२२ सगजो या शब्दापुढें तों सायंकाळ होत आला' हे शब्द सा. १९२२ व सगजो. त अधिक आहेत.

६१. या पुढें 'माघारा सारून' हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

६२. 'फौजेनें रेटोन समोर मार देत' मं. प्रत, 'फौजेनें उतार व्हावें तसा मार देत देत' सगजो.

थोडी रात्र अपरात्र जाली. माणसास ओळखीनात. ते समयी चार तोफा आणिल्या. वरकड तोफात खिळे मारिले[६३] व कणे मोडिले. मग जनकोजी सिंदे प्रहर रात्रीस माघारे फौजसुद्धा फिरलें. पाच-सातशें मनुष्यें ठार पडली व कितेक जखमी जाहलीं. घोडी सिंदे यांचीं सात-आठशें पडलीं. व दुराणीचीं हजार-बाराशें घोडी पाडाव करून आणिलीं. ते दिवशीं दुराणी याचें[६४] हजार मनुष्य पडले, आणि खितीस राहिले. ते मनुष्य आणावयास अवसान राहिले नाही. तसेच जखमी बहुत जाहले. याप्रमाणे यश पावले.

### १२१. बलवंतराव गणपत याचा पश्चात्ताप

जनकोजी[६५] शाहादाने वाजवीत आपले गोटास चालिले[६६] तों भाऊसाहेब आडवे आले.[६७] तों बलवंतरावहि येऊन पोहचले जनकोजी सिंदे याजकडे बलवंतराव आले. ते समयीं सिंदे यास क्रोध येऊन गालिप्रदानें केली कीं, "तुमचे चित्तांत आमची फजिती व्हावी असें होतें. परंतु ईश्वरास साहिलें नाही. आम्ही[६८] सेवेसी चोर असतों तरी ईश्वर आम्हांस यश न देता. कौतुक तुमचे दृष्टीस न[६९] पडतें." म्हणोन बोलताच भाऊसाहेबानी चार गोष्टी समाधानाच्या समजावून[७०] सांगून शात केले.[७१] घालवीत डेऱ्यापावेतों आले. समाधान करून भाऊसाहेब आपल्या डेऱ्यास आले. जनकोजी सिंदे याजकडील भले मनुष्य पडले. त्याच्या गोरकफनें मूठमातीचे[७२] साहित्य करून त्याची सार्थके केली. तों बलवंतराव गणपत यास वाईट भासलें की, "गोष्ट आपणाकडे आली. आमचा घात आम्ही करून घेतला. आम्ही बोलावयास गेलों येक आणि घडलें येक" असें अवघड मानून उगेच राहिले. इकडे दुराणी, सुजातदौला व पठाण हे झुज झाल्यावर सिकस्त[७३] जाहाले. आणि आपले जागां दगावले.[७४] रात्री फौजेत लुटालूट जाहाली. एकाचे ओझें एकास आले. त्यांत (मराठ्यानी) कूच केले असतें तरी

---

६३. 'तमाम लष्कर याचा कल्होळ होऊन तमाम बुणगे पळों लागले' हे वाक्य यापुढें धो. प्रतीत अधिक.

६४. याचें या शब्दापुढें "सुध्धां [दैव] फिरले" हे शब्द शें. प्रतींत आहेत.

६५. यापूर्वी "याप्रमाणें धौशा गाजवून" हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

६६. यापुढें "ही बातमी क्षणाक्षणां भाऊसाहेब याजकडे खेळतच होती. तेव्हां खांसा स्वारी" हे शब्द सा. १९२२ मध्यें आहेत; परंतु सा. १८७९–८६ त नाहींत.

६७. यापुढें सां. व क. प्रती म्हणतात—"मोठे सन्मानें करून सिंदे यांस डेऱ्यास आणिलें. + + तुम्ही शिदे यांच्या वंशांत येऊन कुळाचा उद्धार केला. असे बहुत प्रकारें बोलून शिंदे याचा गौरव केला."

६८. "सेवेसी चोर नव्हत" हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

६९. 'न' हा शब्द सगजो. मधील.

७०. हा शब्द सा. १९२२ त नाहीं.

७१. 'शांतवन' सा. १९२२.

७२. 'गोरकपणेंचीं' सा. १९२२ 'गार खणून' भा.

७३. 'शिकस्त खादली होती' सा. १९२२ व सगजो.

७४. 'मोगल दगावले होते' सा. १९२२ सां. व क. प्रती "त्यांचे फौजेंत शिंदे यांचे धास्तीनें गलबल होऊन लुटालूट आपआपल्यांतच जाली."

दुराणीस पाठी[७५] लागावयाचें सामर्थ्य नव्हतें. आणि[७६] दुराणीचें लष्करहि लुटून दुराणी व रोहिला धरले गेले असते; परतु पुढील होणार भवितव्य. म्हणोन[७७] सिंदे याची कुमक जाहाली नाही. येकटयावरच भार पडला. याजमुळें दुराणी व गिलचे[७७] मागती दम खाऊन आपले ठिकाणास माघारे येऊन उतरले.

### १२२. गोविंदपंतांचें शिर भाऊंकडे आणि भाऊ व दुराणी पत्रापत्री

यामी[७८] एक-दोन दिवस जाहाले तों इकडे गोविंदपंत बुदेले यांनें शीर कापून नेलें होतें ते[७९] सिर व वकील व पत्रें भाऊसाहेब[८०] यांजकडे पाठविली[८१] को, "तुमचे गोविंदपंत पुढें तुम्हास स्वर्गी जागा पाहावयास गेले आहेत. आणि तुम्हांस न्यावयास[८२] शीर पाठविले आहे. होय किवा नव्हे हें पाहावे." म्हणोन शीर व पत्रें भाऊंकडे आली. वकिलानी रुमालातील शीर पुढें ठेविलें आणि पत्र दिल्हें. भाऊसाहेबांनी पत्र वाचून त्यातील गर्भभाव ध्यानांत आणिला. गोविंदपंत याचे शीर ओळखिले. ते समयी कचेरीस लहानथोर सरदार होते त्याची मुखश्री उतरली. तमाम लष्करांत खबर कळतांच फौज थोडीबहुत हिंमत धरून होती त्याची आवसाने गेली. तेव्हा भाऊसाहेब याणी पत्राचे उत्तर दिलें की, "तो जागा सर्वाचा आहे. त्याशिवाय दुसरी गति कोणती आहे? प्रस्तुत तुम्ही थोर, खंदारचे पातशाहा, तुम्ही तेथें जाल तेव्हां तुमचे स्वरूपाप्रमाणे मान जाला पाहिजे. सबब तुमचे मेजवानीचे तरतुदीस पुढे गोविंदपंत[८३] गेले आहेत." म्हणोन उत्तर दिल्हें. शीर होते तें ठेवून घेऊन, शिरास अग्नि-प्रमाद दिल्हा.

### १२३. 'यशस्वी तरी तोंड दाखवूं' नाहींतरी युद्धांतच मरू. बळवतराव मेहेंदळे–प्रतिज्ञा

त्यास पंधरा दिवस जाहाले. लहानथोर बोलूं लागले की, "सिंदे यांची कुमक बलवंतराव याणी न करून मसलत बुडविली." हे ऐकून बलवंतराव यास आवेश आला. पृथक् युद्ध करावे, असा नेम करून भाऊसाहेब यांजकडे जाऊन आर्ज केला की, "शिदे यांणी युद्ध केल्यावर शिकस्त दुराणीची जाली होती. त्यास गोविंदपंत यांचें सिर कापून आणिल्यावरी गिलचे मागती शेर जाले. आणि भोंवताले फिरों लागले. रस्ता[८४] मना जाहल्या.[८४] त्यास मजला आज्ञा करावी. मी हुजुरात घेऊन

---

७५. 'गळा पडावयाचे' सा १९२२ व सगजो.

७६. हे वाक्य सा. १९२२ त नाही.

७७. हा मजकूर सा. १९२२ नाही.

७८. 'पुढे' सा. १९२२.

७९. 'नेले होते तें' हे शब्द शे. व सा. १९२२.

८०. हे शब्द सा. १९२२ मधील.

८१ येथे सां. व क. प्रती म्हणतात "दुराणी याणी 'आपले अवसान गेलें असें गनीम मनात आणतील' यास्तव कल्पना करून दाबाचे पत्र व शीर वकिलाबरोबर पाठविले."

८२. 'पहावयास' भाइसं.

८३. यापुढें 'साहित्यास' हा शब्द सा. १९२२ व सगजो. मध्यें अधिक

८४. 'रस्ता मना जाहला' भाइसं.

युद्धच[८५] करितों." बहुतच अतिशय भाऊसाहेब याजपाशीं केला. नंतर भाऊसाहेब यांणी दुराग्रह जाणून तमाम हुजुरात व लहानथोर सरदार यासी आज्ञा केली कीं, "बलवंतराव जरीपटका घेऊन युद्धास जातात. तुम्हीं सिद्ध होऊन लढाईस जावें." म्हणून ताकीद जाली. वरकड सरदार[८६] कोणी निघाले नाहींत; परंतु सिंदे होलकर मात्र इरेनें फौजा सिद्ध करून आपले[८७] बाजूस उभे राहिले. बलवंतराव याणीं हुजरात सिद्ध करून गिलच्यास चिठी पाठविली आणि[८८] आपण बाहेर निघाले. मग चित्तात विचारणा केली कीं, "यश प्राप्त जाले तरीच भाऊसाहेबास तोंड दाखवू. नाही तरी तिकडेच मरावें;[८९]" अशी योजना करून आपले डेऱ्यात कुटुंबाचे खबरीस गेले. समागमे स्त्री व मूल आपाराव होते स्त्रीस जाऊन बोलिले की, "ईश्वरे यश दिलें तरि उत्तम; नाहीं तरी पुनः तुमची आमची भेट स्वर्गी होईल." म्हणोन बोलोन डोळियास पाणी आणून निरवानिरव केली. तो बलवंतराव यांची स्त्री महापतिव्रता होती. तिणें जाबसाल केला की, "उत्तम आहे. शत वर्षांनी केव्हा[९०] तरी मरावें, त्याम या संग्रामात मुक्ति आली तरी बहुत बरे जाहाले. याची क्षीत[९१] कशास करावी?" म्हणोन समाधान करून बोलती जाहाली की, "तुम्ही लौकिक करून गेला तरि मोहि वांचणार नाही. तुमची सांगातीण होईन" म्हणोन बोलिली. बलवंतराव याणी उत्तर केले की, "आपाराव मूल नेणतें आहे. समागमें येणें उचित नाही." हें ऐकोन स्त्रीने उत्तर दिल्हें की, "त्याचे प्रालब्धी असेल तसे घडेल, त्याची आस्था कशास पाहिजे?" म्हणोन परस्परे बोलोन बाहेर आले.

**१२४. बळवंतराव मेहेंदळे आणि दुराणी युद्ध व घोड्यावरच राव मृत्यु**

[नंतर] नगारा करून फौजेची सिद्धता करून खंदक सोडून निघाले. तो दुराणी व रोहिला याची फौज ते दिवशी भारी चढून आली. बलवंतराव व गिलचे याचें युद्धास तोंड लागले. मोठा प्रलय जाला. इरेचे काम. बहुतच कडनिकड केली. रोहिले व दुराणी यांणी केवळ अग्नीने भाजून काढले. धुराचा व रेतीचा व धुरळियाची एकच गर्दी जाहाली. कोणास कोणी दिसेनासें जाहाले. दोन्ही दलातील यंत्राचा एकच[९२] भडिमार जाहला. घोडी-माणसें धुद जाहली तो प्रळय मराठे यासी सोसेनासा

८५. या शब्दापूर्वी 'एक वेळ' हे शब्द सा. १९२२ त अधिक.

८६. या शब्दापुढे 'बहुतकरून' हा शब्द सा. १९२२ त अधिक.

८७. 'एके' सा. १९२२.

८८. 'की निघालों' सा. १९२२.

८९. 'गर्द व्हावे' म. प्र.

९०. यापुढें 'निदान समय जाणून' हे शब्द सा. १९२२ त अधिक.

९१. दोन्ही सैन्यांच्या भेटी जाहल्या. परस्परें लढाई फार चांगली जाहली. परंतु गिलचाच्या तोफखान्यापुढें उपाय चालेना व वायूचे योगे त्याचे तोफखान्याचा धूर बलवंतराव याचे फौजेत माईना. याजमुळे सर्व मनुष्य धुद जाहले. व आपले व दुसऱ्याचें मनुष्य कांहीं एक समज पडेनासी जाहली. तेव्हा गर्दीच्या योगें मनुष्य पलायमान तडाखा पळों लागले शिंदे-होलकर यास कांहीं दिसेनासें जाहले" म. प्रत.

९२. 'च' अक्षर शें. व सा. मधील आहे.

जाहाला. मग[९३] निमें लष्कर गोटाचे सुमारें तडक पळों लागलें. त्या धुरळ्याचे गर्दींत शिंदे-होळकर यांस कांही दिसेनासें जाहलें. म्हणोन फौज पळोन[९४] धमधम्यापाशीं आली.[९५] तों तशात कांही वायु[९६] सुटला त्यानें धुराळा मना जाला. पाहातात तों धमधम्यापाशी रोहिल्याची निशाणें लालबुद गेल्यावर बलवंतराव यांणी तोंड काय दाखवावें, म्हणोन माघारे फिरोन मारामार केली. दुराणी व रोहिले यांचें तोंड थोपून[९७] राहिलें. तैसेच पळाले[९८] असते तरी दुराणी येऊन गोटांत शिरते. तशांत एकाएकीच बलवंतराव यांचे आयुष्याची दोरी स्वर्गीची तुटली. आयुष्याची मर्यादा जाली म्हणोन गोळी[९९] लागतांच घोड्यावरच[१००] प्राण निघोन गेला! ठार होऊन घोडियाखाली आले. तो दुराणीची गांठ पडली. त्यांणीं बलवंतराव यांचें शीर कापावयास उरावर पाय देऊन गळ्याची घाटी सोडविली तों हें अनुचित पाहून खंडेराव नाईक निंबाळकर[१०१] याणी केवळ सती पडने तसे जाले आणि त्या मुड्यावर[१०२] पडला. शिपायगिरीची शर्त करून मुडदा मोडविला. शीर कापू दिलें नाहीं निदान नामांकित खानदान माणूस याप्रमाणें कामास येतें. खंडेराव नाईक यांस जखमाहि लागल्या; [१०३]परंतु शीर कापू दिल्हें नाहीं. असो. त्यानीं क्षत्रियधर्म यथास्थित केला. तों धुरळियाची गर्दी निघोन गेली. नंतर एकाएकीच सिंदे-होळकर यांचे दृष्टीस रोहिल्यांचीं निशाणें धमधम्यापाशी पडली. मग सिदे-होळकर यांणी मध्येच घोडीं घालून अगदीच खांडावा[१०४] पाडिला. मध्ये शिरून पांच हजार राहिला पाठीशी चढला होता तो मारून टाकिला. त्यात खबर सांगावयास एक जाऊं दिला नाही. वरकड फौज दुराणीची निघोन गेली. पाच हजार मनुष्य त्यांजकडील ठार जाहले. मुड्यावर मुड्यांचे ढीग पडले[१०५] रक्ताचे ओढे चालिले. याप्रमाणें सफेजंग[१०६] होऊन शांत जाहले. रोहिले व दुराणी आपले गोटास गेले. श्रीमंतांकडील[१०७] भले लोकांचे मुरदे त्या मुरद्यांत सरमिसळ होते ते, ओळखूं येईनात. प्रयत्न करून हुडकून काढिले. आणि त्यांची सार्थकें केली. बलवंतराव यांचा मुडदा भाऊसाहेब यांणीं आणून पाहून डोळ्यांस पाणी आणून कष्टी जाहले. "बलवंतराव आम्हास टाकून गेले" म्हणोन बहुत शोक केला. मुरदा डेऱ्यास आणिला.

---

९३. 'गनीम' सा. १९२२ व सगजो.

९४. "धबधब्या पाशी" भाइसं. हा पाठ पुढेंहि लेखक वापरतो.

९५. यापूर्वी "तों शिंदे होलकर यांजवर मागून उमाळ गोळ्या पडूं लागल्या. हे वाक्य सा. १९२२ त व "गोळ्यांचा उमाळा पडूं लागला" तु. प्रत.(उमाप १)

९६. 'उलटा वायु' मंडळ प्रत.

९७. 'तोफानें रोखिलें' भाइसं.

९८. 'पळाचे पाठीमागून जातें' शें. 'पळावयाचें असतें' भा.

९९. हे सात शब्द १८८६ त नाहींत.

१००. हे चार शब्द भा. व भाइसं मध्यें नाहींत.

१०१. 'निंबाळकर अकळूजकर' सा. १९२२.

१०२. 'शत्रूचे अंगावर पडोन' सां. प्रत.

१०३. 'चढल्या' मं.

१०४. 'खडावा' पुणें प्रत.

१०५. 'अशुद्धाचे' सा. १९२२ व सगजो.

१०६. 'कत्तल' सगजो.

१०७. 'गनीमांकडील'

## १२५. बळवंतराव मेहेंदळे ह्यांची पत्नी सती जाते

हे वर्तमान बलवंतराव[१०८] यांची स्त्री बाडात[१०९] होती तिणें ऐकून तशीच बाहेर आली. मुडदा पाहून क्षणभर[११०] स्तब्ध होऊन बोलती जाहली कीं, "राव आम्हांस टाकून गेले.[१११] आतां अहेवपणा हरला. आतां आपण राहणें उचित नाहीं." म्हणोन तशीच मुडद्यापासी बसली. बळवंतराव यांचें मुख अवलोकन करून पूर्वसुख आठवून बोलो लागली की, "राव! तुम्ही आम्हांवर कां रुसलां? आमचे हातचा विडा घेतला नाही. ईश्वरें आम्हांस एवढें निर्वाण कां दाखविलें? राव यांणीं सर्व संपत्ति व आमची आस्था सोडून गेले! तों जवळ पुत्र आपाराव बळवंत हें मूल होतें. बारा वर्षे जाहली होती. त्याणी मातोश्रीचे ओटयांत शिरून दाढीओटी धरून बोलिले की, "आम्हास[११२] सोडून न जावें. आणि तुम्ही समागमें सहगमनास जाऊ म्हणता, तेव्हा आम्ही आन्नपाणी कोणास मागावें? आणि कोणावर रुसावें[११३]?" ऐसें ऐकून बाई बोलती जाहाली कीं, "बापा, तुम्ही आनपाणी ईश्वराजवळ मागावें, आणि ईश्वरावर रुसावे. आतां आम्हास मिथ्या मायेत गंतू नये." म्हणोन त्यास ढकलून दिला. तों भाऊसाहेब याणी येऊन बहुत प्रकारें बोध केला की, "पुत्र असता जाणें उचित नाहीं. आपाराव आहे त्यास 'सवाई बळवंतराव' करीन; तरच जन्मास आल्याचे सार्थक!" म्हणोन समाधान करून बोलिले. नंतर बाईनी उत्तर केले की,[११४] "मूल तुमचे ओटयांत आहे. कळेल तसा परामर्ष करीत जावा. आम्ही प्रपंचाचें रहस्य पूर्ण आनभविलें. आतां आस्था काहीं राहिली नाही. या समयी आमचे मायबाप तुम्ही होऊन आमची बोळवण करावी." म्हणोन निश्चयानें उत्तर दिलें. मग भाऊसाहेबानी सहगमनाचे साहित्य करून उभयता स्त्रीपुरुषाचें दहन केले. मुलाकडून त्यांचे तेरा दिवसाचें सार्थक केले.[११५]

---

१०८. हा शब्द शे. व सा. १९२२.

१०९. 'डेरियांत' सा. १९२२; 'गोटांत' समजो.

११०. 'दंग' समजो

१११. 'अतएव' सा. १९२२.

११२. 'आम्हांस सोडून राव निघोन गेले–"सा. १९२२.

११३. या ऐवजीं सां. प्रतींत पुढील मजकूर आहे:—"माझें पोषण कोण करील? आणि जाऊन माघारी केव्हां येशील? असें बालभाषण करून बोलत आहे, हें ऐकून त्यास बोलली कीं, "बाळा, तुझी आमची ताटातूट ईश्वरानें केली" असे बोलून पाठीवर हात फिरवून चुंबन (घेऊन) (मला) आता शिऊं नको म्हणून सांगितले. परंतु वरचेवर आईचे गळां पडों लागला. ते समयी आतां हें मायाजाळ कशास पाहिजे?" म्हणन हातानें ढकलून दिला."

११४. यापुढें सां. प्रत म्हणते:—"या देहास मुलाची थोडी काळजी होती. तीहि आपण बोलतां यावरून तुटली."

११५. याबद्दल "करून यथाविधि दानधर्म केला." सा. १९२२.

## प्रकरण चौदावें

# दिल्लीस जाण्याचा बेत बदलून लढाई व विश्वासरावांचा मृत्यु

### १२६. भाऊसाहेबांचा व सर्वांचा विचार कीं दिल्लीच्या रोखें गोल बांधून जावें

या प्रा॰ बलवंतराव यांची समाप्ति जाहल्यावर फोजेने धास्त बहुतच खादली. बाहेर कोणी निघेनासे जाहाले. दुराणी गलिमाकडील लोकास मारू लागले. आन द्रष्टीस पडेनासे जाहालें. मग तमाम लोक भाऊसाहेब यांचे डेऱ्यास जाऊन आर्ज केला की, "भाऊसाहेब, आम्हास रणात मारावें; परतु आनाविणे मारूं नये" आसें बोलिले. यावर भाऊसाहेब याणी सिदे-होळकर व दमाजी गायकवाड व समशेर बहादर व विठ्ठल सिवदेव व अंताजी माणकेश्वर व यशवतराव पावार व सोमाजी भापकर व आणखी कितेक सरदार थोर थोर होते त्यास बोलावून आणिले आणि येकत्र होऊन मनसोबा केला की, "आता कुजून मरूं नये. गिलचाचें बल दिवसेंदिवस बहुत होत चालिले; आणि आपले लष्कर झडत चालिलें. घोडींहि बहुत मेली. मातबर[१] मनुष्ये, घोडी गेली, याजकरिता पायउतारा जाहाले. याजकरिता एक वेळ हा मुकाम सोडून बाहेर मोकळे रानी निघोन जावें. दिलीचा[२] रस्ता सोडून दुसरेकडून जावें तरी झाडी मातबर आहे, मार्ग नाही. तोफखाना निभावणार नाही. यास्तव दिलीचे रस्त्याने जाण्याचा मार्ग उत्तम आहे; परंतु वाटेवरी गिलचाचा मुकाम राहिला आहे. ते जाऊ देणार नाहीत. यास्तव बदाबस्तीने निघोन जावें. यमुनेच्या तीरी येऊन पाच कोसावर जाऊन नदी पाठीशी[३] घ्यावी. पुढें गिलच्याचे तोडावर तोफखाना ठेवावा, दिली उजवे बाजूस राखून दिलीहून सरजाम आणवून सारें लष्कर आबाद करावे.[४] हा मुकाम सोडून यमुना तीरी करावा. तेव्हा मल्हारजी होलकर बोलिले की, "गिलचे मार्गावर असता फारकरून जावयाचा निभाव कसा होईल?" तेव्हा निश्चय केला की, "कुल बुणगेसुद्धा झुंज देत, मारीत मारीत जावें. आणि पुढें मुकाम जाहल्यावर तिकडून सरंजामहि येऊन पोचेल लष्कर आबादान जाहल्यावर पुनः गिलचाचें पारिपत्य करूं." हा सिद्धात केला. तेव्हा जनकोजी सिदे यास[५] मल्हारराव याणी सांगितले कीं, "निभावणी जाहली तरी उत्तमच आहे. नाहीतरी निभाव न जाल्यास पुढे गत कैसी होईल? निघण्याचा विचार ठीक दिसत नाही." भाऊसाहेबाचा व सर्वत्र मडलीचा व सरदार याचा व लहान थोरांचा आग्रह की, कूच करून दिल्लीचे रोखें[६] जावें. यास्तव उपाय राहिला;[६] परतु उद्यांच निघून जावें असें नाही. रविवारी पौष शु. १३.

---

१. या पुढे 'खासा' हा शब्द सा. १९२२.

२. 'दिलीचा रस्ता' पासून तों खाली 'हा विच्यार पुसिला' इतका मजकूर २२ ओळी तुं. प्रतीत नाहीं.

३. 'पोटी' क. प्रत.

४. हे वाक्य क. प्रतीतहि आहे.

५. 'शिदे यानीं मल्हारराव यास विचारलें की' क. प्रत.

६. 'जाण्याचा उपाय राहिला' भाइसं.

(१८-१-१७६१) कूच करून जाऊं. तेव्हां भाऊसाहेब बोलले कीं, " आज मंगळवार पौष शु. ७ (१३-१-१७६१) आहे. रविवारास साहा दिवस अवकाश आहे तोंपर्यंत लष्करचे लोक कितेक आनाविणें मरतील व गिलचांचे लष्करांत कितेक जातील; मग जाऊन सार्थक काय? इतके दिवस लष्करात धीर पुरवत नाही, यास्तव उदयीक कूच करून जावें. 'मारावें किंवा मरावें' हाच सिधांत उत्तम," याप्रो मनसोबा ठरवून इभ्राहिम गाडदी यास बोलावूं पाठविलें. त्यासहि विच्यार पुसिला. तों त्याणे जाबसाल केला की, "भाऊसो, तुम्ही जे समयी इकडे येण्याची मसलत केली ते समयी तुमचे आमचे आणभाक जाली आहे. आमचे गैरइमान आहे तर आजपर्यंत येथें न ठरतो.[७] तुम्हास मिथ्या भासलें तरी प्रचीत दाखवितों" म्हणोन दुराणी व नजीबखान रोहिला सुजातदोला यांचीं पत्रें पंचवीस[८] दाखविली की, "तुम्ही आम्ही एक जात; या समयी आम्हाकडे यावे. तुम्हास पंचवीस लक्ष रुपयेचा मुलूख देतों. पादशाही उमराव किताबत देतो." म्हणोन पत्रे आली होतीं, ती दाखविली भाऊंनी वाचून पाहिली तेव्हां इभ्रामखान गारदी याची निखालसता देखिली आणि उत्तर केले कीं, "आमचे इमान आहे तेंच खरे आहे. परंतु आतां दिलीस जाऊन पोचावयाची तजवीज कोणती करावी? निभावणी कसी होईल? याची मसलत काय? याप्रो पुसतांच इभ्रामखान गारदी याणें उत्तर केलें की, "तुम्ही गलीम लोक. तुम्हास हिंमत पुरणार नाही. तुम्ही आम्हास घेऊन आला ते आमची काहीच निभावणी करावयाची दिसत नाहीं. रणात आम्हांस सोडून जाल. आम्हांस मात्र मृत्यूनें गाठिले हेंच खरे." असें ऐकून मागती भाऊसाहेब याणी दुसरें इमान दिलें की, "तुम्हास सोडून आम्हा कदापि जाणार नाही. तुम्ही जेथें उडी टाकून[९] गाडून उभे राहाल, तेथे आम्ही कनात होऊ; परतु रण मोडून जाणार नाही." म्हणोन इमान-प्रमाण दिले. तेव्हां इभ्रामखान याणें आणखी लहानथोर सरदार याणी निखालसता मसलत दिली की, "हरयत्ने दिलीस पोंचावें हे खरेंच आहे. आता जाण्यास उपाय मागणें त्या रीतीनें वर्तं तुम्हीही सर्वत्र एकदिलानें वर्तावें. आवघे पार पाडून जाऊ याची मसलत एक आसे की, देशी मोंगल निजाम-अली नबाब हा तुम्हास लढाई हामेशा करितो. त्याप्रो गोल बांधून मध्यें बुणगे घालावे. भोंवताला आराबा वाटून द्यावा. चहूंकडून चार सरदार मातबर देऊन जिकडील तिकडे बाजू वाटून द्यावी. कोस दोन कोस लढत भिडत दिलीस जाऊन पोंहोचावें" याप्रो मसलत सांगितली. हे[१०] सर्वत्रास अनुमतास आली.

---

७. 'कधींच मुजरा करून जातों' हें वाक्य सा. १९२२ त यापुढें अधिक, पण सा. १८७९ व १८८६ नाहीं. "गैर इमान असतें तरि तुम्ही आजपर्यंत येथें न ठरतां" पु. प्रत.

८. 'त्या पत्रांवर त्यांचे शिक्के अशी' सा. १९२२.

९. 'गाडून' सा. १९२२.

१०. 'ती' सा. १९२२.

**१२७. ठरल्याप्रमाणें फौजेचा गोल बांधून निघण्याची व्यवस्था**

याप्रो निश्चय ठरल्यावर दुसरे दिवशीं तमाम फोजेस खर्चास दिल्हें. पहिल्यानें ज्यास बाजारांत आन मिळालें त्यानी आणिले; ज्यास आन मिळालें नाही त्यांनी मिठागा आणिल्या. निदान खोबरे, गूळ, साखर, खारीक[11] वाणियाची नाहींशी केली. फोजेंत तमाम निरवानिरव जाहली. प्रहर रात्र पहांटेची उजेडावयाची राहिली तो कुचाचा नगारा जाहला. तो दिवस शके १६८२ सोळाशे ब्याऐंशी पोष शुद्ध ८ बुधवार[12] विक्रम संवत्सरे ते दिवशीं प्रातःकाळी स्वारी तयार केली. भालदार, चोपदार व परकारकून जागा जागां सरदार यासी पाठविले कीं, "लोकरच स्वार होऊन निशाणापासी यावे." या प्रो सर्वत्रास ताकीद करून खासा आपण व विश्वासराव अंबारीत स्वार जाहाले. सौभाग्यवती पार्वतीबाई अंबारीत व नाना फडनवीस याची मातोश्री व स्त्री एका अबारीत,[13] पार्वतीबाईचे नजीक होती. आणि तोफखाना इब्राहिमखान गाडदी उजवे[14] बाजूस सिंदे होळकर होते. डावे बाजूस दमाजी गायकवाड व यशवंतराव पवार व अंताजी माणकेश्वर व विठ्ठल सिवदेव व समशेर बहादर व आणखी लहानथोर पथके दोन्ही बाजूस मध्ये आपण खासे व हुजुरात होती. कितीएक पथके पिछाडीस बुणगे मध्ये घालून होते. याप्रो नेमणूक करून गोलाचा गोळ सात-आठ घटका दिवस आल्यावर निशाणे हात्तीवर देऊन, नौबत चौघडा सुरू करून, भाराचा भार चालिले. दीड कोसावर जाऊन उभे राहिले. आणि तोफखान्याप्रो मातबर तोफा निवड करून गिलच्यांचे तोंडावर दिल्ह्या.[15] बाकीच्या हलक्या तोफा सभोवत्या देऊन त्याचे मागे गाडदी याचा रिसाला नेमून देऊन, त्याचे मागे राडी फौज, त्याचे मागें बुणगे, त्याचे मागे कांही सडच्या फौजा असा जिकडील तिकडे बंदोबस्त राखिला. आणि तळ सोडून दीड कोसावर जमावसुधा आले. मागे तलावर गाडे व छकडे व इतर सरंजाम, चालेना तो, जाग्यावरीच टाकिला.

**१२८. गिलच्यानें वाट दिल्ही, तर लढाई नाहीं; मार्ग न मोकळा दिला तर मध्यें घोडीं घालून मार देत निघून जावें, असा भाऊसाहेबांचा बेत बदलला**

तिकडे **मोंगल[16] आपले तळावर तयार होऊन जमावसुद्धां गोल[17] बांधून उभा राहिला**. तों भाऊसाहेब यांणी मसलत केली की, "आपण नीट चालून जावें **आम्हांस गिलच्यानें वाट देऊन[18] एकीकडे जाहाला तरी[19] त्यासी[20] लढाईचें प्रयोजन**

११. हा शब्द भाइस मध्ये नाही; सा. १९२२ व सगजो. मध्यें आहे.

१२. हा शब्द तु. व सां प्रतींत नाही.

१३. 'अंबारीत' हा शब्द भाइसं. सा. १८७९ त व १८८६ त नाही.

१४. शें. व सा. 'डावे बाजूस' मं. व भाइसं.

१५. 'घातल्या' सा. १९२२.

१६. 'दुराणी व रोहिले व सुजातउद्दवला' क. प्रत

१७. 'आंवळून' सा. १९२२.

१८. यापुढें 'बगल मारून' हे शब्द सा. १९२२.

१९ यापुढें 'बरे' हा शब्द भा. प्रत.

२०. येथपासून तु. प्रतीच्या पाठात अंतर फार येते. बहुधा मधील मधील मजकूर गाळलेला आहे, व कोठें कोठें मागें पुढें झालेला आहे.

**अगदीं नाहीं.** आणि मार्ग मोकळा करीत नाहीं तरी मध्येंच घोडी घालून मारामार करून उधळून देऊ. मग मार देत नीट निघोन जावें." आसी मसलत केली. **रात्रीं मनसबा केला होता तो राहिला,** आणि पुढें 'विनाशकाल विपरीत बुद्धी' निर्माण जाहाली. ते समयी सर्वत्रांस सागून आराबा अवघे मागें टाकून, निशाणें सोडून, फौजा पुढें चालिल्या. तेव्हा फौज जमून जात नव्हती. मुजऱ्यास फरा[२१] धरावा तसा फरा बाधून फौज उभी राहिली. ते समयीं इभ्रामखान गाडदी यानें चित्तात विचार केला की, "रात्री भाऊसाो याणीं मनसबा केला काय? आणि हालीं हे करतात काय? आतां मसलतीस धका एकंदर पका बसला. उपाय आवघ्याचा राहिला. भाऊसाहेबांच्या बोलण्याची[२२] करण्याची शाश्वती समजली. आसो. आम्ही भाऊसाहेब यांस इमान दिले आहे त्यापेक्षां आता मागेंपुढें पाहाणें तरी आपले पूर्वजांस बोल! भाऊसाहेब जें करतील, त्यास सादर न होतां गत्यंतर नाही. भाऊसाहेब थोर आहेत. दैवी असेल तें खरें. परंतु रणात विन्मुख व्हावयाचें नाही. आसो. आपले आयुष्याची सीमा झाली. शंभर वर्षें पूर्ण भरली. 'आपली कास बळे घालावी, कोणाची आस न धरावी' आसो. दैवी असेल तसें घडेल." इब्राहिमखान याणें आराबा सोडून तोहि डावे बाजूस आला. बुणगे व तोफा मागें झाडून मोकळ्या राहिल्या.

**१२९. भाऊसाहेबांनीं अबदलीच्या वकिलाचा धिक्कार करून लढाईस प्रारंभ केला**

इकडे झाडून मोंगल[२३] युद्धास तयार होऊन उभा राहिला. ते समयी आबदुल आलीकडील वकील भाऊंकडे आले की, "आजचे दिवस युद्धास तहकुबी[२४] करावी. सल्ल्याचें बोलून ठीक करितों. उतावळी करूं नये. आसें बोलणें आले. भाऊसाहेब यांणी त्या वकिलास माघारें धिक्कार करून लावून दिलें. परस्परें गोळागोळी[२५] सुरू जाहली. त्याजकडील तीनशे तोफा व गनिमाकडील दोनशें तोफांचीं एकदांच सरबती जाहली. धाकटी यंत्रे व हस्तनाला व सुतरनाला व जेजाला व बंदुका व रेखले यांस गणतीच नाही. मोठी गर्दी होऊन गेली. धुराचे गर्दीनें सूर्यबिंब आगदीं[२६] आच्छादिलें. कोणाची खबर कोणास नाहींशी जाहाली. त्यांत शूर होते त्यांस वीरश्रिया आल्या. भ्याड होते त्यांस आसें जालें की, 'दे माय धरणी ठाव,' असें जाहलें. धडाक्याखाली घोडी मनुष्यें धुद जाली. रणतुरे व रणभेरी व आराबियाचीं वाद्यें एकदांच[२७] कल्होळ[२८] जाला.[२९] तों हुजरातीचे लोक बहुत दिवसांचे खानदान होते, त्यांणीं कृतसकल्प केला कीं, "बहुत दिवस आन यांचें भक्षिलें आहे, त्याची

---

२१. 'धारसा' सा. १९२२ 'फरा' क. प्रत.

२२. हा शब्द सा. १९२२ मधील.

२३. 'दुराणी' क. प्रत.

२४. 'महकुबी' क. प्रत.

२५. 'गोळागोळीस तोंड लागलें' सा. १९२२, शें. भा. व मं.

२६. हा शब्द सा. १९२२ त नाहीं. भाइसं. मध्यें आहे.

२७. 'एकच' मं.

२८. 'कोलाहल' सा. व मं.

२९. यापुढें 'उभय दळें मिळतीं जाली' हें वाक्य. सा. १९२२, शें. व भा.

उत्तीर्णता आज आहे" म्हणोन यांजवर हुजरातीनें कडनिकड करून घोडे घातले. युद्धास तोंड लागोन घाव केला. क्षणभर हुतुतुसारखें मोडून घालविलें. त्यांणींहि एकवेळ मोडून घालवीत. अशा पांच-सात हिरहिऱ्या जाहल्या. तों विट्ठल सिवदेव व यशवंतराव पोवार काहीसे[३०] काढोन गेले.[३१] त्यांजवर झुज पडलें. तेव्हां हे कच[३२] करून माघारे तोफखान्यांत येऊन उभे राहिले. तों दमाजी गायकवाड यांजवर गिलचांनीं येऊन नेट बसविला. तेहि माघारे येऊन उभे राहिले. मुकामीं गोटाचा गोट राहिला. त्याजप्रां पथकें उभी होती, त्यांजवर खासा आबदल अली त्या झुंजावर डावेकडे होता, त्याणें युद्ध भारी केलें. भाऊसाहेबांकडील पथकें माघारी फिरलीं. हलकल्लोळ[३३] जाहला. इब्राहिमखान गाडदी याजवर खासा दुराणी व रोहिला चालून आला. याची त्यांची एक रंजक उडाली. तिकडील बहुत पडिले. परंतु जाग्यावरून हालले नाहीत. तसेंच नेट धरून मारीत आले. आणि इब्राहिमखान याजवर पडले. गाडदी यास कुमक कोणीच केली नाही. तथापि सांभाळून येऊन हुजरातीचे लोक व आपण एकत्र लढूं लागले. तोफाहि सुटत होत्या.[३४] लढाई मातबर एक प्रहर जाहाली.

**१३०. विश्वासराव घोड्यावर स्वार होऊन घाव घालतात; पण गोळा लागून घोड्यावरच ठार : भाऊसाहेब अबदालीस मार देऊन नदीतीरास पळून लावतात : विठ्ठल शिवदेवांचे पदरचे गिलचे मराठ्यांचीच फौज लुटतात**

इकडे उजवे बाजूस सिंदे-होळकर होते. त्याजवर सुजातदौला तीनशें तोफा व पन्नास हजार रिसाल्याचे लोकांनिसी झटून पडला युद्ध मातबर होऊं लागले तों मध्यें भाऊसाहेब व रावसाहेब अवारीत होते ते उतरून घोड्यावर स्वार जाहाले. भाऊसाहेब[३५] बोर घोड्यावर व रावसाहेब दिलपाक[३५] घोड्यावर स्वार जाहाले होते. चहूंकडे[३६] सांभाळून होते. मारामारी होतच आहे, तों मोठमोठे मातबर खासे पडों लागले. ते समयी विश्वासराव याणी हुजरातीच्या लोकात येऊन घोडा घातला आणि घाव केला.[३७] तों ईश्वरी क्षोभ जाहाला. एकाएकींच छातीत गोळा लागून विश्वासराव घोड्यावरच ठार जाले. नानासोाचें निधान हरपले.[३८] तों लोकांनीं कडनिकड करून मुडदा अंबारींत घातला आणि वरती शालजोडी घातली. हें भाऊसाहेबांनी पाहून अवसान सोडिले. बहुत विलाप करून मग[३९] भाऊसाहेबांनीं निश्चय केला की, "या उपरी गिलचा खाशानिशी मारीन." म्हणोन लोकांस

---

३०. यापुढे 'मधीच' हा शब्द शें. त

३१. 'गेले होते' मं.

३२. 'हल्ला करून' शें.

३३. 'हलके बहुत जाले' सा. १९२२ व शें.

३४. यापुढें 'लढाई मना जाली नव्हती' हें वाक्य सा. १९२२ अधिक आहे.

३५. 'हुर घोडीवर व रावसाहेब पिल्या घोड्यावर' धो. प्रत. 'पीलबाला' सा. १९२२ व 'दिल पाक' क. प्रत.

३६. 'चहूंकडून खाशांस' क. प्रत.

३७. 'घोडा आपला उठवून शत्रूचे फौजेंत तलवार चालविली' सां. प्रत.

३८. 'ठार पडलें' मं. सा. १९२२.

३९. 'करूं लागले. मग त्या त्वेषानें सा. १९२२.

ताकीद केली. आणि युद्ध केलें. 'हाणा, हाणा' असे मुखानें बोलोन बरोबर समशेर बहादर घेऊन पुढे जाऊन तीन वेळा हत्यार केले. लोकानी हिमत धरून भाऊसाहेब पुढे सरसावून सिपायगिरी बहुत केली.[४०] रोहिला[४१] माघारा फिरविला, आबदुल आली पळोन नदीतीरास गेला. शर्थ युद्धाची जाली. पुढे विठ्ठलराव सिवदेव[४२] यांणीं पेशजी गिलचे चाकरीस ठेविले होते. ते दोन हजार होते. त्यास इशारतीस भगवा पटा[४३] दिल्हा होता तो डोईस बांधून फिरत होते. ते समयी विश्वासराव पडले ही खबर लस्करांत बुणग्यात आली. ते समयीं सर्वत्र बुणगे लस्कर गडबडलें होतें. गिलचे चाकर याणी भगवा पटा टाकून दिला आणि बुणग्यात आवई[४४] घालून लुटूं लागले. बुणग्याचा पळ काढिला. बुणगे पळत हें पाहून विठ्ठल सिवदेव याणीहि पळ काढिला. आधींच विश्वासराव यांचें वर्तमान ऐकून दहशत खाली होती. कोणी दम धरून बुणग्यांत उभा राहिला नाही, [गिलचे चाकर याणी] लुटीची आवई घातली, आणि धुदाई मांडिली.

**१३१. रावसाहेबांच्या मृत्यूमुळें पार्वतीबाईचा शोक; पण नाना फडणविसांची आई 'ईश्वरें ओढूनच आणिलें' हें सांगून शांत करते**

इकडे भाऊसाहेबाकडे युद्ध होतच होतें. भाऊसाहेबांची स्त्री पार्वतीबाई तेथेंच अंबारीत होती. अंबारीस अंबारी तटली होती. युद्धाचे धुंदींत घाबरी होऊन अवघे लक्ष पुढेंच होतें. तों एकाएकीं अंबारीत विश्वासराव यांचा मुडदा पाहिला आणि बाईनीं महातास पुशिलें की, 'हा मुडदा कोणाचा आहे?' त्याणें उत्तर केलें की, "विश्वासरावसाहेब ठार जाले!" खवाराखान्यात खिजमतगार होता. त्यास सांगोन तोंड उघडून पाहिलें तों रावसाहेब मृत्यु पावले, हें पार्वतीबाईनी पाहून ऊर व कपाळ बडवून घेतलें, शंखध्वनीहि केली आणि बोलती जाली की, "ईश्वरें आम्हास एवढें निर्वाण कां दाखविलें? रावसाहेबांसारिखे रत्न हरपोन गेले." म्हणोन बहुतच शोक करिती जाहली. तों जवळ नाना फडणवीस यांची मातुश्री होती, तिणे सांतवन[४५] केलें की, 'बाई! ईश्वरें आम्हांस ओढूनच आणिलें आहे एवढ्याजवरच मुक्तता जाली नाहीं. आजूनहि सर्वत्र लहानथोरांस महा अनर्थ आहे. त्यात ईश्वरच पार पाडील तरी बरें. नाहीं तरी रडें लागलेंच आहे. तों पावेतों दम खावा." म्हणोन शात केलें.

---

४०. 'लढण्याची शर्थ केली. त्या शर्थीस उपमाच नाहीं. मर्दुमकी किती वर्णावी? अशीं वाक्ये क. प्रतीत अधिक.

४१. 'दुराणी व रोहिला' सा. १९२२.

४२. 'भाऊसाहेबांनीं' सा. १९२२ मधील ८६ टीप. 'यांणीं' च्या पुढें 'बुणगे' असा शब्द पुणें प्रतीत.

४३. 'पटका' सा. १९२२.

४४. 'गिलचे आले म्हणून पुकारा करून आपणच लुटूं लागले' सां. व क. प्रती.

४५. 'शांत केली' सा. १९२२.

## प्रकरण पंधरावें

# इब्राहिमखान व भाऊसाहेब यांचा पराक्रम व शेवट

### १३२. मराठ्यांच्या निरनिराळ्या सरदारांवर अबदली सैन्याचे हल्ले : मराठी फौज उधळून गेली; इब्राहिमखान गाडदी जखमी व कैद

इकड हुजरातीनें व इभ्राहिमखान गाडदी याणें कडनिकड करून एक वेळ त्यांस (दुराणीस) मोडून त्याचे जाग्यापावेतों तुडवीत गेले. ते समयीं आबदलआली दुराणी केवळ नामर्द, यमुनातीरानें दोन कोसपर्यंत पलाले. हें नजीबखान रोहिला याणें पाहून दांतानें ओंठ चावून हवालदील होऊन हावद्यांतून[1] पाय उतारा जाहाला. तसेंच दुंदेखान रोहिला व आमदखान लंगडा असे पायउतारा जाहाले आणि सिंदे होलकर हे उजवे बाजूस आहेत अशी वार्तमा आणून, त्यांस सोडून इकडे[2] डावे बाजूवर चालोन घतले. आधीं तोंड समशेर बहादर यांजवर बसविले. ते समयीं समशेर बहादर याणें मारामार बहुत केली. तोफाहि तशाच सोडिल्या. आणि[3] पाहिजे तितकी मर्दुमी केली. अंगावर जखमाहि बहुत चढल्या; परंतु फौज उडोन गेली. तसेंच आनुक्रमें दमाजी गायकवाड याजवर तोंड बसविलें. त्यांणी क्षणभर मारामार बहुत केली.[4] तेहि बाजूस निघोन गेले. मग तसेंच विठ्ठल सिवदेव व अंताजी माणकेश्वर व यशवंतराव पवार याजवरहि येंऊन मार बसविला. तेव्हां त्यांणीं[5] करावयाची तितकी बहुतच केली. परतु फौज जमून राहीना. यास्तव सर्वांचेच उपाय राहिले. त्यांचेंहि[6] मुंडमोचन जाहालें. इभ्रामखान[7] गाडदी याजवर तोंड लाविलें. इकडे भाऊसाहेब यांजकडे लढाई होतच होती. होतां होतां मारामारी खणाखणी जाहली. ते समयी विश्वासरावसाहेब यांचें वर्तमान ऐकून जनकोजी सिंदे व तुकोजी होलकर[8] यांनी मोठी मर्दुमी[9] करून मारामारी करीत भाऊसाहेबांपासीं आले. तों इभ्रामखान गाडदी यांजवर दुराणी येंऊन पडले. त्याणें जिवाचा निधडा करून शिपाईगिरी म्हणावी तैसी केली. कितेक गाडदी खेतीस आले; परंतु कुमक कोणाच्यानें जाहली नाहीं. मग एक क्षणांत पाच हजार गाडदी ठार जाले.[10] होते कीं नव्हते असे केले. हुजरातीचे लोक जवलचे पलों लागले. तोफखाना बंद जाहला.

---

१. हा शब्द सगजो न मं. मध्यें नाहीं.
२. 'इकडे' हा शब्द भाइस. मधील.
३. यापुढें 'तों फौजेनें हाराच सोडिले' हें वाक्य सा. १९२२ त अधिक
४. यापुढें परंतु हा शब्द सा. १९२२.
५. 'त्यांणी' या शब्दांपुढें 'मर्दमी हा शब्द शें. त अधिक.
६. 'पवार याचें' सा. १९२२.
७. हें वाक्य भाइस. मध्यें नाहीं.
८. 'शिंदे' सा. १९२२.
९. हे ३ शब्द सा. १९२२ त नाहींत.
१०. 'ऐसें ऐकोन दुराणी पळून गेला होता तोहि माघारा आला' असें वाक्य तुं. प्रत येथें देते.

बारगीनिशी तरवार सीमापुरतीच केली. जाऊन गिलच्याच्या लस्करांत मिसळले[११] आणि दहा पांच नामांकित[१२] मारून ठार केले.[१३] भोंवता वेढा गिलच्याचा पडला. अंगावर जखमा भारी चढल्या. दुराणी पळों[१४] लागले होते तेहि माघारे आले. गाड्यांचे मुडद्यांचे ढीग पडले. इभ्रामखान गाडदी याचा पुत्र व भाचा होता तो ठार जाहला. खासा इभ्रामखान गाडदीहि रणांत घायाळ जाहला[१५] असें असतां लढतच होता. यत्न चालेना, तेव्हां हत्यार राहिलें. मग धरून नेला.

**१३३. मल्हारराव होळकर व हुजुरातीचे लोक यांजवर दुराणीचा हल्ला : होळकर बाजू सोडून निघतात.**

हें वर्तमान भाऊसाहेबांस कललें. चोहोंकडून प्रळय एकदांच जाहाला. मोठी बुदी जाहाली. यशवंतराव पवारहि ठार जाहाले. कोणास कोण पुसेनासें जाहालें. जाग्यावरच इभ्रामखान गाडदी होता कीं नव्हता असा जाहाला. वरकड[१६] मल्हारराव होलकर याचे बाजूवर झुंज मातबर जाहालें. रेटत नाहीसें जालें तेव्हा **ती बाजू सोडून निघाले**. मग केवळ तोंड हुजरातीवर बसविलें. ते समयी हुजरातीनें शर्थ करावयाची ती बहुतच केली. जेथून मराठे याचें राज्य जाहालें होतें त्यापासून याप्रमाणें मराठे कधींच झुजले नव्हते. भाऊसाहेब याणीं नांवनिशीवार आसाम्या हटकून घालविल्या. आपणहि खासा[१७] घोडियावर स्वार जाले होते. विश्वासराव ठार जाहाले, त्यापेक्षां आता नानासाहेबांस तोंड काय दाखवावें ? म्हणोन शोकांतच होते. तों अवघा मार भाऊसाहेबांवरच पडला. तरवारीची खणाखणी जाहाली. डुकर खळीस येतो तैसा प्रकार जाहाला.[१८] भाऊसाहेब लोकांत गर्द[१९] जाल्यावर घोडीं-मनुष्यांनीं खंदक[२०] भरला. माणसें सर्व खपलियावर दिशाभूल जाहाली. कोणीकडे पलावयाचें सुचेनासें जालें. तों तिसरा प्रहर जाहाला.

---

११. यापुढें क.प्र. म्हणते :—"इभ्रामखान गारदी व कांहीं लोक असे गोलच्या गोल जाऊन गिलच्याच्या लष्करांत मिसळले."

१२. 'नामांकित' या शब्दापुढें 'सरदार दुराणीचे' हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत. 'दुराणीचे' हा शब्द शा. १८७९ व १८८६ त नाहीं.

१३. यापुढें 'इतरांची गणतीच नाहीं' हें वाक्य सा. १९२२ त अधिक आहे. पण सा. १८७९ व १८८६ त नाहीं.

१४. 'पळोन गेले' सा. १९२२.

१५. यापुढें "भाऊंनीं कांहीं गिलचे ठविले होते ते त्यांनीं बुणग्यांत शिरून बुणगे पिटूं लागले. चोंहोकडून प्रलय एकदांच जाहाला" हा मजकूर सगळा मध्य अधिक आहे.

१६. 'इकडे' सा. १९२२.

१७. यापुढें 'अगोदरच' हा शब्द सा. १९२२ त अधिक आहे.

१८. 'डुकर खळीस येतो आणि खवळून उभा राहतो तसे राहोन युद्धाचा प्रसंग चालविला होता. भाऊसाहेब लोकांत गर्द होऊन राहिलेवर घोडीं मनुष्यें सर्व खपलीं" अशी वाक्यें क. प्रत देते. भाऊंनीं केला. १८७९–८६ सा.

१९. "गर्द" सा: १९२२; शें. व भा. 'गर्दी' भाइसं. दणगें जालियावर' घोडीं तुं. प्रत. दणगें=गर्दी.

२०. हे दोन शब्द भाइसं. मध्यें नाहींत.

**१३४ अंगावर ब्रह्मांड कोसळलें तरी भाऊसाहेबांची हिंमत हरली नाहीं. शेवटीं भाऊसाहेब व जनकोजी अस्मानांत गैब झाले !**

उपरातिक **चार घटकांपर्यंत** भाऊसाहेबांनीं हुजरातीनिशीं मारामार केली; **परंतु**[२१] **डावे बाजूनें हातच सोडिले.** आभाळ फाटलें तेथें ठिगळ[२२] कोठवर लावावें ? **मग** भाऊसाहेब घोड्यावरून पायउतारा जाहाले. भाऊसाहेब यांचे तोंडास 'हाणा हाणा' हेंच करीत असता खरस आली. जातीनिसी मोठा हिया करून बहुतच **झुंजले** तें कोठवर लिहावें ? **सरकारचे मुछदी तमाम मातबर कुल एकीकडे पळून गेले.** ते समयी सोनजी भालकर[२४] यासी भाऊसाहेब बोलिले कीं, "सोनाजी बाबा **या** समयी निघावयाचे नव्हते. तुमचा भरंवसा बहूतच धरिला होता." तेव्हां **सोनजी बाबा** बोलिला की, "लोक पळतात त्यास माघारे फिरवितों. साहेबांस टाकून आम्ही कोठें जावें ?" असे बोलून लोक फिरावयास गेले, तिकडेच गेले. तेव्हां **तुकोजी** सिंदे[२५] म्हणों लागले की, "महाराज, क्षत्रधर्माची शर्थ जाहाली. याउपरी निघाल तर उतम आहे." तेव्हां भाऊसाहेबांनीं उतर केलें की, "तुकोबा, आतां **कोणीकडे** जावें ? काय तोंड नानासाहेब यांस दाखवावें ? रावसाहेबाची गत काय जाहाली ती पाहावी आणि इभ्रामखान गारदी यास इमान दिलें हें काय ?" आसें **ऐकून** मागती तुकोजी सिंदे यानी उतर केले की, "भाऊसाहेब ! तुम्ही वाचलां तरी आवघ्याचा सूड घ्याल. नाही तरी तुमचे मागे आवघ्याच गोष्टी आटपल्या." **असें** ऐकून मागती भाऊसाहेब बोलिले की, "पुण्यात नानासाहेबास तोंड काय म्हणोन दाखवावें ? विश्वासराव याची गत असी. त्यापेक्षां निघावयाची[२६] गोष्ट घडणार **नाहीं.** रणाचे ठायी ईश्वरसत्तेनें जें घडणार असेल तें घडो. परंतु कदापि नामोहरम व्हावयाचें नाहीं." आसें म्हणतांच तुकोजीबाबा यांणी घोड्यावरून उडी टाकिली आणि जातिनिसी हत्यार केलें. तेथें मोठी मर्दुमी करून **मराठी धर्माची शर्थ करून खस्त केली.** तो अकस्मात् गोळी लागोन ठार जाहाला. जरिपटकियाचे निशाणावर अगोदरच दाटी जाहाली होती. तेव्हा निशाण हत्तीवरून घोड्यावर घेतलें, आणि निशाण गुडाळून **पळों** लागले. तेव्हा भाऊसाहेबांनीं शाहादानें वाजविण्यास आज्ञा केली. फते जाली. शाहादानें वाजतात. यामुळें लोक माघारे फिरतील या अर्थें शाहादानें वाजवू[२७] लागले; परंतु **ज्यांनीं पल काढिला त्यापैी कोणी माघारे फिरले नाहींत.** भाऊ-साहेबांचे तोंडास खरस आली.[२८] 'हाणा ! हाणा !' म्हणावयाचें राहिले. तोंडापुढें कोणी ओळख्या आला तरी हुंकार देऊन माननें आज्ञा दाखवूं लागले. **अंगावर ब्रह्मांड**

---

२१. हा शब्द भाइसं. मध्यें नाहीं. सा. १९२२ त आहे.

२२. 'फाटलें' सा. १९२२, 'फुटले' मं.

२३. 'हात' मं.

२४. 'भालदार' मं. व भा.

२५. 'होलकर' भाइसं. 'सिंदे' सा. १९२२.

२६. हे शब्द भाइसं. मधील.

२७. 'वाजतात असें करूं लागले.'

२८. 'गळा वाळला' 'कोरड पडली' हीं वाक्यें सां. व क. प्रतींत अधिक आहेत.

**कोसळलें; परंतु हिंमत हरली नाहीं. भाऊसो यांजप्रमाणें पराक्रमी दुसरा होणें**[२९] **असाध्य गोष्ट.** जाग्यावरी[३०] हजार-बाराशें मात्र उभे राहिले. चोहोंकडे एकदांच आभाल पाढरें जाहालें. **जिकडे तिकडे पलों लागले**[३१] भाऊसाहेबाजवळ जनकोजी सिंदे व रावसाहेबांचे मुर्दाचे हत्तीजवळ शेंपन्नास लोक उभे होते तेवढे मात्र बाकी राहिले. सभोंवताला वेढा भारी पडला. युद्ध बहुत केलें. पूर्वीं युद्धांत अतिरथी, महारथी झुंजले; त्याप्रमाणें भाऊसाहेबांनीं विरथीपणें शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा जाहला. दुराणी व नजीबखान रोहिला त्यांणीं चाळीस हजार फौज त्यांतून दहा हजार फौजेनिसीं भाऊसाहेब यांजवर येऊन पडले. ते समयीं मारामार असी जाहाली की, 'न भूतो न भविष्यति' एकदांच भोंवता वेढा पडोन उभे राहिले. नंतर रवंदळारवंदळ[३२] बहुतच केली. यांत **भाऊसाहेब व जनकोजी सिंदे यांची गत कसी काय जाली** हें न कळे ! उभयतां खासे दृष्टीनें पाहिले नाहीत **गैब**[३३] जाहाले किंवा अस्मानांत गेले किंवा पृथ्वीत[३४] गेले, हें ईश्वरी कौतुक ब्रह्मादिकास न कले[३५] तेथे मानवियांस काय कळे ?[३६]

**१३५. मल्हाररावांचा उपाय राहिला : निघोन गेले**

इकडे मल्हारराव होलकर याजवरी गुदरली. ते समई आभाळास ठिगळ कोठवर लावतील ? उपाय राहिला. मग पंचवीस स्वारानिसी **बाजू घेऊन निघोन गेले.** रावसाहेबांच्या मुर्दाचा हती व भाऊसाहेबांची बसती घोडी ही सुजायतदौला यांजकडे सांपडली.

---

२९. 'होणें नाही' भा.

३०. हा शब्द सा. १९२२ मधील.

३१. यापुढें "सोनजी भापकर याणें एक वेळ उत्तर केलें की, 'भाऊसाहेब, तुम्ही निघावें" त्यासहि निदानवा जाबसाल केलियावर सोनजी भापकर यांणीं रिकीबींतील पाय काढून भाऊमागें अडासनीं (?) पाय दिला आणि उभे राहिलें" असें तुगार प्रतींत अधिक आहे.

३२. 'वरकड दल' भाइसं.

३३. 'गयफ' सा. १९२२.

३४. 'पाताळांत' क. प्रत.

३५. यापुढे तुं. प्रतींत पुढील मजकूर आहे :—"त्यात भाऊसाहेब यांची गत काय जाहली हें न कळे. तैशीच फौज घेऊन जनकोजी शिंदे यावर पडली. तेथें बहुतच मारामार जाहली. तों शिंदे याची फौज झाडोन निघोन गेली. खासा भाऊसाहेब कोठें आहेत, म्हणोन हुडकीत गेले. त्यासीहि फिरून देखिलें नाहीं. मग अनुक्रमें मल्हारराव होळकर याजवर अवघीच फौज येऊन पडली."

'खासा' या शब्दापुढ 'जनकोजी' असा शब्द सगजो. मध्य आहे.

यापुढें "त्यांनींहि बहुतच कस्त केली; परंतु नाइलाज जाहला" हा मजकूर सगजो. मध्यें अधिक आहे.

३६. यापुढ सा. व क प्रतींतील मजकूर "शत्रूचे हस्तगत जाहले म्हणावें तर त्यांस ब्रह्मांडभर आनंद जाहाला असता. तेंहि जाहालें नाहीं."

३७. 'देऊन' सा. १९२२.

## प्रकरण सोळावें

# मराठी सैन्याची कत्तल व पराभवाची मीमांसा

**१३६. पार्वतीबाईचें पुण्य सबल : जानोजी भिताडे त्यांस आणतो**

यानंतर इकडे पार्वतीबाईचे बंदोबस्तास विसाजी कृष्ण जोगदेऊ[१] यास पांचशें[२] बनगर नेमून दिल्हे. रखवालीस बारगीर ठेविले होते. त्यांस आज्ञा केली होती की, "आम्ही झुज पार होऊन नि ालों आसे कळलें तरी तुम्ही यांस घेऊन दिलीच्या रोखें आमच्या मागे पिछाडीस निघोन जावें. रणांत पडलों आसें वर्तमान ऐकिल्यावर यांसीं जिवें मारून तुम्ही निघोन जावें आसें सांगितलें होतें. भाऊसाहेब यांची स्त्री गिलच्याचे हातीं[३] सांपडली होती असा लौकिक मात्र न व्हावा; आसें करावें." असें निश्चयरूप सांगून त्यांस रखवालीस ठेविलें होतें. तों मोड जाहाला, लोक[५] पळों लागले. ते समयी विसाजी कृष्ण व लोक यांणी धास्ती खाऊन बाईची आस्था सोडून आपला जीव वांचवावयाची आशा धरून कोणीकडे गेले हें न कले. भाऊसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें कांहींच घडलें नाहीं.[६] तों एक घटका दिवस राहिला. ते समयीं पार्वतीबाई अंबारीत होती. तिनें हत्ती बसवून पाय उतारा होऊन बुणग्याचे सुमारें पलों लागली. केवल भांबावली. घरचा पोरगा कोतवाल घोडी घेऊन उभा होता.[७] तों बाईसाहेबांस घोड्यावर वसावयास देहेभान राहिले नाहीं. तशात जानू भिताडा म्हणून खिजमतगार येक जवल राहिला होता. त्याणें हिंमत धरून सोबतीस होता. तशा आकान्तांत वारवेकर[८] म्हणून होता. मातबर मनुष्य. घोडीहि सख्त पाठाळ. त्याची गांठ पडली. तेव्हां त्यास बोलिली कीं, "मी भाऊसाहेबांची स्त्री आहें. मजला घोड्यावर घ्यावें" म्हणतांच तोहि मनुष्य भला चांगला होता. तो हिंमत धरून बोलिला कीं, "बाईसाहेब, रिकिबीस पाय देऊन घोड्यावर यावें." म्हणतांच तिणें रिकिबीस पाय दिल्हा. मग भला माणूस याणें हात देऊन पाठीवर घेतली. मग तिच्याच सालजोडीनें कंबरेस पाठीमागें आंवळून बांधिली. भोंवतालें नजर केली तों गिलजे भोंवतालें. मागेंपुढें ढिगांचे ढीग देखिले. तेव्हां बाईस बोलिला कीं, "बाई-साहेब, निभावणीचें संकट दिसतें. असो. तुमचे सुकृतें तरी पार पडल्यास जाऊं."

---

१. 'जीगदंड' सा. १९२२. 'जो ं]. मं. व भा.

२. 'आणि सरकारचे खास पागेचे बार-गीर पांचशें." असें क. प्रतींत आहे.

३. 'झुंजून' सा. १९२२ व भा.

४. 'जिवंत' हा शब्द सा. १९२२ त अधिक.

५. 'लोक' हा शब्द भाइसं. मध्यें नाहीं. सा. सा. १९२२ त आहे.

६. हा जोगदंडाचा, भाऊचे आज्ञेचा वगैरे मजकूर तुं. प्रतींत नाहीं.

७. यापुढें "तो 'बाईसाहेब' घोडीवर बसावें. असें म्हणो लागला." हें वाक्य सा. १९२२ त अधिक.

८. 'बारवकर' सगजो. व भा.

म्हणोन त्याणें डोळे झांकून फौजेंतून घोडें हांकललें. तों बाईचें पुण्य सबल म्हणोन आशा अरिष्टांतून पार पडली. तों दिवस अस्तमान जाहाला. कोसभरपर्यंत गिलचे यांणीं पाठलाग केला; परंतु आशा अरिष्टांतून पार पडली. नाना[९] फडणवीस यांची मातोश्री श्रीभागीरथीचे यात्रेस जावयासी आली होती ती गिलच्यांस सांपडली. तिची गत पुढें काय जाहाली न कळे.[१०] नाना फडणवीस अल्पवयांतच होते. ते गडबडींत कोणीकडे उधळून गेले ते निभाऊन पळाबरोबर आले. नाना याची स्त्री होती. ती रणांतून बाहेर आलियावर तिणें घोडी टाकून दिल्ही.[११] ती पायउतारा होऊन अंगावरील वस्ता काढून फाटकें वस्त्र नेसून अगास माती लावून दिल्लीच्या रोखें गेली.

**१३७. मराठी फौजेचा धीर सुटून सर्वभर पळ : गिलचे डोचकीं कापतां थकले.**

दुसरें वर्तमान झुज झाल्यावर झुजातून मातबर सरदार लहानथोर कितीएक लोक आले ते पश्चिमेकडे[१२] झुजात तळावर खंदकांत येऊन दाखल जाहाले. तों भाऊसाहेब माघारें पळोन पूर्ववत्प्रमाणें तल बलकावून राहात्या जाग्याहून[१३] नित्य झुंजास जात, संध्याकाळ जाहाली, माघारें येत, त्याप्रमाणें येतील, म्हणोन बुणगेसुद्धा फिरोन तळावर दाखल जाहाले. तों येथील बुणगे व फौज पळती तेव्हां तेथेहि धीर धरवत नाही, आसें जाहालें. मग तेथून जिकडे वाट सांपडली तिकडे पलत चालिले. ज्यांच्या घोडयांत जीव होता ते खदकपार जाहाले. आणि पाणीपत शहरात गेले. तेथून जिकडे वाट पडली तिकडे पलत चालिले. ज्यास जसा मार्ग द्रष्टीस पडला तसे निघोन गेले. कितीएक गाड्या व छकडे व बायका वगैरे अवसानरहित होते ते खंदकांत पडले. त्यांस निघावयास आवसान जाहाले नाही. ते तेथेच राहिले. गिलचे डोचकी कापीत होते, ती कापावयाची सोडून दिली. कोठवर कापितील? मोडली फौज तितकी दिलीस गेली. कोणी वरकड कुरुक्षेत्रास व कोणी आडवे तिडवे मार्ग फुटले तिकडे गेले. ती कांहि निभावली नाहीं. ते गिलजांस सापडले. इकडे गिलचे यांणीं पाणिपत शहराचा बंदोबस्त करून खंदकांतील मालमत्ता लुटूं लागले. बायका धरून नेल्या. कितीएक जिवें मारिल्या. तीच गत पुरुषाची केली.

**१३८. मराठी युद्धधर्म : ईश्वरी अंश नानासाहेब व भाऊसाहेब उभयतांची अवतारी चरित्रें**

प्रात:कालीं चार घटका दिवसांनंतर झुंजास तोंड लागलें तें तीन प्रहर 'हाणा! हाणा! मारा! मारा!' हेंच. पृथ्वीनें बहुत अशुद्ध प्राशन केलें. हिंदु[१४] कधी मार्गे

---

९. येथें क. प्रतीचा पाठ :—"नाना फडणीस याची स्त्री व मातोश्री अंबारींत होत्या. त्या अंबारींतून उतरल्या आणि घोड्यावर स्वार जाहल्या."

१०. 'तिची यात्रा सफळ जाली' सा. १९२२.

११. 'तिजला घोडीनें टाकोन घोडी उधळून गेली.' क. प्रत.

१२. 'पश्चिमेकडून' शें.

१३. 'नित्य' शब्दापूर्वी 'यामागें हे शब्द सा १९२२ त अधिक आहेत.

१४. याप्रमाणें ईश्वरानें भूभार हरण केला. नानासाहेब व भाऊसाहेब हे ईश्वरी अंश. अवतार धरून या कलियुगीं उभयतांनीं अशा चरित्रानें भूभार हरला." इतकेंच सां. प्रत लिहिते. तुं. प्रतीत असें कांहीं नाहीं.

याप्रा॑ लढले नाहींत व मोडले नाहींत. याप्रो वखत घडला नाहीं. यापुढेहि होणार नाहीं. आसो. भगवंताची करणी. पृथ्वींतोल लोक नेहवून त्या स्थळीं मारावे हें कौतुक निर्माण केलें. मराठे लोक फौज हटले, कधींच मेले नव्हते. आपला भोंवता खंदक खणून कोणी राहिला कीं काय? हें मराठे लोक यांणीं कधींच केलें नव्हतें. मराठे यांची, चांगली गांठ पडली तरी झुज द्यावे, नाहीतरी पळोन जावें, मराठी धर्म याप्रा॑ पुरातन चालत आला आहे. तेणें करूनच पृथ्वीचें पालन केलें होतें. तें सोडून अविध धर्माचा अवलंब केला, तो मराठी धर्म नव्हे. म्हणोन आसें 'वानरतेल' निघालें. आणि पृथ्वींतील दक्षिण प्रातांचे पुरुष व बायका बहुत गैब जाहाल्या. ईश्वरसत्ता प्रमाण. त्याप्रा॑ जाहालें. नानासो व भाऊसो ईश्वरी अंश. आवतार धरून या कलियुगी उभयतांनीं चरित्रें केलीं. आसो.

## १३९. उमरावगीर गोसावी विश्वासराव आदि वीरांना विधियुक्त अग्निसंस्कार करतो

यानंतर इकडे युद्ध होतां होतां रात्र जाहाली. लढाई बंद जाहली. हत्यारें राहिलीं. विश्वासराव याच्या मुड्यासुद्धां हती अंबारीसुद्धां सुजातदौला याजकडे नेला होता. ते समयी सुजातदौला याजकडील उमरावगीर गोसावी[१५] याणें मागती आणखी तीन लक्ष रुपये देऊन विश्वासराव व तुकोजी होलकर[१६] व संताजी वाघ व येशवंतराव पवार असे चार मुडदे मोडवून आपलेकडे घेतले. ब्राह्मण मराठे मिळवून, त्यात विधियुक्त अग्निसंस्कार साहित्य उत्तम प्रकारे करून मुड्यास दहन केलें आणि अस्थीहि वाराणशीस रवाना केल्या.

## १४०. दिल्लीकडे कोण चालिले, ठार कोण झाले

वरकड मोडकी फौज नाना पुरंदरे व बाजी हरी व अंताजी माणकेश्वर व मल्हारराव होलकर, आसे रात्रौ दिल्लीचे सुमारे चालिले.[१७] परंतु तमाम लोकाची हिंमत हरली. गुरांचे[१८] गोवरे जाहले. राडांनो मारिलें तरी कोणी कोणास मिलेनासे[१९] जाहले. रात्रीचे लढाईत अंताजी माणकेश्वर व बाजी हरी ठार जाहाले. त्यांचे मुडदे देखील कोणी काढिले नाहीत. वेडावल्यासारखी माणसें जाहली. एवढे श्रीमंत त्यांच्या गती या प्रकारच्या जाहाल्या. 'कर्मणो गहना गतिः' असे ज़ाहले.

## १४१. अबदालीची अनुमति घेऊन कत्तल, लूट व कैद

मग कुतुबशाहा व सैदखान कालबाज याच्या पुत्रानी शाहास आर्ज केला की, "आम्हास कतल करावयास आज्ञा द्यावी." असें म्हणताच आबदाल आली बोलिला

---

१५. 'म्हणोन सरदारी करीत होता' हे शब्द सा. १९२२ त अधिक.

१६. 'शिंदे' सा. १९२२.

१७. "भाऊसाहेव यांची गत काय जाहाली ही यांस शुद्धच नाहीं. आपला प्राण वांचवून निघाले" हीं वाक्यें क.प्रतींत. अधिक आहेत.

१८. 'गाईचे गोरे आले' सा. १९२२ 'गाईचे गौर जाले' पु. प्रत. 'गुरांचे गुराखी असतात तसें जाहाले' क. प्रत.

१९. 'मिले असें नाहीं' भाइसं.

कीं, "मारले यास काय मारावें? यांत काय भूषण?" आसे ऐकोन मागतीं आर्ज केला की, "आमचा बाप कुतुबशा फौजसुद्धां कत्तल केले, त्याचा सूड उगवावा लागतो." आसें बोलोन उभे राहिले. तेव्हां आबदल आली बोलिला कीं, "येथून वीस कोसांवर चार घटकांपर्यंत कत्तल करणें, जास्ती न करणें." आसे ऐकल्यावर कुतुबशाहाचे पुत्रानें सोनपतानजीक चार हजार फौजेचें कतल केलें. तैसेंच आमदखान[20] लंगडा याचे पुत्राने बहादर-गडानजीक येऊन पांच हजार मनुष्याचें कत्तल केलें. पानपत शहरांतील[21] दरवाजे बंद करून बंदीवान[22] धरिले.[23] तेव्हां ताकीद जाहली कीं, 'माणसांस न मारावें मालमत्ता घेऊन सोडून द्यावें.' त्याजवरून दुसरे दिवशीं कोणी मारिले नाहींत. बंद धरिला, तो वीस हजारपर्यंत आणिला. दोन दिवसपर्यंत लष्करांत[24] होते. त्यास सुजातदौला याणी गिलच्यास तीन लक्ष रुपये[25] देऊन धर्मार्थ सोडून दिल्हे रणांतहि सुजायतदौला याणें शोध करून मातबर-मातबराची ओळख ज्याची निघाली त्यास नेऊन उत्तम गति केली. लष्कराचे लुटीनें गिलच्याचें लष्कर कुबेर जाहालें. घोड्यास कोणी पुसेनात, तेथें वरकड लूट कोण घेतो! ज्यास[26] गाढव घेण्याची शक्ति नाहीं त्यास हती प्राप्त जाहाला!

**१४२. दिल्लीस जातांना कित्येकांची नागवण, कित्येक मार्ग चुकोन भकोन गेले**

यानतर इकडील पळाचें वर्तमान तरी किती एक घोड्याचे सामर्थ्ये दिलीस पांच सात हजारांस रस्ता ज्यांस सांपडला ते निघाले. वाटेस दांडग्यांनी मारामार नागवानागव[27] करून कितीएकांची घोडी घेऊन सोडिलें, कितीएक जिवानिशी गेले.[28] त्याहीमध्यें ज्यांचे घोडियास बराच जीव होता, ते सरासरी पाच हजार माणूस वांचून गुरुवारीं सायंकाली दिलीस चालीस कोस मजल दर मजल दाखल जाहले. कितीएकांस दुसरा मार्ग सापडला नाहीं, ते भडकोन आड मार्गांत[29] फिरत फिरत जिकडे भगवंतें वाट दिल्ही तिकडे गेले!!

---

२०. 'सैमदखान कत्तलबाज' सा. १९२२.

२१. यापुढे 'दुसरे दिवशी' हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

२२. या शब्दापूर्वी 'पंधरा हजार' हे सा. १९२२ त आहेत. 'दहा हजार' शें. प्रत.

२३. यापुढें 'व खंदकातीलहि बंद धरिला' सा. १९२२. 'बंदिवान धरिलें' शें.

२४. हा शब्द सा. १९२२ शें. मं. व भा. प्रतींत.

२५. यापुढें 'खंडणी' हा शब्द सा. १९२२ अ अधिक आहे.

२६. 'गाढव घेण्याची ज्यास शक्ती नाही, त्यास हत्ती प्राप्त जाला' क. प्रत.

२७. 'जागोजाग' सा. १९२२.

२८. 'जिवें मारिले' सा. १९२२.

२९. यापुढें 'पडले ते' हे शब्द सा. १९२२ व शें. मध्यें अधिक आहेत.

## प्रकरण सतरावें

# मराठी फौजेचा पळ व जाटाचें औदार्य

### १४३. पार्वतीबाई व कृष्णाजी बलवन्त निभाऊन दिल्लीस येतात

यानंतर पावतीबाई यांजपाशीं जानू भिंतांडा खिजमतगार बारवेकर[1] यांणीं पाठीसी बांधून आणिली. त्याजवर तें घोडें थकलें.[2] मग पिराजी राऊत पुणताबेकर[3] याणें पाहतांच आपले घोड्यावर बसवून सोळा[4] कोसपर्यंत आणिली. मग त्याचाहि घोडा थकला. त्याणें उतरून ठेविली. पुनः जानू भिताडा खिजमतगार याणें कोस आर्धकोस चालवीत आणिली. आणि बलकट घोडा मातबर पाहून त्याचे पाठी बसवावी आसें करीत करीत दिल्ली अलीकडे तीन मजलीवर मल्हारराव होळकर व नाना पुरंदरे व कितीएक सरदार व पागेचे बारगीर, शिलेदार शेंपन्नांस भेटले, त्यांमध्यें येऊन मिळाली. बलवंतराव याचा पुत्र आपाराव तोहि निभाऊन आला. पार्वतीबाईचे चित्तात की, भ्रतार दिलीस आले असतील, म्हणोन बहूतच आशा होती.

### १४४. दिल्लीकडील हकिकत, नारोशंकर, त्याची फौज, खजिना इत्यादि

तों दिलीकडे मार (शक १६८२ पौष शुा ८ : १४-१-१७६१ जखर ६ बुधवारी[5]) तीन प्रहरपर्यंत युद्ध होऊन मोड जाहाले[6] ते गरुवारीं (पौष शुा ९ ता. १५-१-६१ जखर ७) प्रातःकाली कितीएक पळत आले. तेथे नारो शंकर व मीरखान[7] व बाळाजी पलांडे[8] आसे सहासातसें किलियात होते. बाकी हुजरातीचीं पथकें लक्ष्मणराव गावडे व हिरोजी शेलके व तुकोजी वाघ[9] व बापूजी रायाचें पथक व पर्वतराव कदम व गोविंदपत बुंदेले याचा पुत्र पाचशें स्वारांनिसीं आसे तीन हजार होते. दिलीच्या किल्ल्यांत नारो शंकर होते. त्या समयी त्यांजपाशीं चाळीस लक्ष रुपये खजिना होता.

---

१. 'बारवकर' तु. प्रत. 'वाटर्णेकर' भा. इ. सं. 'वारणकर' भा. इ. सं व मं. 'हर्णेकर' शें.

२. "तेव्हां जानू व वरणकर कोणी मराठा या दोघांनीं बाईस पाठीशीं बांधून चालविली. इतक्यांत पिराजी राऊत पुणतांबेकर आला" अशीं वाक्यें क. प्रतींत अधिक आहेत.

३. 'तांबवेकर' मं. हा शब्द सा. १९२२ त नाहीं; भा. इ. सं. मध्यें आहे.

४. 'साहा' १९२२. 'सोळा' सां. व क. प्रत.

५. यापुढें "अष्टमीस" हा शब्द सा. १९२२ त अधिक.

६. येथे क. प्रतीचा पाठ असा :— "तेव्हां फौजेस पळ सुटला. त्यांपैकीं कांहीं लोक गुरुवारी सायंकाळीं बुधवारची रात्र व गुरुवारचे चार प्रहर चालोन पळत येऊन दिल्लीस दाखल जाहाले."

७. 'मीरखान लेकवळा' सा. १९२२. 'तिरखा नबाब बाळाजीपंत असे सहा-सात घो. प्र.

८. 'पंत' भा. इ. सं.

९. 'तलखाजी बांधे' सा. १९२२. बहिराजी शेळके व तुकोजी वाघ' क. प्रत.

**१४५. लष्करचे व्यापारी, नारो शंकर, नाना पुरंदरे व गंगोबा इ. ची भिड येथें येईपर्यंतची दुर्दशा.**

पार्वतीबाई दिलीनजीक येतांच भाऊसाहेब नाहींत, म्हणोन ऐकतांच आशेची निराशा जाहाली. पळाचे स्वार तीन हजार बरोबर जमले होते.[१०] त्यांस सर्व पळाचें वर्तमान कळलें; परंतु तहकीक कळेना. कदाचित् दिलीत भाऊसाहेब आले असतील, [हे] अगोदरच पळाले. आसें जाहाले असल्यास तोंड दाखवावयास जागा नाही, यास्तव धीर धरून राहिले. दक्षिण देशांतील लष्करचे उदमी लोक तितके शहरांत जाऊन राहिले होते. त्यांस शहरचे लोक लुटू लागले व मारूं लागले. वाटेस[११] पथकें होतीं. त्यांणी गुरुवारी (पौष शुा ९ ता. १५-१-६१) तिसरा प्रहरपावेतों[१२] वाट पाहिली. मग 'झ्या झ्या' करीत निघाले. नारो शंकर वगैरे किल्ल्यांत होते. ते गुरुवारीं सायंकाळपर्यंत धीर धरून होते. काहीं खजिना सरकारचा होता. तो अगोदरच काडेम काढून, बाहेरील पथकें व आपण एकत्र होऊन निघोन गेले असते तरी निभाऊन जाते. आता तरी निभाऊन जावें तें न जाले. संध्याकाळी होलकर यांचे दिवाण गंगोबा तात्या पळत दिल्लींत आले. नारो शंकर यांजकडे त्यानें भोजन केलें. सविस्तर वर्तमान सांगितले "याज उपर ज्यांस मार्ग भगवंत देईल त्यांणीं निघोन जावें. सुधा मार्ग दिसत नाही. तुम्ही का स्वस्थ[१३] बसलां ?" असें नारो शंकर यांस सांगितलें.[१४] तेव्हा आवमानें गेली. खजिना काढावयास आनुकूल पडलें नाही. दिलीतील वाणी, उकाल, बायका[१५] लष्करच्या लोकांस मारूं लागल्या. गर्दी करून लुटूं लागल्या. शहरांत धूम बहुत जाहाली. तेव्हा जिवानिसीं मारामार करीत नारो शंकर वगैरे झाडून निघून गेले. खजिना जाग्यावर राहिला. अगोदर वाळवंटीचीं पथकें निघालीं. तीं फर्रीबाजेस जाऊन पोहोंचलीं, आणि जीन उतरलें. नाना पुरंदरे व गंगोबा तात्या[१६] आणखी शेपन्नास असे तेहि आले. सारे एकत्र होऊन तीन मजला आले तों होळकराची[१७] व बायकांची गाठ पडली. तेथून मजल दरमजल कूच करून आकरावे दिवशी पौष व. ५ मंगळवार (ता. २५-१-१७६१) भिडीस येऊन दाखल जाहले.

---

१०. यापुढे "ते वाळवंटी होते" हें वाक्य सा. १९२२त अधिक.

११. 'वाळवंट स' सा. १९२२.

१२. 'धीर धरून होते' सा. १९२२.

१३. 'डोळे झांकून सा. १९२२.

१४. यापुढें 'आणि ते स्वार होऊन तैसेच निघून गेले' हें वाक्य सा. १९२२ त अधिक.

१५. यापुढें 'देखील गांव-कुटार' हे शब्द सा. १९२२ त असून सा. १८७९ व १८८६ त नाहींत.

१६. 'बाळकोबा' क. प्रत.

१७. 'होलकराच्या बायकांची' भा. इ. सं.

## १४६. दिल्लीकडील व दुसऱ्या 'पळा'ची नागवण व भरतपूर जाट यांनी केलेलें सर्वांचें योग्य सहाय

इकडील वर्तमान कितीएकांस दिलीचा मार्ग सापडला, ते यांच्या मागोमाग भिडीवर आले. वाटेनें कितीएक जिवें मारिले. कितीयेकांस लुटन सोडून दिल्हें. दिलीचा मार्ग न सांपडला आणि भकोन गेले ते फिरत फिरत जाता जाता ते चाळीस[१८] हजार जमले. त्यांस पंचवीस-पन्नास दांडगे मिळोन लुटून घोडी हिरोन घेईत. असा अनर्थ होऊन मातबर मनुष्य पायउतारा जाहले. बहुतास आन्न कोठें मिळालें कोठे न मिळाले. मग आवघे जमून मथुरेस येऊन एक दिवस दम खाला. तों हजार[१९] मनुष्य थोर थोर नागवे उघडे केवळ भिकारी,[२०] भीक मागत, अन्नरहित व वस्त्ररहित, कळाहीन, चीलची[२१] भाजी खात आले. तों जाटाच्या मुलखात पोहोंचले. तों जाटाचें भय बहुत होतें; परतु त्याणें वर्तमान ऐकोन हिदुधर्मास भिऊन तमाम मुलखात सांडणी स्वार पाठवून ताकीद केली कीं, "कोणास न छळतां ज्यास जसे आनुकूल पडेल तसे आनवस्त्रें द्यावी." याप्रा॑ ताकीद जाहली. वाटेस एक गांव मातबर होता तेथे एका सावकारानें भिक्षेस खंडीभर उडीद ठेविले[२२] होते.[२२] तेव्हां येकमेकांनी जसी मिळाली तसी घेतली.[२३] येक दोन मणाच्या भाकऱ्या करून त्याचे पैशाएवढे तुकडे येक येक वांटिला. अशी भिक्षा घातली. अगावर वस्त्रें नाहीत. त्या शहरापावेतो[२४] 'ब्राह्मणास' अकरा दिवस अन्न मिळालें नाही त्यांत पौष मास, थडीचे दिवस प्रावरणास एकंदर अंगावर कांहीं नाही. मातबर होते ते दीनाप्रा॑ होऊन पंधरावे (पौष व. १०, ३०-१-१७६१) दिवशी भरतपुरास येऊन दाखल जाहाले. तेथें जाट याची बायको होती. तिणे धर्म बहुत केला. जागा जागां स्वार पाठवून पळाचे[२५] लोक आणिले, आणि पायली प्रा॑ दर माणसास तीस हजार काढून जो आला त्यास आठ रोजाचे आन्न भरतपुरी द्यावें, वस्तीस जागा द्यावा, भल्यास आपल्या महालापावेतों दस्तक द्यावे व ब्राह्मण होते त्यास बोलावून दूध, पेढे वगैरे मिठाई व सिधे सरंजाम देऊन आठ रोजाची बेगमी केली. दर ब्राह्मणास येक दिवस फराळास व पांच रुपये दक्षणा व येक पागोटें व येक रजई व येक धोतरजोडा व आठ रोजाचा सिधा बहुत प्रकारचा तूप साखर सुद्धां सिधा देऊन शहरास ब्राह्मणांस आराम पावावयास राहून घेतलें. आणि शहरात ताकीद केली की, "पळास आन्न द्यावें. राहतील तेथे वस्तीस जागा द्यावा. कोणी छळू नये." आसे बहुतांस ताकीद करून मातबर कोणी भेटलें त्यास बसावयास घोडी दिल्हीं व कोणास पालखी

१८. 'तीस' सा. १९२२.
१९. 'हजारो हजार' सा. १९२२.
२०. 'भणग कगाल' सा. १९२२. 'कंगालासारिखे' शें
२१. 'चालत' भाइसं.
२२. 'वाटले' शें. व सा १९२२.
२३. 'तेथे एक एकास दाहा दाहा दाणे वाटणीस आले' सा. १९२२.
२४. हा शब्द सा. १९२२.
२५. 'सर्वत्रांस' सा. १९२२.

दिल्ली. याप्रा‍ सर्वत्रांस[२६] सरंजाम करून दहा लक्ष रुपयेपर्यंत खर्च केला. तेणें करून बहुत लोक जगले. तेथून[२७] पुढे येतांना मार्गी दांडगे यानो वस्त्रे हिरोन घेतलीं. उघडे बोडके झडत पडत भिडेस दाखल जाहाले. पार्वतीबाई व होलकर व नाना पुरंदरे आसे सर्वत्र जमा जाहले होते. तेथें पंधरा मुक्काम जाहाले. तेव्हां सुरजमल जाट याणे रूपराम कटारी यासमागमें लक्ष रुपये व वस्त्रें मजलीवर[२८] पाठवून दिल्ही. तेथून मल्हारराव होलकर व नाना पुरंदरे व पार्वतीबाई वगैरे येक महिना ग्वालेरीस जाऊन राहिले. पळाचे लोक होते त्यास सर्वत्रांस वस्त्रें व पांच रुपये खर्चास बाईंनी दिल्हे. व नाना पुरंदरे यांगी तेथून बैरागी भाऊसो यांच्या शोधास पाठविले; परंतु भाऊसो याचा ठिकाण कोठें लागला नाहीं. घायाळ समशेर बहादर कुंभेरीस आला तेथें सुरजमल जाट याणे त्याची उठाठेव बहुत प्रकारें करून घोडीं व पालखी देऊन वाटेस लाविलें. तों समशेर बहादर याणें "नानासो यास तोंड काय दाखवावें" म्हणोन, 'भाऊ! भाऊ!' असा शोक करून [तो] निधन पावला.

---

२६. 'सर्वत्राचा समाचार' सा. १९२२.
२७. 'तेथून' च्या पुढें 'फिरून' हा शब्द मा. १९२२ त अधिक.
२८. 'मथुरेवर' सा. १९२२.

प्रकरण अठरावें

# नानासाहेबांचें आगमन; पण शोकानें परत गमन व निधन

**१४७. इब्राहिमखानाचें इमानी उत्तर.**

यानंतर दोनचार रोजानी दुराणीहि[१] दिलीस पोंचले. तेव्हां इभ्रामखान गाडदी रणांत घायाळ सापडला. त्यास आपणाकडे चाकरी ठेवावें म्हणोन रदबदली घातली; परंतु चाकरीस राहावयास आनुकूल पडले नाहीं. आणि बोलिला की, "भाऊसाहेब याचे व आमचे वचनाचें इमानप्रमाण जाले आहे. त्यास[२] आसी गोष्ट आपणापासून कदापि घडणार नाहीं" म्हणोन साफच जाबसाल केला.[३]

**१४८. नानासाहेब पुण्याहून सैन्यासह निघून नर्मदापार खेचवाडी व मुक्काम. तेथें पानिपत दुर्वार्ता ऐकून परत.**

यानतर इकडील मार. पुणेहून नानासाहेब पैठणावर आले होते, तेथें आपलें लग्न केलें. आणि दादासाहेब यांजसमागमें काही फौज देऊन निजाम आलीखान याचे तोंडावर रवाना केले. आपण दहावारा हजार फौजेनिसी कूच करून मजल दरमजल वराड देशास वाळापूरचे प्राताचे रोखे येऊन उतरले. तेथें जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा येऊन भेटले. त्याचे बहुत समाधान केलें. आणि हिंदुस्थानांत जावावयास समागमे घेतले. पांच-सात हजारानिसी तेहि सामील होऊन समागमें चालिले. नानासाहेब याजबरोबर बाबूजी नाईक बारामतीकर व गोपाळराव गोविद व सदाशिवराव रामचंद्र व विठ्ठल विश्राम व यमाजी सिवदेव[४] व खासा स्वारी फौजेनिसी पौषमासीं शुक्लपक्षीं (जानेवारी १७६१) तलेगाव[५] परगणें आडगाव, प्रात वऱ्हाड येथें दाखल जाहले. ते मुकाम करून* हरि अंणाचा निघण्याचा करार करून विध्याद्रि पर्वत येथील गोंडाचा राजा आणून त्यास वस्त्रें, अलंकार, कडी, शिरपेंच बक्षीस देऊन समाधान करून चालिले. सातपुड्यापार होऊन नर्मदावरी मुकाम केला. तेथून जानोजी भोंसले व हुजराती पथकें, खेचवाडीकर बेइमान जाला होता, त्याच्या पारिपत्यास खेचवाडी मुलखांत पाठविले. नानासाहेब आपले फौजेसुद्धा मुकामावर होते. तेथें वर्तमान ऐकिलें कीं, पळाचे लोक उघडे बोडके आले. त्यांणीं श्रीमंतापाशीं

---

१. या शब्दापुढे 'मागें इकडे 'हे शब्द सा. १९२२ त अधिक आहेत.

२. 'यास्तव' सा. १९२२.

३. यापुढें "ऐसें जालियावर त्याचा शिरच्छेद केला" हें वाक्य सा. १९२२ त अधिक आहे.

४. 'शिदे' भाइसं.

* या ठिकाणी सामान्यतः ज्या प्रतीचें अनुलेखन केलें ती प्रत अशीच अपुरी सापडली. यापुढें साने प्रतींतील मजकूर उद्धृत केला आहे.

५. तेलगांव सा. १९२२.

सर्व सविस्तर वृत्तान्त निवेदन केला. ते समयी श्रीमंतांनीं ऐकोन खेद बहुत केला. नानासाहेब यांचा निश्चय पूर्ण होता कीं, दिल्लीस आपण जाऊन गिलच्याचें पारिपत्य करावें. अशी विचारणा करून बदोबस्त केला होता. त्यांस सौभाग्यवती गोपिकाबाई यांणी बहुत बोध करून माघारें फिरविलें. कूच करोन मजल दरमजल उतरून बऱ्हाणपुरास दाखल जाले. इकडील ग्वाल्हेरोहून[६] पार्वतीबाई व नाना पुरंदरे वगैरे श्रीमंतास येऊन भेटले. आणि सकल वर्तमान हिंदुस्थानांतील सांगितलें. मग पुढे बऱ्हाणपुराहून श्रीमंत नानासाहेब याणी 'भाऊ! भाऊ!' ऐसा शोक करीत करीत जेवतां व निजतां निजध्यास बहूतच करीत कूच करून मजल दरमजल पुण्यास दाखल जाले. दादासाहेब निजामअली याचा बंदोबस्त करून पुण्यास दाखल जाले. उभयतांच्या भेटी जाल्या.

## १४९. नानासाहेब यास पुत्रशोक व बंधुशोक बहुत; परंतु 'भाऊ भाऊ' करीत मृत्यु.

नंतर दिवसेदिवस भाऊसाहेबाच्या शोके करून नानासाहेबाचे शरीर कृश झालें. बुद्धिभ्रंश जाला. लोकास शिव्यागाळी करू लागले. कारभार विपरीत होऊ लागला. पुत्रशोक व बंधुशोक [परम कठिण!] श्रीरामचंद्रजी वनवासास गेलियावर मागें राजा दशरथास रघुनाथ-वियोगाचे दुःख होऊन राम! राम! म्हणता शोक करून प्राणत्याग केला, त्याप्रमाणे नानासाहेब भाऊसाहेबाच्या शोकें निधन[७] पावले! शके १६८३ वृषानाम संवत्सरे, ज्येष्ठ वद्य सप्तमी[८] (वद्य ६) (ता. २३ जून १७६१) मंगळवासरी देवाज्ञा जाली. वैकुंठलोकास गेले.

## १५०. राम-भरत किंवा बाजी-चिमाजीप्रमाणें भाऊ-भाऊ

नानासाहेब व भाऊसाहेब अवतारी पुरुष, उभयताप्रमाणें मनुष्यलोकी यामागें कोठेहि जाले नाहीत आणि पुढेहि होणें कठिण. उभयताचा ऋणानुबंध की, एक मरतांच एकानें मरावें. पूर्वीं बाजीरावसाहेब मुक्त जाहालियावर सहा महिन्यांनीं चिमाजी आप्पा गेले. तैसेच भाऊसाहेब गैब जाल्यावर वर्तमान नानासाहेब यांणी ऐकतांच सहा महिन्यातच मृत्यु पावले. भाऊसाहेब मृत्यु पावले हें कोणी ऐकलें नाही व पाहिलें नाही. भगवंत-इच्छेकरून[९] त्या कहरांतून पार पडून वांचून हरएक कोठें असले तरि निर्माण[१०] होतील. बहूत भाऊ आहेत! परतु श्रीमंत लोकांत यांजप्रमाणें भाऊपणा कोठे नाही. राम-भरताची साम्यता!

---

६. गालेरी असा पाठ पु. प्रतीचा सर्वत्र आहे.

७. 'भाऊ भाऊ म्हणोन प्राण सोडिला' तुं. प्रत. 'निधानास गेले' पु. प्रत.

८. अन्यत्र वद्य प्रतिपदा असे आढळतें. नानांचा काळ पर्वतीवर झाला.

९. 'भगवत सत्ते करून' पुणें प्रत. येथें पुणें प्रतीचा २०४ था बंद संपला. पुढील मजकूर शेवटपर्यंत धोपेश्वर प्रतीतून घेतला आहे.

१० या मजयरूप लेखावरून ही बखर ह्या लढाईनंतर लौकरच लिहिली असावी असें चांगले अनुमान करता येतें.

**१५१. थोरले माधवराव यांस मुख्यप्रधानकीचीं वस्त्रें; त्यांची ताराबाई व छत्रपती रामराजा भेट**

नानासाहेब यांचें देहसार्थक यथाविधि करून राजश्री माधवराव बल्लाळ यासीं सातान्यास नेऊन, मातुश्री ताराबाईसाहेब व रामराजा महाराज यांसी भेटून त्यांजकडून 'मुख्य प्रधान' असे शिक्के करवून [त्यांनीं] वस्त्रे दिलीं आणि निरोप देऊन वाटेस लाविलें.

**१५२. 'नजीबखान प्यादा होता तो फर्जी होऊन मात केली ती ही हकिकत'**

याप्रमाणें वर्तमान जालें. नजीबखान प्यादा होता तो फर्जी जाहला. त्यानें प्यादेमात केली. याप्रमाणें जाली हकीकत मेवेसीं लिहिली असे. [त्याप्रमाणें विस्तार करून लिहिलें आहे. त्याची माहितगारी ते वेळचे कोणी अनुभवी असतील त्यांस मात्र ठाऊक. असा इतरास दाखला पोंचणार नाही. आपण हिंदुस्थानचें आद्यंत वर्तमान लिहून द्यावें म्हणून आज्ञा केली होती. त्यास हें वर्तमान माहितगारीनेच लिहिलें पाहिजे; त्याजवरून विचारणा करून सेवेशी विस्तारें लिहून [पाठविलें आहे.] ध्यानास आणावें आणि मनन करून मिथ्या असल्यास सोडून द्यावे आणि सत्य असेल तें जमेस धरावें. हें लिहून कळवावें असा विचार नाहीं; सेवेशीं कळावें] बहुत काय लिहिणें ? हे बखर राजश्री राघो मल्हार कुलकर्णी तर्फ तुगारतन प्रांत कर्नाळा तालुके वसईकर (?) यांची बखर असे. दर जागा पुणें येथें समाप्त केली. हस्ताक्षर मल्हार गोविंद पानसरे कसबे इदापूर स. १२०१ सुग इसने तिसैन मया व अलफ शके १७१२ (१७१३ पाहिजे) विरोधकृत नाम संवत्सरे मिति मार्गशीर्ष वद्य सप्तमी २० माहे रबिलाखर (= १७।१२।१७९१ ही तारीख येते) कृपालोभाची वृद्धि करावी हे विज्ञापना ही बखर समाप्त. श्रीदत्तार्पणमस्तु, मिति ज्येष्ठ वद्य ७ (७ जून १८५९) शके[११] १७८१ सिद्धार्थी नाम संवत्सरे ते दिवशीं सायंकाळी लिहिली. लिहिणार विष्णु बापूजी निफाडकर राहणार धोपेश्वर तालुके राजापूर, चुकली तरी क्षमा करावी हे विज्ञापना. (ही धोपेश्वर प्रत सांगली-प्रतीच्या शेवटी शक १७८७ पडले आहे तें १७९७ धरलें म्हणजे युवा सं. व फा. सु. १ शनिवार हें सर्व जमतें १८७६ फे. २६ तारीख येते. सारांश, मिळालेल्या प्रतीत ३ प्रतीच्या शेवटी काल आहे व त्यांत तुगार प्रत जुनी. तिचा प्रारंभ म्हटल्याप्रमाणें येथें काल दाखल केला व इतरहि प्रतींचा दिला आहे.)

समाप्त

---

११. ही मिति अर्थात् विष्णु बापूजी निफाडकर यानें केलेल्या नकलेची होय.



हें पानिपत–रणभूमीवरील तिसऱ्या म्ह. १७६१ मधील युद्धांत सदाशिवरावभाऊ जेथें पडले तेथे उभारलेले स्मारक आहे.

[ ह्या चौकोनी स्मारकाच्या एका भितीत पुढीलप्रमाणें लेखशिला बसविलेली आहे. ]

**This pillar marks the site**
**of**
**The black mango tree**
**Near which was faught**
**The third battle of Panipat**
**Between**
**Ahmad Shah Abdali and the Maratta Confederacy**
**in**
**1761**

# काल-पट

ह्या बखरीतील मुख्य मजकूर मागील पृष्ठावर–पृ. १४६–संपला. ह्या मजकुरात इतर बखर-ग्रंथातल्याप्रमाणे ऐतिहासिक अनेक हालचालीचे कथन पुष्कळ व सरसपणें आलें आहे. पण त्या मानानें त्या हालचालीचा पुरता काल दर्शित केलेला नाही असा काल प्रत्यक्ष दिलेला नसणे हे असल्या ग्रथाचे केवल वैगुण्य नव्हे. पण शक्य तों नेमक्या व पुरत्या कालासह जर ह्या हालचाली लक्ष्यात येता आल्या तर तें इतिहासवृत्त, इतिहासवाचकाचे जें उद्दिष्ट ते साध्य होण्यास अधिक उपयुक्त ठरतें म्हणून पुढीलप्रमाणे काल-पट देण्याचे योजिले आहे

ग्रथलेखकाने आपला ग्रथ तर त्याच्या कल्पनेप्रमाणें इतिहासकथनार्थ लिहिला आहे हे स्पष्ट दिसतें; म्हणजे कालानुक्रम व स्थानवैशिष्टच हीं जी ऐतिह्याची चाराकी दोन प्रमुख अगे ती त्याने लक्षात घेऊन आपले लेखन केलेले आहे तथापि कथासूत्र ध्यानी आणून तो तो प्रसग शब्दसृष्टीत प्रकट करताना काल दर्शित करण्याचें राहून जाते; नव्हे, कालस्थलादिकाची त्यापासून दूर गेलेल्याना जितकी आवश्यकता वाटते तितकी, समीपवर्ति लेखकाला वाटत नाही. व म्हणून काल देण्याचे राहाते. प्रत्यक्ष पत्रातूनसुद्धा, पूर्णपणे विश्वसनीय तें पत्र असूनही, कालस्थलादिकाचे उल्लेख नसतात, किंवा मोघम असतात व ह्याचेहि कारण हेच पण ह्याच कारणाकरता आपणाला आज ते संकेत उलगडणें, एखादा ऐतिहासिक प्रसग वास्तव ठरण्यासाठीं कालदृष्टचा तो बिनचूक ठरणे ह्याची आवश्यकता भासते

ह्या बखर-ग्रंथात हालचालीच्या मानाने पुरता काल दर्शित केलेला नाही व अशीं उदाहरणे पुष्कळच आहेत. बऱ्याच ठिकाणी कालनिदर्शन आलेले आहे; पण तें मोघम आहे "पौष वद्य १२, दुसरे दिवशी; आठ मुक्काम जाले, दो-चहो रोजात; वैशाखमासी; दसरा जवळ आला; एक महिन्याने मागून यावे; समग्र दीड वर्ष जाहले; शिवलिखिताचे मुहूर्ताने रात्रीस बाहेर आले; तों ज्येष्ठमास संपूर्ण होत आला", इत्यादि इ. ह्या कालोल्लेखात व आगेमागे वर्षाचा निर्देश नसल्यामुळे हे उल्लेख पुरते व नेमके लक्षात येत नाहीत ऐ० साधनसाहित्यांत, ज्यानी प्रत्यक्ष ते प्रसंग घडविले त्याची पत्रें—अस्सल, समकालीन व विश्वसनीय पत्रें—हे अव्वल दर्जाचे व पहिले साधन होय. सकलित वृत्तान्तातील गोष्टी ह्या पत्राधारेच आपण लक्षांत घेतों व नतर परस्परपूरक ही साधनें होतात. बखर-ग्रंथाच्या पुनर्मुद्रणात, त्या बखरीत आलेल्या प्रसंगाची समकालीन अनेक पत्रे प्रसिद्ध झाल्यानतर, साहजिकपणे फरक पडतो. कारण पत्रे हें त्या संबंधीचे पहिले व अधिकृत लेखन होय. अर्थात् अशा पत्राच्या प्रसिद्धीनतर बखर-ग्रंथाच्या अभ्यासास पत्राच्या अभ्यासाची जोड ही आवश्यक आहे व ही दोन्ही साधनें मग परस्पर पूरक ठरतात. उघडच बखर-ग्रथाच्या मुद्रणांत ह्या दृष्टीनें फरक म्हणजे भर पडणें

सहज आहे. व प्रस्तुत बखर-ग्रंथावृत्तींत 'काल-पट' ह्याच दृष्टीनें देण्याचें केलें आहे ह्या बखरीत, मध्यंतरी इ. स. १७३९, १७४८ मधील कांहीं ऐ० घटना सांगितल्या आहेत. तरी मुख्यतः इ. स. १७५३ ते १७६१ ह्या कालांतीलच कथाभाग वर्णिला आहे. आणि वर सांगितल्याप्रमाणें ह्या कथाभागांत मोघम कालनिर्देश बरेच आलेले आहेत. पुढें पुढें विशेषतः वीर दत्ताजी शिंदे ह्यांच्या शुक्रतालवरील लढाईपासून पृ. ४८ ते ५३ व पृष्ठ ६६ ह्या हकीकतींत वर्षाचा निर्देश करून लेखक काल सांगू लागला आहे. पृ. १२६ पासून तर मुख्य पानिपत-वर्णनच आलें आहे. व ह्या वर्णनांत एकदां शक-वर्ष सांगून नंतर महिना, तिथी व पुढें 'उदयीक' 'अकरावे दिवशी' असें कालनिदर्शन आलेलें आहे. सारांश, बखरींतील हालचाली व त्याबरोबर इतरहि सहचारी हालचाली आणि सर्वांचा शक्य तों पुरता काल वाचकाच्या लक्षांत येण्यासाठीं प्रकरणवारीनें पुढील कालपट देण्याचें केलें आहे. 'कालपट' हा या आवृत्तीचा विशेष कोणी मानिला तर तें सयुक्तिकच होईल. ह्या योगें तें तें प्रकरण स्वतंत्रहि अभ्यासितां येईल. आणि बखर-प्रसंगाशीहि तें कसें व कितपत बरोबर, हे पाहाणी करून लक्ष्यांत घेतां येईल. अशी पाहाणी करून त्या विवेचनाची जोड ह्याच ग्रंथास जोडणें अवश्य पण तितकेंच अशक्य; हें लिहिणें नलगे. तो विषयहि मग स्वतंत्र होईल. असो. 'कालपट' मांडणी पुढीलप्रमाणें :—

कालपटाच्या १ ल्या सदरांत बखरीतील पृष्ठ व परिच्छेद दिला असून २ ऱ्या सदरांत प्रस्तुत ओळखीचा म्हणून इ. स. दिला आणि ३ ऱ्या व ४ थ्या सदरांत ऐतिहासिक पत्रांतून येणारा शक व आर्बी म्ह. सुहुरसन, महिना, तारीख सांगून ५ व्या सदरांत स्थलनिर्देश केला आहे. ६ व्या सदरात ऐ. घटना दर्शित केली व ७ व्या सदरात आधार दाखल केले आहेत. बखरीत जो प्रसंग उल्लिखित नाही पण आवश्यक वाटला तो दिला व त्या पाठीमागें परिच्छेद अर्थात् दिला नाही. तसेंच बखरीतील कालहि येथे दिला नाही तो परिच्छेदांत आढळून येईल. पत्रांत कोणचा काल आहे हें कळण्यासाठी तो कालोल्लेख जाड खिळ्यांचा दाखविला आहे. जाड खिळ्यांचा नाही तो काल अंदाजी समजावा.

## प्रकरण १ लें–कुंभेरीचा वेढा (पृष्ठ १–८ व परिछेद २–११)

| पृष्ठ. परि. | इसवी सन | शालिवाहन शक | सुहुर सन | स्थल | हालचाल | आधार |
|---|---|---|---|---|---|---|
| २–२ | १७५३ सप्टं. १० | १६७५ भाद्र. शु. १३ | ११५४ जिलकाद १२ | थालनेर | रघुनाथराव दादाचे उत्तरेकडील स्वारीस प्रयाण (कुंभेर प्रवास ४॥ महिने). | खं.२पृ.१२९; पेद२७प.७०; मुकाम फक्त खं. १-२७. हिंद १ पृ. ६७. |
| ,, | सप्टं. २० | भाद्र. वद्य ८ | जिलकाद २२ | महेश्वर रेवा उत्तर तीर | रघुनाथरावाचा मुक्काम. | पेद २७ पृ. ७१. |
| ,, | आक्टो. १४ | आश्विन व.२ | जिल्हेज १६ | उज्जनी | राघोबादादाचा मुक्काम. | पेद २७ पृ. ७१. |
| | नोव्हें. ८ | कार्तिक शु.१३ | मोहरम १२ | ,, | जयापा शिद्याचा मुक्काम. | पेद २७ पृ ९९. |
| | नोव्हें. २५ | मार्ग. शु. १ | मोहरम २९ सोमवार | व (प) डाणे, नेवाई | जाळपोळ, लूट, राघोबा व मल्हारराव | पेद २७ पृ. ७२; हिंद १–८५; ख. ६–२१५. |
| | डिसें. ४ | ,, शु. ९ | सफर ८ | जयपूर | राघोबा मुक्काम. | पेद २७ पृ. ७२. |
| | डिसें. १७ | ,, व. ८ | सफर २१ | ,, नायके | रामसिंग मारवाडकर दादा भेट. | पेद २७ पृ. ७३. |
| | १७५४ | | सफर ३० | कुंभेर वेढा | राघोबा, जयापा, मल्हारराव कुंभेर वेढा (४ महिने). | पेद २७ पृ. ७३. |
| | जाने. २० | पौष व. १२ | रवल २५ | | | |
| २–२ | फेब्रु. ८ | माघ व. १ | रखर १५ | ,, | जाठवकील रूपराम तहासाठी येतो. पण राघोबांचा त्यासीं अबोला | खड ६. २९२. |
| ३–२ | मार्च ६ | फाल्गुन शु.१२ बुधवार | जवल ११ | ,, | राघोबा व मल्हारराव शाही तोफखान्यांतील आग्रा, झाशीकडील तोफा, दारूगोले इ. मागवितात. | खं. ६–२९४; (= हो.इ.सा.१–१०९); ५३१; पेद २७ पृ. ८८–८९. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ३–५ | मार्च १९ | फाल्गुन व. ११ मंगळ. १६७६ | जवल २४ | ,, | खंडेराव होळकर गोळा लागून मृत्यु. | शिंदे सा. ३–२०४; खं. ६ पृ. १०४; |
| ६–९ | एप्रिल १७ | चैत्र व. १० | जखर २३ | ,, | जाठ जेरीस आला. सलूख सुरू. | शिंदे सा. ३–१४८; १–१११ |
| ५ | मे | चैत्र वैशाख | | ,, | जयापा जाठाचा पगडी भाई होतो | हिस्ट्री जाठ पृ. ९०. |
| ९ | मे | ,, | | ,, | जयापा राघोबास म्हणतात छावणी हलवावी, तह करावा | शिंदे सा. ३ ले. १४९. |
| | मे १७ | वै. व. ११ | रज २३ | शिकदरा | वादशाही फौजेवर हल्ला. | [illegible] ६-२९९, व पृ १०७ पेद २१-६०, नओ. |
| ११ | मे २६ | जेष्ठ शु. ४।५ रविवार | साबान ३ | कुंभेर | तह रु. ३० लक्षावर तह होऊन वेढा मंपला. | पृ. २४९. पेद २७ पृ. ९४; वैद ५–११(१६७६) नानारो [illegible]. २२५. |

## प्रकरण २ रें–शिंद्यांची मारवाड–जोधपूर स्वारी (पृष्ठ ९–१८, परिच्छेद १२–२४)

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ८–११ | १७५४ | १६७६ | ११५५ | दिल्ली– | हून जयापांचें मारवाड प्राताकडे १०– | ऐपया १२२. शि. सा. १–११५ |
| | जुलै २ | आषाढ शु. १३ | रम १० | | १२ हजार फौजेसह प्रयाण | खं. १–३७ |
| | जुलै ६ | आषाढ व. २ | रम. १४ | रेवाडी | ४० हजार फौज जथली | शि. ३–१५२. |
| | जुल १२ | आषाढ व. ८ | रम. २० | नारनोल– | प्रांतात जयापांचे वास्तव्य | शि. १–११४. |
| | जुलै १८ | आषाढ व. १३ | रम. २६ | सांबर | जयापा मुक्काम | शि. १–११५; ३–१५३. |
| | जुलै २५ | श्रावण शु. ६ | सवाल ४ | | | |

| पृ.–परि. | इसवी सन १७५४ | शालि.शक १६७६ | सुहुर | स्थल | हालचाल | आधार |
|---|---|---|---|---|---|---|
| | आगस्ट ६ | (पूर्वी)श्रा.व.३ | सवाल १६ | किसनगड | जयांपांनी घेतला | शि. ३–२६५, ४६, ४७. |
| | | ,, | १९५५ | मेडतें | जयापा शिंदे यांचा वेढा | खं. १–३७ |
| ११–१४ | आगस्ट ६ | | सवाल १६ | | (बडगांव खडकी) व लढाई | |
| | | शनिवार | | | | |
| ,, | सप्टें. १४ | भाद्र. व. १३ | जिल्काद २६ | मेडतें | सर करून ठाणें बसविलें | शि. ३–२६९. |
| | आक्टो. | आश्वि. कार्ति | जिल्हेज | | बिजेसिगाची जयापाशी सलूखाचीं फक्त बोलणीं. | शि. ३–२७७. |
| १४–१९ | ,, | ,, | ,, | गगरडे | घेऊन जयापांनी अधिक जोरानें व | रे. मा. इ. १–३७३; हिं. १–१०९. |
| | आक्टो. | ,, | | | जखडबद चढाई : जोधपूर-जालोद-फलोदी इ. | |
| | नवंबर | कार्तिक | ११५५ मोह | दिल्ली | बिजेसिगाचा वकील दादांकडे | शि. ३–६२. |
| ९} १२ | १७५५ | पौष | रवल | नागोर | भोवती चौक्या, रसदबंदी व जोध- | पेद २१–६७, ६९; |
| १०} १३ | जाने. | | | | पुरासंनिध सुरुंग | शि ३–२१०. |
| ११–१३ | जाने. १८ | माघ शु. ६ | रखर ५ | ,, | सलोख्याची बोलणी सुरू लावेवाला रजपूत रुजू. | |
| | फेब्रु. २१ | भृगु. फाल्गु. शु. १० | जवल ९ | (तिसरे प्रहर) अजमेर | जयापानी जिंकलें. तहाची वाटाघाट चालूच. रामसिगानें | } पेद २७–१०५, १०७; सि. ३–२११. |
| | मार्च ९ | पूर्वी फा.व.१२ | जवल २५ | जोधपूर,सांबर जालोर | येथें मोर्चे | ,, पेद २७–६७ |
| | मार्च | १६७७ चैत्र | जवल | रूपनगरा– | स दादाचा शह बसावयाचा. पण जयापांच्या म्हणण्याप्रो तहकूब. | शि. ३–२९८, २९९, पेद २७–१०७ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एप्रि. २५,२९ मे | वशा. शु. १४ वै. अ. ज्येष्ठ | रजब १२ रजब साबान | ग्वाल्हेर उसर (नागोर) | रूपराम बोलणीं जयापा घेतात | शि. ३–३०२ पेद २७–१०६. |
| | जून १७ | ज्येष्ठ शु. ८ | रमजान ६ | नागोर | किसनसिंग जयापा भेट. सलूखाची बोलणीं ठीक, पण रागड्यांची पुन· लबाडी | शि. १–१६५. |
| | जुलै १४ | आषाढ शु. ५ | सवाल ४ | ,, | जेतसिंग व बिजेराम गोसावी, जगनेश्वर ब्राह्मण व रायसिंग चव्हाण तहाच्या वाटाघाटीस आले | शि. ३–२१४. |
| १३–१७ | जुलै १८ | आषाढ शु. १० | सवाल ८ | नागोर | बिजेसिंगाने विखुरलेली आपली फौज एकवटून जयापावर हल्ला | पेद २७–११२ |
| १३–१८ | जुल २५ | (उ.) श्रावण वद्य २ भृगु द.आषाढ व. १ | शुक्रवार सवाल १५ | ,, | जयापाचा दग्याने खून | शि. १–१४०,१४१; शि. ३–३२०, ऐपया १३९, पेद २–४८. |
| १४–१९ | आगस्ट १० | श्रा. शु. ३ | ११५६ जिल्काद १ | पुणे | रघुनाथरावदादा परत पोचले | पेद २७ पृ. ७९. |
| | आगस्ट १६ | श्रा. शु. ९ | जिल्काद ७ | नागोर (जालोर जोधपूर) | दत्ताजीने दुप्पट जोराने लढाई चालविली; मोर्चे कायम. | पेद २–४८. |
| | आगस्ट २८ | श्रा. वद्य ६ | जिल्काद १९ | | बिजेसिंगाचा दिल्लींतील वकील हाकलून द्या | हिंद १–१६१. |
| | सप्टें. २९ | भा. वद्य ९ | जिल्हेज २२ | | पुण्याहून दत्ताजीच्या मदतीस समशेर बहाद्दर व यशवंतराव पवार १० ह. फौजेसह रवाना | हिंद १–१७१; शि. ३–३२८. |

| पृ.–परि. | इसवी सन १७५४ | शालिशक १६७६ | सुहुर | स्थल | हालचाल | आधार |
|---|---|---|---|---|---|---|
| | आक्टो.१ | भाद्र. व. ११ | जिल्हेज २४ | नागोर | भोवतीच्या सर्व गढया–चाह, रोहेण, दुगोली, झाडोली, खाटु दोन्ही, काळया इ. पाडल्या रसबंद | शि ३–२१६. |
| | आक्टो. १५ | आश्वि.शु.१० | मोहरम ९ | रामगड ते नागोर | अनिरुद्धसिंग बख्तवारमल, | शि. ३–१७२,पेद २१–७४, ७७; २–५०; २७–११७. |
| | आक्टो. १६ | ,, शु.११ | मोहरम १० | दाते | शहापूरवाला रूपनगरकर इ. सह | |
| | आक्टो २१ | आश्वि. वद्य १ | मोहरम १४ | दौलतपूर, | राणोजी भोइटेकडून पराभूत व | पेद २१–७७. |
| | आक्टो. ३१ | आश्वि. व ११ | सफर २४ | दिडवाणा (नागोर) | अनिरुद्धसिंग शरण येऊन भेट | |
| | | | | दिडवाणा | | |
| | नोव्हें. | कार्तिक | | गोदोज दिडवाणा | बिजेसिंगाशीं शेवटचें युद्ध व तो पराभूत | पेद २–४९. |
| १६–२१ | डिसें २ १७५६ | कार्ति. व. १४ | सफर २७ | नागोर ते बिकानेर | बिजेसिंग पळ व तहाचीं बोलणी | पेद २ पृ. ७५, ७६, ९०. पेद २१–८२, ८३; ऐपया पृ. १३८. |
| | जाने. | पौष | रबल रखर | नागोर, मेडतें | तह, तहानंतर मुक्काम | ऐटि २ पृ. ६९; शि. ३–२१८, १७५ |
| १७–२३ | जाने. | ,, | रखर | श्रीगोंदें | नानासा व भाऊसा पेशवे जनकोजी शिंदे भेट | |
| १८–२४ | जाने. | ,, | ,, | सावनूर | पेशव्यांचा वेढा, हल्ला व जिंकलें | खं. ३–४६९. |
| | एप्रिल २३ | १६७८चै.व९ | रजब २२ | रूपनगर | दत्ताजीचे मोर्चे : समशेरबहादर ससैन्य | पेद २–६३, शि. १३६, पेद २१–८७. |
| | | ज्येष्ठ शु. ८ | रम ७ | | येतो व जिंकतात १॥ म. युद्ध | पेद २–६५. ६६; शि. १–१८०. |
| | आगस्ट | श्रा. शु. | जिल्काद | कोटा (बुंदी) | दत्ताजी अजितसिगास गादीवर बसवितात. | शि ३–७४. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १६–२२ | ,, आगस्ट २१ | ,, श्रा. व. १ | जिल्काद १४ | उज्जनी | जनकोजीची सैन्य–समजावीस | पेद २ ६५ |
| | ,, नोव्हें. २९ | ,, मार्ग.शु. ८ | रवल ६ | पुणें | रघुनाथरावांचे उत्तर-हिंदुस्थानच्या दुसऱ्या स्वारीस प्रयाण | |

## प्रकरण ३ रें :–प्याद्यानें बार भरला (पृष्ठ १९–२५ परिच्छेद २५–२७)

ह्या तिसऱ्या प्रकरणांत आलेला कथाभाग पहिल्या दोन प्रकरणानुरोधानें (इ. १७५४–५६) पाहता आडकथा वाटण्याजोगा आहे. कारण ह्यांत मुख्यतः 'पूर्वी' (पृ. २१–२४) ची 'वर्तणूक' म्हणजे इ १७३९ मधील नादिरशहाची आणविलेली दिल्लीवरील स्वारी, बखरलेखकांनीं सांगितली आहे. जवळजवळ ह्या स्वारीच्या निमित्तासारखे आताहि आपणांस 'एक निमित्त घ्यावें लागेल' (पृ. २४–२६) म्हणजे गुप्त राजकारण करावें लागेल व हें, ज्या प्याद्याकरवी शेवटी 'भाऊगर्दी' झाल्याचें लेखकास सागावयाचें आहे. (पृ. ४६) त्या नजीबखान प्याद्याचें म्हणणें व वृत्ति दर्शित करण्याच्या दृष्टीनें हें प्रकरण ग्रंथलेखकाने दिले आहे. एका अर्थी बखरप्रसंगाचा प्रारंभच हें तिसरें प्रकरण मानितां येईल. पहिले प्रकरण हें उत्तरीय जे राजकीय धोरण व वातावरण तें सागणारा, एकाधिक प्रसंगापैकी, एक प्रसग होय. आणि हें ३ रें प्रकरण भाऊगर्दीतील जी एक मुख्य व्यक्ति त्या व्यक्तीची सूत्रचालना कशी तें सागणारे आहे. असो. असे हें प्रकरण पूर्ववृत्त–कथनपर आहे म्हणून बखरीतील कथानुरोधानें पाहता कालपटात आगेमागेपणा येणें साहजिक आहे. व आधार देण्यांतहि वेगळेपणा करावा लागला आहे.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १९ }–२५<br>२१ } | १७५४–५९ | १६७६–८१ | ... | दिल्ली | आलमशाह | = आलमगीर २ रा–टीपेंत महंम्मदशहा पडलें तें नको. |
| –२६ | १७१९–४८ | १६४१–७० | ... | ,, | मुहम्मदशाह– | चा वजीर मनसूर अली म्हटलें तेथें कमरुद्दीन पाहिजे. |
| ,, | १७४८–५४ | १६७०–७६ | ... | ,, | अहमदशाह | ह्या बादशहाचे वेळीं निजामुल्मुल्क नाही. |

